# अनुक्रमणिका

# द्विधा मनस्थिती

द्विधा मनस्थितीतून बाहेर कसे पडायचे?

मागच्या काही दिवसातील आपल्यावर गुजरलेल्या द्विधावस्थांचे काही प्रसंग तरी आपल्याला नक्कीच आठवत असतील. बर्थ डे पार्टीच्या वेळी ब्लॅक फॉरेस्ट केकचा डोंगर पाहून खाण्यासाठी आपले हात शिवशिवले असतील. त्याच वेळी वाढत्या वजनाची, (वा मधुमेहाची) आठवण झाल्यामुळे स्वत:ला शिव्या देत काढता पाय घ्यावे लागल्याचे आपण विसरणार नाही. अशा प्रकारचे कित्येक छोटे मोठे प्रसंग आपल्या आयुष्यात अनेक वेळा येवून गेले असतील. आजकाल त्यांची आठवणही नकोशी झालेली आहे. ओल्या पार्टीच्या वेळी, चोरून सिगरेट ओढताना, चोरून प्रेम करताना, विवाहबाह्य संबंध ठेवताना, नेटवर लैंगिक संस्थळांचे सर्फिंग करताना, ... इ.इ वेळी एकीकडे मनाला या गोष्टी हव्याहव्याशा वाटत असतात व दुसरीकडे आपला 'आतला आवाज' या प्रकारातील धोक्यांचा इशारा देत असतो.

हा आपला 'आतला आवाज' आपल्याला स्वस्थ बसू देत नाही व समोरच्या गोष्टींचा मनसोक्त आनंद घेवू देत नाही. गंमत म्हणजे हा आपल्याला या द्विधा मनस्थितीतून बाहेर काढण्यास धड मदतही करत नाही. आपण जर दृढनिश्चयी नसल्यास करू की नकोची ही जीवघेणी कसरत खरोखरच एके दिवशी जीव घेणारी ठरू शकेल. मनाच्या या दोलायमान स्थितीतून बाहेर पडण्यासाठी नेमके काय करावे याचा अंदाजच येत नाही. त्यामुळे शेवटी वैतागून, कुठलाही निर्णय न घेता, जे होईल ते होऊ दे म्हणत गोष्टी हाताबाहेर जाऊ देणे हा एकच पर्याय आपल्यासमोर राहतो. परंतु हा पर्याय कुठल्याही दृष्टीने योग्य आहे असे म्हणता येणार नाही.

शक्य असल्यास अशा अटीतटीच्या वेळी आपण एखादी यादी करू शकतो. एका रकान्यात त्याच्या बाजूचे व दुसऱ्या रकान्यात त्याच्या विरोधातील मुद्दे नोंदवू शकतो. हवे असल्यास अल्पकालीन व दीर्घकालीन

फायद्या-तोट्यांचा हिशोबही ठेवू शकतो. परंतु एवढ्यावरच हे भागणार नाही. कारण हे फायदे - तोटे, वा अनुकूल - प्रतिकूल मुद्दे तुमच्या दृष्टीने त्या क्षणी बरोबर असतीलही. परंतु त्यातील काही कदाचित गैरसमजुतीवर आधारलेलेही असू शकतील. तुम्ही नोंदविलेल्या मुद्द्यांचे कठोर परीक्षण करणे, अपवादात्मक परिस्थितीचा आढावा घेणे, विवेकी विचारांशी त्यांची पडताळणी करणे, काही चुकींचे assumptions आहेत का याचा शोध घेणे गरजेचे ठरतील. आपल्याला ती वस्तू खरोखरच हवी का? किंवा आपल्या अशा वर्तनामुळे कुणीतरी दुखावतील का? वा आपल्या आरोग्यावर त्याचे विपरीत परिणाम तर होणार नाहीत ना? यांचाही विचार करावा लागेल. तुम्ही यादी करताना सर्व facts व figures लक्षात घेतलेले आहेत का? याचीसुद्धा तपासणी करावे लागेल.

कुठलाही निर्णय घेत असताना तो पहिल्या झटक्यात चुकीचा ठरू नये व पुन्हा पुन्हा तेथेच घुटमळत राहू नये याची काळजी घ्यावी लागेल. कदाचित तुमचे निष्कर्ष बरोबर असतील. परंतु कारवाई चुकीच्या पद्धतीने होत असेल. अशा वेळी तुम्हाला अवलंबिलेली पद्धत बदलावी लागेल. अडचणीवर मात करावे लागेल. आपण मृगजळाच्या (dead goal) मागे तर धावत नाही ना याचाही अंदाज घ्यावा लागेल. व एवढे करूनही हाती काही लागत नसल्यास निर्णय बदलण्याची कणखरता आपल्यात असायला हवी.

द्विधा स्थितीतून बाहेर पडण्यासाठी आपल्याकडे कुठलीही जादूची कांडी नाही. आपल्याला पुढे नेण्यासाठी वाटेत कुठलेही दीपस्तंभ नाहीत. काही वेळा आपल्याकडे पुरेशी माहिती नसते; असलेली माहिती चुकीची असू शकते; मूल्यांचा तिढा असतो; कुठलाही निर्णय घेतला तरी आपण जिंकू हा आत्मविश्वासही नसतो. अशा प्रसंगी योग्य निर्णयापेक्षा समाधानकारक निर्णय घेणे समस्येला उत्तर असू शकेल. परंतु द्विधा स्थिती आल्यास त्याचा सामनाच करायचा नाही हे योग्य नसेल.

मानसिक चलबिचलता हा एक न टाळता येणारा माणसांचा गुणविशेष आहे. त्याच्या जास्त खोलात शिरल्यास तो आपल्याला तारू शकतो किवा मारूही शकतो. आपल्या मनात फक्त त्याची एकच बाजू दिसत असल्यास आपली दिशाभूल होण्याची शक्यता जास्त. आपल्या मनस्थितीला वस्त्राची उपमा दिल्यास आपले हे वस्त्र अखंड नसून वेगवेगळया कापडाचे तुकडे वापरून केलेल्या गोधडीसारखे ते असेल. काही ठिकाणी ते उसवलेलेसुद्धा असू शकेल.

सामान्यपणे आपण कधीच एका साच्यात वा एका मुशीत तयार झाल्यासारखे नसतो. आपण रोबो नाही. आपण विविधांगी असतो. परिस्थितीनुसार आपल्या इच्छा - आकांक्षा बदलत असतात. आपल्या अपेक्षा कमी जास्त होत असतात. काही वेळा आपण फारच कमकुवत ठरतो व काही वेळा असामान्य धैर्यही दाखवू शकतो. (हे बळ कुठून आले हेही आपल्याला सांगता येत नाही.) मित्रांच्या घोळक्यातून जात असताना त्यातील काहींच्या बाबतीत आपण विशेष सावधानता बाळगत असतो. नाते संबंधात काहींच्या बाबतीत टोकाचा विश्वास व इतरांच्या बाबतीत मात्र नको तेवढ्या शंका. आपण कुठे धोका पत्करतो व कुठे नाही याचा नेम नाही. त्यामुळेच आयुष्याचे वस्त्र विणताना या वेगवेगळया धाग्याना एकत्र करत असतो व विणलेल्या वस्त्रानी आपल्या स्वत्वला आच्छादण्याच्या प्रयत्नात असतो. फक्त असे करताना काही धागे/तुकडे नीटपणे बसलेले असतात व काही उसवलेल्या स्थितीत असतात.

ज्या प्रकारे व्यक्ती तितक्या प्रकृती त्याच प्रमाणे आपण जोपासत असलेल्या मूल्यातही विविधता जाणवते. याचे एक ठळक उदाहरण म्हणून स्वातंत्र्य व सहकार्य या मूल्यांचे देता येईल. आपण स्वतंत्रपणे विचार करू शकतो; आपण कळपातील शेळी - मेंढ्यासारखे वागत नाही, याचा आपल्याला रास्त अभिमान असतो. त्याच वेळी एकमेकाशिवाय आपण राहू शकत नाही, हे सहकार्य मूल्यावरील आपला विश्वास दर्शविते. आपण कुटुंब

व्यवस्थेपासून, समाज व्यवस्थेपासून दूर पळू शकत नाही. अशा वेळी आपले मुक्त स्वातंत्र्य संकुचित होत असल्यास आपण ते स्वीकारतो. सहकार्याचाच वसा उचललेला असल्यास सदासर्वकाळ आपण मान खाली घालून ओझ्याचे बैल होत नाही. केव्हा तरी स्वातंत्र्याची उर्मी उफाळून येते व आपल्याला स्वस्थ बसू देत नाही. पूर्णार्थाने आपल्याला स्वातंत्र्य वा सहकार्य कधीच उपभोगता येणार नाही. एखादा जास्त असेल व एखादा कमी. एखाद्याला या गोष्टी फायदेशीर ठरतील तर दुसऱ्याला हानिकारक. किंवा त्याच व्यक्तीला दुसऱ्या प्रसंगात तीच गोष्ट हानिकारक ठरेल.

त्यामुळे द्विधा मनस्थिती म्हणजे काही तरी भयंकर, अपायकारक अशी समजूत करून घेण्यात अर्थ नाही. याही स्थितीतून बाहेर पडण्याचे अनेक मार्ग आहेत. फक्त या स्थितीची योग्य जाणीव ठेवूनच आपले वर्तन हवे.



# उद्दिष्टपूर्ती

वृथा प्रयत्न करणे सोडण्याची योग्य वेळ कोणती?

गेली कित्येक वर्षे आपण Ph D साठी म्हणून संशोधन करत आहात. संशोधन अजूनही पूर्ण न झाल्यामुळे तुमचा गाइड तुमच्यावर भरपूर वैतागला आहे. घरचे सर्व शिव्या देत आहेत. तुम्ही स्वत: इतर कुठल्याही गोष्टीकडे लक्ष देऊ शकत नाही. मौज-मजा करू शकत नाही. हे अती झालं म्हणून गाशा गुंडाळण्याचा विचार मनात हजारो वेळा आला असेल. तरीसुद्धा तुम्ही आशा सोडली नाही. इतका वेळ, परिश्रम (व पैसा) यात ओतलात व शेवटच्या क्षणी अशा प्रकारे हार खाणे नामुष्कीचे ठरेल याची तुम्हाला जाणीव आहे. परंतु एके दिवशी Ph D मिळवूनच दाखवीन ही जिद्द तुम्हाला स्वस्थही बसू देत नाही.

जिद्द असणे हे एक चांगले जीवनमूल्य आहे यात शंका नाही. परंतु या मूल्याला नको तितके महत्व दिले जाते हेही तितकेच खरे. जिद्दीने हाती घेतलेले काम काही काळातच कालबाह्य झाले आहे हे लक्षातच येत नाही. त्यामुळे अट्टहासापायी चुकीच्या गोष्टीमागे लागून वेळ व परिश्रम वाया घालवले जातात.

अशा प्रकारच्या तिढ्यातून बाहेर पडण्यासाठी आपण आपल्या उद्धिष्टसाध्यतेसाठी केलेल्या आर्थिक गुंतवणुकीच्या आधारे निर्णय घेणे टाळावे. तुमच्या Ph Dच्या संदर्भातच बोलायचे ठरविल्यास आपण किती फी भरली, किती पुस्तकं विकत घेतली वा या काळात मी किती कमवू शकलो असतो इ.इ. प्रश्न अप्रस्तुत ठरतील. प्रश्नच विचारायचा असल्यास तुमच्या प्राधान्यक्रमांच्या यादीत आजही Ph D मिळवणे सर्वात वर आहे की नाही हा प्रश्न विचारायला हवा. (जेव्हा तुम्ही संशोधनास सुरुवात केली त्यावेळी कुठला अग्रक्रम होता याचाही आता विचार करण्याची गरज नाही.)

दृढनिश्चयाच्या मागे लागणे कितपत योग्य आहे याबद्दल मानसतज्ञ विचार करत आहेत. भिंतीवर डोके आपटण्याचे प्रयत्न वेळीच न सोडल्यास तुमच्या आरोग्यावर दुष्परिणाम होण्याची शक्यता बळावते. अनेक तरुण- तरुणींनी

आपली चूक सुधारून वेगळ्या मार्गाने जाण्याचे ठरवल्यानंतर त्यांच्यातील ताणतणाव नाहिश्या झाल्या. एक मात्र खरे की उद्दिष्टपूर्ती अशक्यातली गोष्ट आहे हे कळल्यानंतर त्याची कास सोडण्याचा निर्णय पटकन घेता येऊ शकते. परंतु अशक्यातली की आवाक्यातली हेच कळत नसल्यामुळे अनेकांना अडचणींना सामोरे जावे लागते. उशीरा निर्णय घेतल्यामुळे मानसिक व शारीरीक दुष्परिणाम भोगावे लागतात. नाते संबंध दुरावतात. आयुष्य नीरस वाटू लागते. अर्ध्या वाटेवरून परतीचा निर्णय घेतला याचा अर्थ तुम्ही loser आहात असे कधीच होत नाही.

अरिस्टॉटलच्या मते कुठलीही गोष्टीचे अती होणे (अती जास्त वा अती कमी असणे) आपल्याला हानिकारक ठरू शकते. दृढनिश्चय हीसुद्धा अशीच गोष्ट आहे. फारच कमी असल्यास तुम्ही कमकुवत ठरवले जाता. जास्त असल्यास दुराग्रहीचा शिक्का बसतो. त्यामुळे जास्तही नको व कमीही नको अशा प्रकारचे संतुलन साधणे गरजेचे ठरते. जुगार खेळताना हातात कुठपर्यंत पानं धरून ठेवावीत व केव्हा ती पानं फेकून द्यावीत यातच खरा शहाणपणा असतो. जुगार खेळणारा नेहमीच आपल्या हातातील पानांचा आढावा घेत असतो. हातातील पानं व जिंकण्यासाठीची रक्कम यांचा मेळ तो घालत असतो. परंतु हेसुद्धा तो सुरुवातीला करत नाही. काही हात खेळल्यानंतर त्याचे विचारचक्र चालू होतात. व त्यानुसार तो निर्णय घेतो. परिस्थितीनुसार त्याची strategy बदलते. नवीन माहिती मिळाली की तो पुनर्विचार करू लागतो. धोका पत्करताना तो किती रक्कम जिंकणार आहे, समोरच्या भिडूच्या हातात कुठली पानं असावीत याचा अंदाज घेत तो खेळात भाग घेतो. आयुष्यातील अनेक प्रश्नांसाठीसुद्धा वर उल्लेख केलेल्या जुगाऱ्याचे उदाहरण तंतोतंत लागू होऊ शकते.

जेव्हा आपण एखादी गोष्ट करण्याचे ठरवतो तेव्हा ती गोष्ट आवाक्यातली असून ती पूर्ण करणे शक्य आहे या भरवश्यावरच ते काम आपण हाती घेतो. परंतु एकदा काम हाती घेतल्यानंतर वास्तव वेगळेच असते; आपले अंदाज

चुकीचे ठरतात; काही अडचणी येतात; नेमके काय करावे सुचत नाही; ना धरवत नाही, ना सोडवत नाही अशी वेळ येते. मग आपण कुढत मन मारत काही तरी अघटित घडेल याची प्रतीक्षा करत बसतो. ज्याच्या मागे आपण लागलो आहोत त्यासाठीचे परिश्रम व अपेक्षा वाढतच आहेत याची जाणीव होऊ लागते. योग्य संधी न मिळाल्यामुळे आपण निश्चयापासून डळमळीत होऊ लागतो. हे सर्व करत बसण्यापेक्षा कुटुंबाबरोबर थोडासा वेळ घालवला असता तर बरे झाले असते असे म्हणण्याची पाळी येते.

त्यामुळे वेळीच आढावा घेत, नवीन माहितीचा अंदाज घेत उद्दिष्टपूर्तीसाठी पुनर्विचार करणे गरजेचे ठरते



# सुखाचा शोध

सुखाच्या मागे मागे आपण धावत रहावे का?

कदाचित हा प्रश्न अत्यंत मूर्खपणाचा वाटेल. परंतु सुखी माणसाचा सदरा सापडणे व वाळवंटातील मृगजळ पकडणे दोन्ही सारखेच ठरतील. सुखाचा शोध घेण्याचा मार्ग फारच खडतर आहे याची जाणीव बहुतेकांना आहे व या मार्गावरील खड्ड्यात पडणाऱ्यांची, टक्के टोणपे सहन करत राहणाऱ्यांची संख्यासुद्धा कमी नाही. या मार्गाच्या शेवटच्या टप्प्यात परमसुख मिळणार आहे या आशेने आपण मार्गक्रमणातील दु:ख, वेदना, त्रास, विसरून पुन्हा पुन्हा प्रयत्न करत असतो. भरपूर पगाराची नोकरी, मुबलक (अतिरिक्त!) पैसा (disposable income), प्रशस्त घरात वास्तव्य, आवडत्या संगातीबरोबरचे कौटुंबिक सौख्य, आरोग्यमय जीवन, इत्यादीत अडकून घेतल्यामुळे आयुष्यात या व्यतिरिक्तही काही गोष्टी असू शकतात, त्यातूनही मानसिक समाधान मिळू शकते, हे आपण विसरत आहोत. इतर गोष्टींकडे दुर्लक्ष करत आहोत.

सुखाच्या शोधातील मार्गस्थाला सुरुवातीला अनेक प्रकारच्या उपदेशांना, सल्ल्यांना तोंड द्यावे लागते. काही उपदेश नक्कीच मार्गदर्शी व good sense चे असतात. उदाहरणार्थ, परस्परातील सौहार्दपूर्ण वर्तन, इतरांसाठी त्याग, कृतज्ञता, यातच सुख असून स्वार्थीपणात, अप्पलपोटेपणात नसते, हा उपदेश नक्कीच आपल्याला उपयोगी पडू शकेल. त्याचप्रमाणे संपत्तीच्या मागे धावण्यात, किंवा सत्ता हाशील करण्यासाठी काहीही करत राहण्यात सुख नाही, हा सल्लासुद्धा योग्य ठरेल. परंतु कौटुंबिक सौख्य किंवा भरपूर संपत्ती काही निवडक नशीबवान व्यक्तींनाच मिळते व आपल्या नशीबात ते लिहिलेले नसल्यामुळे आपण प्रयत्न करण्याची गरज नाही, हा सल्ला कदाचित अस्थायी ठरेल.

मुळातच कशामुळे आपण सुखी (वा दु:खी) होतो हेच आपल्याला समजत नसते. म्हणूनच आपण सदान कदा सुखाच्या मार्गापासून भरकटत जातो. अनेक वेळा (आपल्या दृष्टीने) आयुष्याला कलाटणी देणाऱ्या महत्वाच्या

घटना किंवा आपले प्रयत्न - सकारात्मक वा नकारात्मक - फारच कमी प्रमाणात व कमी काळासाठी आपल्या सुख - दु:खात भर घालत असतात, हे आपण लक्षातच घेत नाही.

याचा अर्थ आपण सुखासाठी प्रयत्नच करू नये का? तसे नव्हे. फक्त आपण चांगल्या उद्दिष्टपूर्तीसाठी प्रयत्न करत असताना आपल्या अपेक्षा आपल्या अंदाजाप्रमाणे पूर्ण होतीलच याची खात्री बाळगू नये, एवढाच इशारा देण्याचा उद्देश येथे होता. महत्वाचे म्हणजे आपण अशा प्रयत्नांच्या अनुभवातून जात असताना आपल्याला कशात समाधान व आनंद मिळू शकतो याचा अंदाज येईलच. त्यामुळे आपण उगीचच भव्य दिव्य मोठे काही तरी करत राहण्यापेक्षा ज्या अनुभवाद्वारे समाधान मिळते, त्यातच आणखी वाढ करण्यात गुंतून राहणे, प्रयत्न करत राहणे योग्य ठरू शकेल. आपण जे करत आहोत ते (फक्त) सुखासाठी नसले तरी काही जीवन मूल्यांसाठी त्यांच्या जोपासनेसाठी केलेल्या प्रयत्नात जे समाधान मिळते त्यातच खरे सुख दडलेले असते, याचे भान हवे. बाजारात उपलब्ध असलेली सुखाच्या शोधाबद्दलची शेकडो पुस्तक हीच गोष्ट आलटून पालटून सांगत असतात. परंतु मतितार्थ मात्र एकच असतो.

एकेकाळी सुख-समाधान-मानसिक शांती इत्यादीसाठी भगवंताला शरण जाणे हाच एकमेव उपाय होता. त्यासाठी बाबा, महाराज, माताजी इत्यादी भगवंताच्या दलालांची मनधरणी करावे लागत असे. (आजही असे करणाऱ्यांची संख्या कमी नाही). परंतु आजकाल सुख -समाधानाच्या गुपिताची मक्तेदारी मानसतज्ञांकडे आहे की काय असे वाटत आहे. एकेकाळी धर्मगुरूच्या मठातून वा देवळातून जाणारा हा परमोच्चसुखाचा मार्ग आजकाल मानसतज्ञांच्या क्लिनिकमधून जात असल्यामुळे काळजी वाटत आहे. कारण ही मंडळीसुद्धा अध्यात्माचीच कास धरण्याचा आग्रह करत आहेत.

पूर्वी मानसशास्त्र व तत्वज्ञान एकमेकांच्या पावलावर पाऊल ठेवत जात होते. परंतु सुमारे शंभर वर्षापूर्वी मानसशास्त्र स्वतंत्र वाटेने जाऊ लागली व

तत्वज्ञानापासून फारकत (सोडचिठ्ठी) घेतली. परंतु हे करताना या विषयावर लिहिलेल्या पुस्तकांची वाटणी कशी करावी हा पेच त्यांच्यासमोर उभा राहिला. शेवटी (कंटाळून!) मानसशास्त्राने याविषयाशी संबंधित सर्व पुस्तकं तत्वज्ञानाच्या खोलीत ढकलून दिले. (व ती पुस्तकं अजूनही तेथेच धूळ खात पडलेले आहेत!) परंतु आता एवढ्या वर्षानंतर मानसशास्त्राला या सुख-समाधानावरील पुस्तकांची तीव्रतेने आठवण होऊ लागली आहे. म्हणूनच मानसशास्त्र अती उत्साहाने सुख समाधानाचा शोध घेत आहे.

तत्वज्ञानाला आपल्या जुन्या मित्राला खरोखरच मदत करावयाची इच्छा असल्यास एखाद्या समस्येचे description व त्यासाठीचे prescription यामधील नेमका फरक काय असतो हे मानसशास्त्राला समजावून सांगणे गरजेचे आहे. मानसशास्त्र एखाद्याचे मन नेमके कसे काम करते याचे वर्णन करणारे शास्त्र आहे. परंतु आक्रमक मानसशास्त्रज्ञांना मात्र मानसशास्त्र म्हणजे लोकांनी कसे वागावे व वागू नये हे सांगण्याचे शास्त्र आहे असे वाटू लागले आहे.

कुटुंब वा समाजात राहिल्यामुळे सुख मिळत असल्यास आपले वर्तन कुटुंब - समाज यांच्या अपेक्षाशी सुसंगत असावे असा त्यांचा दावा असतो. उदाहरणार्थ, भोवतालचा समाज धार्मिक असल्यास, तुम्हाला आवडो न आवडो, तुम्हीसुद्धा धार्मिक असणे गरजेचे असते. धर्मपालन रूढी परंपरांचे ओझे तुमच्यावर लादते. परमेश्वरावर विश्वास ठेवण्याची सक्ती करते. मुळात धर्माची शिकवण सत्य काय आहे ते सांगणे असावे; तुम्हाला कशात समाधान मिळते हे सांगण्याचे त्याचे काम नाही. मानसशास्त्र खरोखरच विज्ञानाची भूमिका बजावत असल्यास अशा प्रसंगी तटस्थ असणे अपेक्षित आहे. कारण विज्ञानाला या गोष्टीशी काही देणे घेणे नाही. ते फक्त आपण आपल्या आयुष्याशी झगडत असताना त्यासाठी लागणारे काही ठराविक नियम, काही ठोकताळे, नैसर्गिक घडामोडी याविषयी सांगू शकते. तुम्ही सुखी राहण्यासाठी

काय करत आहात - परमेश्वराला मानता की नाही; देवाची प्रार्थना करता की नाही - याच्याबद्दल विज्ञान काहीही सांगू शकत नाही.

मानसशास्त्रीयदृष्ट्या आपण मानत असलेले मूल्य व त्यांची जोपासना यासाठी करत असलेले प्रयत्न यानाच सुख - समाधानाची साधनं असे समजत असल्यास आणखी काही समस्या उद्भवू शकतात. उदाहरणार्थ, परस्पर सौहार्दता व संबंध हे आपल्या समाधानी आयुष्याचे सूचक आहेत. हे कदाचित मानसशास्त्राला मान्य होणार नाही. यात काही तरी काळे बेरे असावे, असा संशय मानसशास्त्र निर्माण करू शकते. या शास्त्राच्या मते मूल्य किंवा मूल्याविषयीची आपुलकी स्वायत्त असू शकत नाही. म्हणूनच मानसशास्त्र आपल्याला सुखी राहण्यासाठी वेगवेगळे मार्ग सुचवत असते. परंतु आपण काय करावे वा काय करू नये या गोष्टी कालांतराने नैतिकतेच्या अखत्यारीतील विषय होतात. त्यामुळे आपल्याला तत्वज्ञानाला शरण जावे लागते. परंतु तत्वज्ञान आपल्याला काय करावे वा करू नये हे सांगत नाही; फक्त आपण स्वत: निर्णय घेण्याइतके समर्थ व्हावे यासाठी ते प्रयत्न करते.

हेही नसे थोडके!



# आध्यात्मिकता

***आध्यात्मिकतेची (spiritualism) खरोखरच गरज आहे का?***

आज काल 'माझा कुठल्याही धार्मिक कर्मकांडावर विश्वास नाही; मी धार्मिक नाही; परंतु मला आध्यात्मिकतेत(spiritualism) रुची आहे' असे सार्वजनिकरित्या विधान करणाऱ्यांची संख्या दिवसे न दिवस वाढत आहे. जणू काही आध्यात्मिकता म्हणजे एक फॅशन असल्यासारखे त्याकडे बघितले जात आहे. इंटरनॅशनल म्हणून स्वत:च शिक्का मारून घेतलेल्या महागड्या इंग्रजी माध्यमाच्या रेसिडेन्शियल स्कूलमध्ये तर याचे पेवच फुटले आहे. त्यांच्या मते प्रत्येकाला आपले समृद्ध आयुष्य जगण्यासाठी आध्यात्मिक शहाणपणाची (spiritual intelligence) गरज असून विद्यार्थ्यांना अगदी लहानपणापासूनच ते शिकवायला हवे. काही वर्षांपूर्वी emotional intelligence ची हवा होती व आता त्याची जागा आध्यात्मिक शहाणपण घेवू पाहत आहे.

मुळात आध्यात्मिकता ही एक अत्यंत ढोबळ, तकलादू अशी संकल्पना आहे. त्याची शाब्दिक फोड केल्यास ऐहिकतेच्या विरोधातील ही संकल्पना आहे, हे लक्षात येईल. त्याचप्रमाणे आध्यात्मिकता ही वास्तवातील भौतिकतेपेक्षा वेगळे काही तरी सांगण्याचा प्रयत्न करत आहे, हेही लक्षात येईल. विज्ञानातील नियम, तत्व, सिद्धांत याव्यतिरिक्त या जगात इंद्रियजन्य अनुभवाच्या पलिकडे कित्येक - आत्मा, चेतना, अलौकिकशक्ती, अतिंद्रीय शक्ती, इ.इ .- गोष्टी असून त्यांची जाणीव ठेवल्यामुळे आपले आयुष्य समृद्ध होत राहील असा तर्क त्यामागे असण्याची शक्यता आहे. ध्यान, योग, एकांत, प्राणायाम इत्यादीद्वारे मानसिक समाधान मिळू शकते, माणूस चिंतामुक्त होवू शकतो यावर येथे भर दिला जातो. आधुनिक तत्वज्ञ व वैज्ञानिक यांना मात्र आध्यात्मिकता ही एक ऐतिहासिककालीन कालबाह्य व निरुपयोगी अशी एक संकल्पना आहे, असे वाटते.

आपल्यातील काही जणांना आध्यात्मिकतेच्या रूढ अन्वयार्थाऐवजी आयुष्याला आकार देणारे जीवनमूल्य म्हणून त्याकडे पाहावे असे वाटते.

आपल्या सुखी व समाधानी आयुष्यासाठी अन्न, वस्त्र, निवारा, आरोग्य व त्यासाठी पैसा-संपत्तीची ओढ असावी लागते. त्याच बरोबर सौंदर्य, प्रेम, सहानुभूती यांची अनुभूती घेणेसुद्दा गरजेचे असते. निसर्गातील विविधतेकडे, चमत्कारसदृश घटनेकडे विस्मित दृष्टीने बघण्याचीही गरज असते. याप्रकारच्या गोष्टींचे स्पष्टीकरण विज्ञानाच्या आवाक्याबाहेरच्या असल्यामुळे व यासाठीच्या ऐहिक दृष्टिकोनात हिशोबीपणा असल्यामुळे आध्यात्मिकतेला जीवनमूल्य म्हणून स्वीकारायला हवे, असे त्यांना वाटते. परंतु सौंदर्य, प्रेम, आश्चर्य, इत्यादीसाठी आध्यात्मिकता हा शब्दप्रयोग योग्य ठरेल का? मुळात अध्यात्माची भलावण करणारे कुठल्या हेतूने हा शब्द वापरतात याचा नेमका अंदाज येत नाही. या भौतिक जगाच्या पलिकडे काही अज्ञात गोष्टी असून त्यांचा मागोवा घेणे हेच त्यांना अपेक्षित असल्यास आध्यात्मिकता धर्मव्यवहाराच्या जवळ जाणारी संकल्पना ठरेल. धर्म म्हटले की श्रद्धा. ग्रंथ प्रामाण्य, शब्द प्रामाण्य. चिकित्सा न करण्याची अट. त्यामुळे आध्यात्मिकतेसाठीसुद्धा श्रद्धेची गरज आहे, असा निष्कर्ष काढावा लागेल. हेच जर खरे असल्यास अशा प्रकारे आडवळणाने सांगण्याची गरज नाही. शब्दांचा घोळ घालण्यात अर्थ नाही. सरमिसळ करणाऱ्या कसरतीची गरज नाही.

म्हणूनच हा शब्दप्रयोग धार्मिकांच्याच शब्दकोशातच राहू दे, असे म्हणावे लागेल. या प्रकारचा धूसर शब्द प्रेम, आश्चर्य, सौंदर्य इत्यादी जीवनमूल्यांसाठी न वापरता यासाठी वेगळाच कुठलातरी योग्य शब्द रचना शोधण्याची गरज आहे. या ऐहिक जगातच आपण समृद्ध जीवन जगू शकतो, याला पुष्टी न देणारे कुठलेही विधान स्वीकारार्ह नाही हे लक्षात घ्यायला हवे.

आपल्या आयुष्यात कमतरता असून ही कमतरता भरून काढण्यासाठी आध्यात्मिकतेला शरण जायला हवे अशी समजूत असल्यास त्यासाठी कुठून सुरुवात करावी व नेमके काय काय करायला हवे या प्रश्नांची उत्तरं सापडत नाहीत. एके काळी आध्यात्मिक व ऐहिक या संकल्पना स्पष्ट होत्या. त्यांना

समजून घेण्यासाठी कष्ट पडत नव्हते. त्या एकमेकाच्या विरोधात आहेत याची पूर्ण कल्पना होती. आध्यात्मिकतेकडे ओढा असणाऱ्यांनी अंतर्मनाचा वेध घेत घेत, सर्वसंगपरित्याग करून परमेश्वरापाशी पोचण्याची अनुभूती प्राप्त करून घेणे व परब्रह्माशी विलीन होणे यावर भर दिला जात असे. स्वत:चे अस्तित्व आणि ऐहिक सुखाना नाकारणे म्हणजेच आध्यात्मिकता असे समजले जात असे.

परंतु आता हे सर्व बदलत आहे. आध्यात्मिक बुवाबाजीचे प्रस्त वाढत आहे. पूर्वीच्या आध्यात्मिकतेला नवीन साज चढवून विकृत स्वरूपात त्याची मांडणी केली जात आहे. सुखोपभोगाशी हात मिळवणी करत आध्यात्मिकता पुढे जात आहे. एकांतासाठी आता जंगलात जाण्याची गरज नाही.
पंचतारांकित सोई - सुविधा असलेल्या एखाद्या थंड हवेच्या ठिकाणच्या रिसॉर्टमध्ये वास्तव्य करण्यात काही गैर नाही, असे या आधुनिक आध्यात्मिक बुवा, महाराज, बाबाना वाटत आहे. आध्यात्मिकता म्हणजे ध्यान व योग. या व्यतिरिक्त काहीही नाही, ही मानसिकता रूढ होत आहे. योगाचा वापर आरोग्य व विश्रांतीसाठी मुख्यत्वे होत आहे.

एका दृष्टीने आध्यात्मिकतेतील अशा प्रकारचा बदल व त्याची ऐहिकतेच्या जवळ जाणारी लवचिकता स्वागतार्ह आहे. आपण हाडामांसाची माणसं आहोत. त्यामुळे या गोष्टीत आध्यात्मिकता आहे की नाही याची चर्चा करत बसण्यापेक्षा अशा प्रकारची आध्यात्मिकता मानवी जीवन समृद्ध करण्यासाठी हातभार लावते, ही गोष्ट खरोखरच स्पृहणीय ठरेल. परंतु ऐहिकतेचाच विचार करत राहणे हा माणसाचा आदिम स्वभाव असून त्यात सौंदर्यानुभवासारख्या गोष्टी नसल्यास त्या आक्षेपार्ह आहेत, असे अनेकांचा आक्षेप आहे. ऐहिक गरजा पूर्ण झाल्या तरी माणसात कुठे तरी असमाधानाची, अपूर्णतेची भावना असते. पूर्वीच्या काळची आध्यात्मिक संकल्पना त्यासाठी व त्याकाळी नक्किच उपयोगी पडली असावी. पारलौकिकतेचे गाजर पुढे करून माणसावर भुरळ पाडली असावी.

सुखोपभोगाच्या पलिकडे जाण्यासाठी पारलौकिकतेला शरण जायला हवे, यात तथ्य नाही. त्याऐवजी आपल्या अंतर्मनाला समाधान देवू शकणाऱ्या गोष्टीत मन गुंतवून ठेवणे हाही एक (सोपा) मार्ग असू शकेल. आपल्या संवेदनांना अत्युच्च पातळीवर नेवू शकणाऱ्या कला, साहित्य, संगीत, निसर्गाशी जवळीक वा इतर तत्सम प्रकारात मन गुंतवल्यामुळे आपले जीवन नक्कीच समृद्ध होऊ शकेल. ही समृद्धी, आध्यात्मिकवादी सांगतात त्याप्रमाणे, केवळ ध्यानधारणा वा योग-प्राणायाम यातूनच येऊ शकते याला कुठलाही आधार नाही. त्यामुळे अंतर्मनाला समाधान देऊ शकणारे विचार व कल्पना यासाठी जास्त वेळ देत असल्यास या तथाकथित आध्यात्मिकतेची गरजच भासणार नाही.

**प्रतीसाद**

(आळश्यांचा राजा' यांच्या मते आध्यात्मिकतेवर टीका - टिप्पणी करणारे एकूण एक टीकाकार पाखंडी आहेत. पारंपरिक रित्या हजारो वर्षापासून ऋषी - मुनी - तपस्वी यांच्या कडून आलेल्या व पिढ्यान पिढ्या संवर्धित होत गेलेल्या या आध्यात्मिकतेच्या विरोधात एकही शब्द ऐकण्याच्या (वा वाचण्याच्या) मनस्थितीत ते नाहीत असे त्यांच्या प्रतिसादातील अभिनिवेशावरून वाटते. (शक्य होत असल्यास असे काही तरी अर्धवट लिहिणाऱ्यांना त्यांनी शाप देऊन भस्मसात करून टाकले असते.)

आताच्या समाजात ज्या अर्थाने आध्यात्मिकतेचा अर्थबोध होतो त्याचाच थोडक्यात परामर्श घेण्याच्या प्रयत्न लेखात केला आहे. स्वत:ला आध्यात्मिक गुरु म्हणवून घेत सत्संग, संकीर्तन, प्रवचन, योग प्रात्यक्षिके, ध्यान इत्यादींचे रतीब घालत भक्तांची मती गुंग करणाऱ्यांचे पीक मोठ्या प्रमाणात येत आहे. *फक्त माझाच गुरु प्रामाणिक व इतर सर्व भोंदू* असे म्हणत आध्यात्मिकतेच्या आहारी जाणाऱ्यांची संख्या वाढत आहे. त्यामुळे खरोखरच यात काही तथ्य आहे का याचा विचार करण्याची गरज आहे. गंमत म्हणजे प्रत्येक गुरु - बाबा - महाराज यांची आध्यात्मिकतेची व्याख्या वा

त्याविषयीचे समज व्यक्तीनिष्ठ असल्यामुळे सामान्य माणूस गोधळून जाण्याची शक्यता जास्त आहे.

आध्यात्मिकशास्त्राविषयी अधिक माहिती देणाऱ्या दर्शनशास्त्र, वेद, पुराण, धर्मग्रंथ, श्रुती इत्यादींचा अभ्यास न करता ('आळश्यांचा राजा'च्या मते ठोकून) दिलेली ही मतं आहेत. लेखात जे लिहिले आहे ते लेखकाच्या अल्पमतीवर आधारित आहे. आवती भोवती बघितल्यास आध्यात्मिक बुवाबाजीचे ओंगळ स्वरूपच दिसत आहे व त्याच्या बाजारीकरणामुळे मध्यमवर्गीय फसत आहेत म्हणून हा लेख लिहिलेला आहे.

नकारात्मक विचार करण्यापेक्षा सकारात्मकपणे विचार करताना *जी गोष्ट नाही ती नाही असे सिद्ध करणे यापेक्षा जी गोष्ट आहे ती आहे म्हणून सिद्ध करणे तुलनेने सोपे असते* (उदाहरणार्थ: जगात पांढरे कावळे नाहीत याच्या शोधासाठी आटापिटा करण्यापेक्षा जगभरातील सर्व कावळे काळे आहेत हे सिद्ध करणे सोपे ठरू शकते.) म्हणून (आताच्या स्वरूपात असलेली) आध्यात्मिकता कशी बरोबर आहे, वस्तुनिष्ठ आहे, अचूक आहे, टिकाऊ आहे व ज्ञानार्जनेचे, सुख समाधानाचे एक अत्युत्तम साधन आहे, आणि त्यात अजिबात भंपकपणा नाही, असा एखादा अभ्यासपूर्ण लेख लिहिल्यास, किंवा अशा एखाद्या लेखाचा संदर्भ दिल्यास माझ्यासारख्यांच्या ज्ञानात नक्कीच भर पडेल.)



# बिग् बॉस

बिग् बॉस या टीव्हीवर भरपूर टी आर पी कमावणाऱ्या रिया लटी शोला अ लकडे उतरंडीची कळा लागली होती. प्रेक्षकांनी व जाहिरातदारांनी या शोकडे पाठ  फरवली होती. कदा चत आमची माती आमची माणसं याची टी आर पी सुद्धा तुलनेने बरी असू शकेल. सुरुवातीला टीव्ही प्रेक्षकातील आंबटशौकीनांना बिग् बॉसच्या 'त्या बंगल्या'तील चार  भंतींच्या आड नेमके काय घडत आहे याची उत्सुकता होती. ए पसोड एडिटर त्याचा पुरेपूर फायदा घेत प्रेक्षकांची उत्कंठा वाढवत होता. बिग् बॉसला न जुमानता त्याच्याही नजरेआड अनेक गोष्टी घडत असाव्यात. परंतु त्या दाखवल्या जात नाहीत याबद्दल प्रेक्षक नाराज होते.

खरे पाहता 10 -15 सेलिब्रिटीजना एकाच ठिकाणी बाहेरच्या जगापासून दूर कुठे तरी 3 महिने वास्तव्य करण्यास सांगणे अत्यंत क्रूरपणाचे ठरेल. त्या सेलिब्रिटीजना ती एका प्रकारची मृत्युदंडाची शिक्षा आहे असे वाटत असावे. त्यापेक्षा गोयंकांचा 10 दिवसाचा विपश्यना शिबिरातील 'मंगल मौन' परवडला. बिग् बॉसच्या बंगल्यात टीव्ही नाही, मोबाइल नाही, संगणक नाही, लॅपटॉप नाही, इंटरनेट नाही, रेडिओ नाही, आयपॅड नाही, गाणे नाहीत... मग करायचे तरी काय? खाणे - पिणे, नुसत्या गप्पा, बडबड, वा एकमेकांची टिंगल ... टवाळी. किंवा टाइमपाससाठी नाच, गाणी, माकडउड्या, उचलकूद.... परंतु हे सर्व कॅमेऱ्याच्या करड्या नजरेतून... गुलामांचे जिणे.... पैसा कमविण्यासाठी माणूस कुठल्या पातळीपर्यंत जावू शकतो याचे हे एकमेव जिवंत उदाहरण असू शकेल. मात्र दर आठवड्याला एका 'शामळू'ला बंगल्याबाहेर काढताना मजा येत होती. तेवढाच रिलीफ...

बंगल्याच्या मोक्याच्या ठिकाणी CCTV कॅमेरे ठेवल्यामुळे बिग बॉसची करडी नजर आपल्याला हवे ते करू देत नाही, ही एकमेव खंत बहुतेकांच्यात होती. मुळात सेलिब्रिटीजची जनसामान्यात असलेली प्रतिमा आणि

बिगबॉसच्या बंगल्यातील त्यांचे वर्तन यात फार मोठा फरक जाणवत होता. एक - दोन दिवसाचा पाहुणा म्हणून आलेल्या शक्ती कपूरच्या आवतीभोवती 10 -15 तरुणी असूनसुद्धा त्याच्यात खलनायकी हावभाव, अचकट विचकट हातवारे, द्वयर्थी संवाद यांचा कुठेही मागमूस नव्हता. शक्तीकपूरचे असले 'जंटलमन' वागणे प्रेक्षकांच्या दृष्टीने विसंगत होते. यातच या सिरियलचे भवितव्य लक्षात आले व शो फ्लॉप होऊ लागला. बिग् बॉस म्हणवून घेणाऱ्या संजय दत्त व सलमानखान या जोडगोळीला मात्र हळू हळू उतरत चाललेल्या टी आर पी ची खंत नव्हती. बिग् बॉसच्या प्रत्येक एपिसोडसाठी एवढ्या मोठ्या प्रमाणात पैसा ओतल्यानंतरसुद्धा टीव्ही प्रेक्षक बिग् बॉस न बघता चॅनेल बदलून जय गणेश, जय हनुमान सारख्या ऍनिमेशन फिल्म्स् बघतात याचा अर्थ काय? या प्रश्नाला बिग् बॉसच्या निर्मात्याकडे उत्तर नव्हते. या स्थितीत निर्माता असताना त्याची भेट एका संगणकतज्ञाशी होते व हा संगणक तज्ञ टी आर पी वाढविण्याची एक नामी युक्ती सुचवतो.

*"माणसाचा मेंदू हा विचार व कृती करण्यासाठीचा आपल्या शरीरातील इंजीन आहे. आणि महत्वाचे म्हणजे तो अमूर्त स्वरूपात नसून प्रत्यक्षपणे शरीरात घर करून आहे व त्याचे फिजिकल अस्तित्व जाणवते. त्यामुळे मेंदूच्या पृष्ठभागावर होत असलेल्या सूक्ष्म बदलावरून माणूस नेमका काय विचार करत आहे, कुठल्या कृतीचे नियोजन करत आहे, कुठल्या कृतीला अग्रक्रम देत आहे...याचा अचूक अंदाज घेणे माझ्या परम - 100 या संगणकामुळे आता शक्य होणार आहे. परम - 100 च्या आज्ञाप्रणालीच्या काही मर्यादा असल्या तरी बिग् बासच्या बंगल्याच्या आवारातील एखाद्या बंदिस्त खोलीत अत्यंत गुप्तपणे इन्स्टाल करून त्याला विशिष्ट प्रकारचे CCTV कॅमेरे जोडल्यास आपले काम फत्ते होईल. बंगल्यातील प्रत्येकाच्या हालचालींची कॅमेरा स्कॅनिंग करून नोंद ठेवील व या संगणकाला कॅमेराच्या स्कॅनिंगवरून त्या व्यक्तीच्या मेंदूची स्थिती कळेल. व मेंदूच्या स्थितीवरून ती व्यक्ती पुढील काही मिनिटात नेमके काय करू शकेल याचा अचूक अंदाज घेत*

*त्याचे पूर्ण चित्रण आपल्याला उपलब्ध करून देईल. आपण हेच स्प्लिट स्क्रीन वर दाखवल्यास धमाल येईल. टी आर पी वाढेल... जाहिराती वाढतील...*

*संगणकाची कार्यप्रणाली भरपूर गुंतागुंतीची आहे हे मान्य करूनसुद्धा नियंत्रित वातावरणात 10-15 सेलिब्रिटीजच्या मेंदूत काय स्थित्यंतर होतात यावरून त्यांची पुढची कृती काय असू शकेल याचे निदान करणे शक्य होईल. संगणकाची ही आज्ञाप्रणाली प्राथमिक स्वरूपात असल्यामुळे संगणक फक्त पुढील काही मिनिटाचाच अंदाज देऊ शकेल. ही त्याची मर्यादा आहे. त्यानंतर अंदाजातील लहानातील लहान चूकसुद्धा कार्यप्रणालीला कोसळून टाकेल व संगणक निकामी होईल.*

*संगणकाची ही करामत प्रेक्षकांना नक्कीच आवडेल. प्रत्यक्ष सहभाग घेणाऱ्या व्यक्तीलासुद्धा माहित नसणाऱ्या गोष्टी संगणकाद्वारे प्रेक्षकांना यानंतर कळू शकतील.*

*याचीच पुढची पायरी म्हणजे सेलिब्रिटीजच्या मेंदूचा ताबा घेत आपल्याला हवे तसे त्यांच्याकडून कृती करून घेणे. transcranial magnetic stimulationचा वापर करून संगणक सेलिब्रिटीजच्या विचार व कृतीवर नियंत्रण ठेवू शकेल, हवे तसे त्यांच्या कडून काम करून घेऊ शकेल, संवाद म्हणवून घेऊ शकेल. एवढेच नव्हे तर संगणक आपला ताबा घेतला आहे याचा थांगपत्ताही सेलिब्रिटीजना लागणार नाही. ते जे काही करतात ते सर्व त्यांच्या स्वतःच्या निर्णयानुसारच करत आहेत असेच त्यांना वाटेल. त्यामुळे संशयाला अजिबात जागा नाही. स्क्रिप्ट रायटरला (व प्रेक्षकांना) जे हवे ते आपण या संगणकामुळे देऊ शकू याची मला खात्री आहे."*

निर्माता अवाक् होऊन हे सर्व ऐकत होता.

Source: The Deterministic Thesis of the French Mathematician Pierre - Simon Laplace (1749-1827)

***

पियरे लॅप्लास या फ्रेंच वैज्ञानिकाच्या मते भौतिकीतील एकूण एक सिद्धांतांची व नियमांची इत्थंभूत माहिती व विश्वभरातील प्रत्येक कणांचे विशिष्ट स्थान यावरून भविष्यात कुठे कुठे काय काय घडू शकते याचा अचूक अंदाज घेणे शक्य आहे. (Laplace's Demon) परंतु क्वांटम सिद्धांताने पूर्व स्थितीवरून कार्य कारण प्रक्रियेतून प्रत्येक वेळी अचूक अंदाज येईलच याची खात्री देता येत नाही, असे सिद्ध करून दाखविले आहे. त्यामुळे लॅप्लासची भविष्यातील निश्चिततेच्या संबंधीची भविष्यवाणी खोटी ठरत आहे. लॅप्लासच्या कल्पनेतील निश्चिततेपेक्षा कित्येक पटीत अनिश्चितता या विश्वात आहे, याबद्दल दुमत नसावे.

क्वांटम प्रक्रिया व त्याचा प्रभाव अणू रेणूंच्या सूक्ष्मपातळीवर घडत असल्यामुळे आपल्या विश्वातील व्यवहारांचा मागोवा घेण्यासाठी लॅप्लासचे विधान अजूनही लागू होऊ शकते. कारण या विश्वातील प्रत्येक घटनेमागे काही ना काही कारण असतेच. त्यामुळे कार्यकारणभावाच्या मधूनच घटनांचा वेध घेणे शक्य होत आहे. लॅप्लासचा निरीक्षक म्हणून आपण काम करताना पूर्णपणे अचूक अंदाज करू शकत नसलो तरी काही प्रमाणात तरी भविष्यातील घटनांचा वेध घेऊ शकतो. त्यामुळे संगणकतज्ञाचा परम -100 या संगणकासंबंधीचे विधान सैद्धांतिक पातळीवरील एक संभाव्य संकल्पना आहे असे म्हणण्यास भरपूर वाव आहे. .

परम - 100 संगणकाच्या अंदाजावरून बिग् बॉसचा शो बघताना तो कितपत प्रेक्षकाना आवडेल याविषयी शंका आहेत. कदाचित त्यांचा अपेक्षाभंग होईल. सेलिब्रिटीजचे वेळोवेळचे वर्तन वा विचार हा त्यांच्या मेंदूच्या स्थितीगतीवरून व भोवतालच्या त्या वेळच्या परिस्थितीवरून संगणकानी वर्तविलेल्या अंदाजाप्रमाणेच घडत जाणार आहेत. बिग् बॉसच्या शोमध्ये भाग घेणारे संगणकाच्या हिशोबाप्रमाणे वागणार आहेत. म्हणजेच हे सेलिब्रिटीज संगणकाच्या हातातील बाहुल्यासारखे नाचणार आहेत असे म्हणावे लागेल. मुळात प्रेक्षकांना सेलिब्रिटीजना संगणक नाचवतोय की

एपिसोड दिग्दर्शक नाचवतोय हेच कळणार नाही. किंवा संगणक परम -100 हा फक्त शोपीस आहे असेही वाटण्याची शक्यता आहे.

*आपण ही समस्या कशा प्रकारे हाताळणार आहोत?*

एक शक्यता अशी आहे की हे संगणक, ही आज्ञाप्रणाली, त्यातून मिळालेले अंदाज हे सर्व खोटे आहेत व या गोष्टी शक्य नाहीत, असे म्हणत ही संकल्पनाच पूर्णपणे नाकारणे. मुळात माणूस प्राणी हा free will वर जगणारा प्राणी आहे. *मी जे करतो ती माझी स्वत:ची जाणीवपूर्वक केलेली कृती असून त्यात कुणीही ढवळा ढवळ करू शकणार नाही,* याचा मनुष्य प्राण्याला गर्व आहे. माणसाकडे मुक्त स्वातंत्र्य असल्यामुळे संगणकाच्या इशाऱ्यानुसार तो कधीच वर्तन करणार नाही.

परंतु अशा प्रकारच्या नकारात्मक प्रतिसादातून जी गोष्ट आपल्याला आवडत नाही तिचा आपण स्वीकार करणार नाही असा अर्थ ध्वनित होतो. आपल्याला परम - 100 संगणक ही संकल्पना संभाव्य आहे की नाही याची कारण मीमांसा करायची आहे, फक्त *ते शक्य नाही* असे तुटक उत्तर नको आहे.

दुसरी शक्यता अशी आहे की क्वांटमच्या अनिश्चिततेच्या सिद्धांताला शरण जाणे. येथेही आपल्या पदरी निराशाच येणार आहे. निश्चिततेच्या संबंधात आपण ज्या प्रकारे कल्पना लढवू शकतो वा विचार प्रयोग करू शकतो त्याच्या कित्येक पटीत अनिश्चितता या जगात आहे, असेच क्वांटम सिद्धांत विधान करते. कार्यकारणांची जंत्री कितीही अचूक वाटत असली तरी एखाद्या यादृच्छिक घटकाचा (random element) शिरकाव झाला की संभाव्यता कोसळून पडते व अनिश्चितता वरचढ होते. खरे पाहता आपण विचारपूर्वक केलेल्या कृतीत यादृच्छिक घटक असू नये याची पुरेपूर खात्री करून घेतलेली असते. तरीसुद्धा निश्चित स्वरूपातील प्रक्रियेला कुठे तरी तडा जावून आपण अनिश्चिततेच्या भोवऱ्यात सापडतो. मुक्त स्वातंत्र्य आपल्याला या कठिण प्रसंगातून बाहेर काढणे अपेक्षित असते. परंतु तसे सहसा होत नाही.

वरील प्रश्नाला अजून एका प्रकारे उत्तर देता येईल.

परम - 100 संगणक जे काही सांगत आहे त्याला शिरसावंद्य मानून त्या आज्ञांचा स्वीकार करणे आणि असे केल्यामुळे आपल्या free will ला तडा जात नाही असे समजून वर्तन करत राहणे. संगणकाची आज्ञा पाळल्यास आपल्या विचार वा कृती स्वातंत्र्याला धक्का लागत नाही याची खात्री बाळगणे. संगणकानी *अमुक खाद्य पदार्थ खा वा अमुक मैत्रिणीशी गप्पा मार* असे सांगितल्यास ती आज्ञा आहे असे न मानता तो सर्वस्वी स्वत:च निर्णय होता, व त्या निर्णयाशी संगणकाचा संबंध नाही या गृहितकावर विश्वास ठेवत कृती करत राहणे, हेही त्या प्रश्नाचे उत्तर असू शकेल. परंतु हेच खरे असल्यास बिग् बॉसच्या बंगल्यातील सेलिब्रिटीज स्वत:च्या मनाप्रमाणे वागण्यास स्वतंत्र आहेत, या विधानाला काही अर्थ उरत नाही.

मुळात मुक्त स्वातंत्र्य ही संकल्पनाच या गदारोळात खोटी ठरत आहे. आपण विचारांती निवडलेली व जाणीवपूर्वक केलेल्या कृतीचे असे धिंडवडे निघत असतील तर मुक्त स्वातंत्र्याची संकल्पना बाद ठरते; जरी केलेली निवड काही क्षणापूर्वीची असो की फार दिवसापूर्वीची असो!

म्हणूनच कदाचित नशीब, दैव, नियती.. या संकल्पना अनादी काळापासून रूढ झाल्या असाव्यात!



# फ्युचर शॉक!

"ढीपू, काय आश्चर्य! किती वर्षांनी भेटत आहेस.... वीस वर्ष तरी झाले असतील... कॉलेजमध्ये असताना... हे काय तुझ्या हातात पिस्तूल...?"

"मी तुला ठार मारण्यासाठी आलोय." ढीपूचे उत्तर, "तेही तुझ्याच लेखी संमतीने.."

"तू काय बोलतोस, कशाबद्दल बोलतोस... काही समजत नाही."

"तुला आठवत नाही का कॉलेजच्या हॉस्टेलवर गप्पा मारत असताना शंभर वेळा तरी तू बोलला असशील... मी कधीतरी कम्युनिस्ट पक्ष सोडून दुसऱ्या कुठल्याही पक्षात गेल्यास गोळी घालून मला ठार करा. आज तू तृणमूल कॉंग्रेस पक्षाचा आमदार आहेस. पक्ष बदललास. तुझी तत्वनिष्ठा ढासळली. त्यामुळे तुला आता मरावे लागेल."

" वेडा की खुळा!... वीस वर्षापूर्वीची गोष्ट... तू आज उकरून काढत आहेस.... मी त्यावेळी तरुण होतो..... आयडियालिस्टिक होतो..... एवढ्याशा कारणावरून माझ्यावर गोळी...."

" कारण क्षुल्लक नाही... अत्यंत गंभीरपणे, प्रामाणिकपणे, जबाबदारीने, राजीखुशीने, कुठलेही नशापाणी न करता तू ते विधान केला होतास. तसे तू लिहूनही दिला होतास. त्यावर चार साक्षिदारांच्या सह्या आहेत. आता तू ते नाकारू शकत नाहीस. ... हे कसले तरी तुझ्याविरुद्धचे कुभांड आहे असे म्हणण्यापूर्वी अजून एक गोष्ट लक्षात ठेव. अलिकडेच तुझ्या पक्षाने बहुमताच्या जोरावर एक कायदा पास करून घेतला आहे. त्या कायद्यानुसार कुठलिही व्यक्ती इच्छामरणाविषयीचा उल्लेख मृत्युपत्रात केलेला असल्यास त्याची अंमलबजावणी करणे बंधनकारक आहे. भविष्यात कधीतरी तुझ्यात बुद्धीभ्रंशाची लक्षणं दिसल्यास तुला मारून टाकण्यात यावे अशा मजकूराचा इच्छापत्र लिहू शकतोस. व त्याची अंमलबजावणी तुझ्या पक्षाचे सरकार

नक्कीच करेल. भविष्याऐवजी तू तूझ्या भूतकाळात उल्लेख केलेल्या इच्छेस मान देऊन तुला आता का मारू नये?"

"मी... मी... तुझ्या या सर्व प्रश्नांची उत्तरं नक्कीच देऊ शकतो." आमदार ओरडला, "मला थोडासा वेळ दे."

ढीपू पिस्तुलावरील पकड घट्ट करून चाप ओढून आमदारावर ऱोखून धरला. "तुला काय सांगायचे ते पटकन सांग. मला वेळ नाही..."

***

आमदाराकडे सांगण्यासारख्या भरपूर गोष्टी आहेत. परंतु तत्पूर्वी आपण यासंबंधी एक मूलभूत प्रश्न विचारू शकतो. स्वत:विषयीचे भविष्यकाळातील निर्णय घेण्याचा अधिकार आपल्याला कुणी बहाल केला? कदाचित याचे उत्तर असे असू शकेल:

आपण आपल्यासंबंधी भूतकाळात शेकड्यानी निर्णय घेतलेले आहेत. वर्तमानातील आजच्या घडीतील निर्णय घेण्यास आपल्याला कुणीही अडवू शकत नाही. त्यामुळे भविष्याकाळातील स्वत:संबंधीचे निर्णय घेतल्यास बिघडले कुठे? उदाहरणार्थ, घरासाठी कर्ज, कारलोन, इत्यादी घेताना भविष्यकाळात आम्ही घेतलेले कर्ज हप्त्या-हप्त्याने फेडू अशी हमी देत असतो. पेन्शन प्लॅन वा विमासंरक्षणासाठी सहीनिशी संमती देत प्रिमियम भरत असतो. मरेपर्यंत नसले तरी काही निर्दिष्ट कालावधीसाठी आपण दिलेली हमी स्वीकारार्ह ठरते. व तो निर्णय आपल्यावर बंधनकारक असतो. प्रतिज्ञा पत्र, हमी पत्र, कुलमुखत्यारपत्र इत्यादी प्रकारच्या कागदपत्रावर भविष्यातील निर्णयप्रक्रियेशी संबंधित गोष्टीविषयी बिनदिक्कतपणे सह्या करत असतो. या नंतरच्या काळात आपली मानसिक स्थिती काय असेल वा बदलत्या परिस्थितीत आपण घेतलेला त्या वेळचा निर्णय आपल्याला गोत्यात तर आणणार नाही ना याची फिकीरही आपल्याला नसते.

आपण दिलेल्या आश्वासनाची पूर्ती करणे आपले कर्तव्य आहे. जरी भविष्यातील आपली स्थिती - गती, आपले विचार, आपल्या नीतीमत्तेच्या

कल्पना, बदलल्या तरी या कर्तव्यात किंचितही कसूर करता येत नाही. अनेक जण ऐन तारुण्यात *मी अमुक अमुक केल्यास मला फासावर लटकवा* असे बिनदिक्कतपणे चारचौघात बढाया मारत असतात. जरी भावनेच्या भरात ते असे काही बरळत असले तरी त्यात मोठ्या प्रमाणात प्रामाणिकतेचा अंश असतो. शिवाय आपण स्वत:चे निर्णय स्वत: घेण्याच्या वयात आलेलो आहोत हेही जगाला दाखविण्याची खुमखुमी असते. त्यामुळे अशा प्रकारची आचरट विधानं करताना भविष्यात काय वाढून ठेवले असेल याची अजिबात कल्पना त्यांनाही नसती व ऐकणाऱ्यांनाही नसती. त्यामुळे असे विधान करणाऱ्यांना त्या विधानापोटी वेठीस धरणे सयुक्तिक ठरणार नाही.

अगदीच खून न करता वीस वर्षापूर्वीची आपली राजकीय मतं बदलणाऱ्याला शिक्षा द्यायला हवी, यात काही चूक आहे का? वीस वर्षापूर्वी लग्नाच्या बोहल्यावर चढताना नववधूला दिलेली आश्वासनं न पाळल्यास समाज शिक्षा देतोच की. त्याच न्यायाने तत्वनिष्ठा बदलल्यास शिक्षा का नाही?

तत्वनिष्ठा आणि विवाहबंधन यात फरक आहे. विवाहबंधन तोडताना बायको - मुलं यांचा विचार करावा लागतो. इतक्या सहजासहजी त्या जबाबदारीतून मुक्त होता येत नाही. तसा प्रयत्न केल्यास इतरांना क्लेश होतो, त्रास होतो. व हे समाजाला मान्य होणार नाही. परंतु राजकीय तत्वनिष्ठा वा धार्मिक मतं बदलल्यास त्यातून इतर कुणालाही इजा होत नाही. ती सर्वस्वी वैयक्तिक मतं असतात. व ही मतं बदलत गेल्यामुळे आपण कुठल्याही प्रकारच्या कराराचा भंग करत नाही.

एक मात्र खरे की आपण जेव्हा भविष्यातील कालखंडासाठी एखादा निर्णय घेत असतो तेव्हा आपली मानसिक स्थिती त्या निर्दिष्ट कालखंडात कशी असेल याची अजिबात कल्पना आपल्याला नसते. त्याचा अंदाजही आपण करू शकत नाही. आपण सतत बदलत असतो. आपले विचारं, आपली मतं बदलत असतात. आजचे आपण उद्या नसतो. त्यामुळे आपल्या वतीने घेतलेले

भविष्यासाठीचे निर्णय आपल्यासाठी नसून त्या बदलत गेलेल्या दुसऱ्याच कुठल्यातरी व्यक्तीसाठी आहे की काय असे वाटू लागते. त्यामुळे तो निर्णय आपल्यावर बंधनकारक ठरत नाही.

हेच जर खरे असेल तर मृत्युपत्रांची वा इच्छापत्रांची अंमलबजावणी कशी करायची? मुळात असल्या कागदपत्रात भविष्यात जेव्हा आपल्या बुद्धीवर आपला ताबा नसतो त्यासाठी नेमके काय काय करावे याची माहिती व बंधनकारक सूचना असतात. त्यासाठीचा निर्णय 'आता'चा बुद्धीने विकलांग झालेल्यानी न घेता भूतकाळातील जबाबदार व्यक्तीने घेतल्या आहेत व त्या अत्यंत योग्य आहेत, हेच ती कागदपत्रं सूचित करत असतात. म्हणूनच मृत्युपत्र कितीही वेळा बदलण्याची मुभा असते.

आमदाराचे ढीपूला देण्यात येणाऱ्या उत्तरात हे सर्व मुद्दे यायला हव्यात. हा तार्किक विचार ढीपूला समजावून द्यायला हवे.

परंतु हे उत्तर ऐकून ढीपू पिस्तूलच्या चापावरील पकड सैल करतो की घट्ट करतो हा एक अत्यंत वेगळा विषय ठरेल.



# झांशीची राणी

आजकाल मानसीचा दुपारचा वेळ फारच चांगल्या प्रकारे जात होता. मस्त जेवण, (अधून मधून चायनीज), थोडीशी वामकुक्षी, सटर फटर वाचन, व नंतर 42 इंची फ्लॅट स्क्रीनसमोर बसून आलटून पालटून दोन - तीन टीव्ही चॅनेल्सवरील पुनर्जन्मावरील मालिका बघणे यात वेळ कसा भुर्रकन उडून जात होता याची ती कल्पना करू शकत नव्हती. पोटात मूल वाढत असल्यामुळे डॉक्टरानी सक्तीच्या विश्रांतीची शिक्षा सुनावली होती. 12-15 तास (तेही ऑफिसचे काम न करता!) कसा घालवावा याची तिला पहिल्या पहिल्यांदा धास्ती होती. परंतु या टीव्ही सिरियल्सने तिचा प्रश्न चुटकीसरशी मिटवला. कुतूहल म्हणून मानसी या मालिका पाहू लागली. व त्या तिला चक्क आवडू लागल्या. एवढेच नव्हे तर हे सर्व खरे असावे यावर तिचा हळू हळू विश्वासही बसू लागला. आत्मा अमर आहे व हा आत्मा एका शरीरातून दुसऱ्या शरीरात जाऊ शकतो यात शंका घेण्यासारखे काय आहे, याचे तिला आश्चर्य वाटू लागले. शंका घेणारे मूर्ख, बावळट वा मुद्दाम खोड्या काढणारे असावेत व त्यांच्याकडे दुर्लक्ष करावे या निष्कर्षाला ती पोचली. भगवद्गीतेत खुद्द श्रीकृष्णाच्या मुखातूनच या गोष्टी सांगितल्याचे तिला अंधुकसे आठवत होते. (*गाइड* या चित्रपटातील शेवटच्या दृश्यातील देव आनंदचे ते 'स्वगत' भाषण ती विसरू शकत नव्हती.)

परंतु मानसी स्वस्थ बसणारी तरुणी नव्हती. पुनर्जन्माचे भूत तिच्या अंगी संचारले होते. इंटरनेटवर तिने शोधाशोध केल्यानंतर त्या शहरातील पुनर्जन्म'तज्ञां'चे काही पत्ते तिला मिळाले. *चला, आपण पूर्वजन्मी कोण होतो याचा एकदा सोक्षमोक्ष तरी लावू या* या उद्देशाने (बाहेर जाण्यासाठी डॉक्टरांची पूर्व परवानगी घेऊन) ती एका तज्ञाच्या ऑफिसात येऊन धडकली. पर्समध्ये पैसे खुळखुळत होते. 'कहानी' चित्रपटातील विद्या बालन टाइपची तिची स्थिती बघितल्यावर अपॉइंटमेंट नसतानासुद्धा तज्ञानी चेंबरमध्ये तिला बोलविले. तज्ञाच्यापुढे दक्षिणेची रक्कम ठेवून त्याच्यासमोर जाऊन बसली. तज्ञ या

'विषया'वर भलताच तरबेज होता. काही जुजबी प्रश्न विचारल्यानंतर आपले डोळे मिटून तोंडातून काही तरी पुटपुटत मानसीला *तू पूर्वजन्मी झांशीची राणी होती* म्हणून सांगितले. क्षणभर तिला स्वत:वर विश्वासच बसेना. मानसी आणि झांशीची राणी... हे कसे शक्य आहे? हातात तलवार व पाठीला एक मूल बांधून घोड्यावर बसलेल्या झांशीच्या राणीशी व मानसीच्या सौम्य, मध्यमवर्गीय व्यक्तिमत्वाशी कशी काय सांगड घालता येईल? हा विचार तिच्या मनात येत राहिला. आणि पुनर्जन्माबद्दलच्या तिच्या मतात फरक पडू लागला.

Source: An Essay Concerning Human understanding by John Locke (1706)

***

जगभरात असंख्य लोकांना पुनर्जन्म वा पूर्वजन्म यावर विश्वास आहे, हे नाकारण्यात अर्थ नाही. या संकल्पनेचे अनेक पैलू असले तरी मूळ संकल्पना अनेकांना आकर्षित करत राहते. ही संकल्पना पूर्णपणे चुकीची आहे असे म्हणण्यास भरपूर वाव असूनही हा विषय अधून मधून चर्चेला येतच असतो. एक क्षणभर आत्म्याचे अस्तित्व मान्य करून हा आत्मा पुनरावतार घेऊ शकतो यावर विश्वास ठेवला तरी पुढे काय? हा प्रश्न तसा अनुत्तरितच राहतो. जनुकासारखे आत्म्यात काही कोडिंग असते का? कुठे पुनरावतार घ्यावे यासाठी अंतर, काळ, वेळ, जाती-प्रजाती, भाषा, वर्ग, वर्ण इत्यादींचे बंधन असते का? एका शरीरातून दुसऱ्या शरीरात प्रवेश करण्यासाठीच्या मधल्या काळात हा आत्मा कुठे भरकटत असतो? कुठल्या शरीरात जावे हे तो कसे काय ठरवतो? एकच आत्मा एका निर्दिष्ट क्षणी दोन - चार शरीरात जाऊ शकतो का? हत्तीचा आत्मा मुंगीच्या शरीरात कसे काय जाऊ शकतो?असले असंख्य प्रश्न व या प्रश्नासंबंधीचे विचार मानसीच्या डोक्यात भुणभुणत होत्या. मुळात स्वत:च्या पुनर्जन्माची हकीकत लोकांना एवढे का आवडते? त्या नेहमीच बोलबाला असलेल्या व्यक्ती, वा सत्ताधारी वा प्रतिभावान, वा

सौंदर्याचे पुतळे, वा नुकत्याच मृत्यु पावलेले जवळचे नातेवाइक ... असे का असतात? आपण कुणी तरी ग्रेट होतो या मानसिक समाधानापायी कदाचित आपण या पुनर्जन्माच्या आहारी जात असावे. *मागच्या जन्मी तू हिप्पोपोटोमस वा डुक्कर म्हणून जन्माला आला होतास* असे तथाकथित तज्ञ सांगू लागल्यास तज्ञांना उपाशीच मरावे लागेल.

मानसीला अशा प्रकारच्या आत्म्याच्या पुनर्जन्माच्या विविधतेबद्दलही वैषम्य वाटायचे कारण नव्हते. मात्र *माझ्या आताच्या आत्म्याचा संबंध त्या झांशीच्या राणीच्या आत्म्याशी कसे काय जोडता येईल* याबद्दल तिच्या मनात शंका होत्या. खरे पाहता स्त्रीचा आत्मा स्त्रीच्या शरीरात व पुरुषाचा पुरुषाच्या शरीरात या लिंगभेदभावाची जाण आत्म्याला कशी काय आली हे तिच्या दृष्टीने न सुटलेले कोडे होते.मानसीला यात काही काळेबेरे असावे असे वाटू लागले. पहिल्याच झटकेला हे सर्व खोटे, रचलेले, लुबाडणूक करणारे आहे हाच विचार तिच्या मनात आला.

यातही आश्चर्य वाटण्यासारखे काही नाही. आपण आपल्या पूर्वजन्माऐवजी याच जन्मातील आपल्याच भूतकाळात जेव्हा डोकावतो तेव्हासुद्धा आपलाच आपल्यावर विश्वास बसत नाही. लहानपणी केलेली मौजमजा, त्या काळातील आपले अनाकलनीय वर्तन, आपले समज - गैरसमज इत्यादींची आजच्या आपल्याशी तुलना केल्यास भूतकाळातील त्या व्यक्तीशी आपला संबंध नाही असेच वाटण्याची शक्यता जास्त असते. मुळात मानसिकरित्या आपण बालपणीच्या 'त्याच्या वा तिच्या'शी जोडलेलो नसल्यामुळे वा त्यातील मानसिक सातत्याच्या अभावामुळे आताचे आपण दुसरेच कोणी तरी आहोत ही भावना मूळ धरू लागते.

ऐन तारुण्यात 20-25 वेळा पाहिलेले चित्रपट आज पाहताना त्यावेळी असले भिकार चित्रपट कसा काय पाहू शकलो याचे आश्चर्य वाटल्यावाचून राहणार नाही. त्या काळात चोरून मिटक्या मारत, वाचलेल्या कथा-कादंबऱ्यांकडे आज आपण ढुंकूनही पाहणार नाही. जॉय मुखर्जी, विश्वजित,

शम्मीकपूर यासारख्या बेढब हीरोंच्यावर आपण कसे काय फिदा झालो होतो हा प्रश्न वारवांर विचारावासा वाटल्यावाचून राहणार नाही. त्याचवेळी आपण आपल्या मागच्या पिढीतील बालगंधर्व, वीर वामनराव, के एल सायगल यांच्या भक्तगणांना वा भारत भूषण वा प्रदीपकुमारसारख्या मख्ख चेहऱ्याच्या हीरोंच्या चाहत्यांना शिव्या घालत होतो याचीही आठवण आल्यावाचून राहणार नाही. फक्त आपले आजचे व्यक्तिमत्व या प्रकारच्या आठवणीतून, अनुभवातून बाहेर येत येत आज आपण जे आहोत तिथपर्यंत पोचलेले आहे.

याच आयुष्यातील आत्म्याचे हे थेर लक्षात आल्यावर पूर्वजन्मीच्या आत्म्याशी आपली कशी काय नाळ जोडता येईल? मानसी ही एके काळी झांशीची राणी होती हे पुराव्यानिशी सिद्ध करणे गरजेचे आहे असे तिला वाटू सागले. तिच्या आजच्या आयुष्यात झांशीच्या राणीच्या किमान काही छटा जरी आढळले तरी तिचा त्या तज्ञाच्या विधानावर विश्वास बसला असता. झांशीची राणी व ती फक्त स्त्री आहेत याशिवाय दुसरे कुठलेही सबळ कारण तिच्यासमोर नव्हते. मुळात मानसीला झांशीच्या राणीच्या गत इतिहासाबद्दल काहीही माहित नव्हते हेही कबूल करायला हवे.

परंतु आपण योग्य प्रकारे तर्कनिष्ठ पद्धतीने आत्म्याविषयी विचार करत असल्यास जरी आत्मा शरीराच्या मृत्युपासून स्वत:ची सुटका करून घेत असला तरी शारीरिक मृत्युनंतर आपली मात्र कायमची सुटका होते. आपले स्वत्व हरवून जाते. स्वभान नष्ट होते. आपले स्वभन आपल्या मानसिक सातत्याचा भाग असल्यामुळे त्याला शरीरापासून वेगळे करता येत नाही. स्वत्व वा स्वभान ही काही वेगळे काढून ठेवता येण्यासारखी वस्तू नव्हे. आत्म्याचे अमरत्व आपल्या स्वभानाचा पुरावा होऊ शकत नाही. आत्म्याचेच नव्हे तर आपले हृदय, हात, पाय वा इतर कुठलेही अंग हजारो वर्षे कृत्रिमरित्या जिवंत ठेवण्यास वैज्ञानिक यशस्वी झाले तरी त्यांच्यात आपले 'स्वभान' शोधता येत नाही.

आपण आपल्याच बालपणीचा फोटो पाहिला तरी आपला आणि त्या फोटोचा काही संबंध नाही ही गोष्ट लक्षात येईल. घरातील वडील मंडळींनी *हा तू रांगत असताना काढलेला फोटो* असे ठासून सांगितल्याशिवाय आपण त्यात आपला चेहरा बघू शकत नाही. *मी खरोखरच अशी होती का* असेच मानसीला फोटो बघून वाटले असेल. मुळात बालवयातील गोष्टीत आपल्या मानसिकतेचे सातत्य क्षीण होत गेलेले असते व काही वेळा ती अस्तित्वातच नसते.

म्हणूनच आताची मानसी ज्या प्रकारे तिच्या बालपणातील 'मी'ला नाकारते तसेच ती आपल्या पूर्वजन्मीच्या झांशीच्या राणीला नाकारत नसेल ना?



# झेनोच्या कासवाची रेस

ग्रीक साम्राज्यातील अथेन्स शहरात त्या दिवशी जल्लोश होता. अथेन्स शहरातील एकूण एक श्रीमंत (व त्यांच्या fashionable बायका!) रेसच्या मैदानावर गर्दी करत होते; गप्पा मारत होते; हसत खिदळत होते. कारण आजची रेस अत्यंत वेगळ्या प्रकारची होती. यापूर्वी याच मैदानावर कित्येक प्रकारचे चित्तथरारक खेळ त्यांनी पाहिले होते. भुकेले वाघ - सिंह बघता बघता गुलामांना खाल्लेले दृश्य, गुलामांच्या आपापसातील जीवघेण्या कुस्त्या, घोड्यांच्या पायाला कोवळ्या मुलांना बांधून त्यांच्या रक्तांची चिळकांडी उडेपर्यंत पळवलेल्या घोड्यांची शर्यत, जिवंत माणसाला उभे करून केलेला भालाफेक, थाळीफेक, रथांची शर्यत.... इत्यादी अनेक प्रकारचे, क्रूरपणातच जमा असलेल्या शर्यतींच्या प्रकारांचा या अथेन्सवासीयांना खरोखरच कंटाळा आला होता. ते सर्व नवीन thrillच्या शोधात होते. त्यामुळे आजच्या कासवाच्या शर्यतीबद्दल कमालीची उत्सुकता होती. ही शर्यत त्यांच्या दृष्टीने सर्वस्वी वेगळ्या प्रकारात मोडत होती. सर्वात महत्वाचे म्हणजे आजच्या या कासवाच्या शर्यतीची कॉमेंट्री अथेन्स शहरातील प्रसिद्ध तत्वज्ञ खुद्द झेनो करणार होता. त्याची कॉमेंट्री सुरु झालीसुद्धा...!

*कासवासारख्या क्षुल्लक प्राण्याच्या रेससाठी उपस्थित असलेल्या सर्व अथेन्सवासीयांचे हृत्पूर्वक स्वागत. माझे नाव झेनो. व या जगावेगळ्या रेसची रनिंग कॉमेंट्री मी करणार आहे. परंतु ही रेस कोण जिंकणार हे (फिक्सिंग व डोपिंग नसतानासुद्धा) आधीच ठरल्यासारखे आहे. टार्क्विन या कासवाला अगोदरच 100 यार्डाची आघाडी देण्यात अचिलिसने भयंकर चूक केली आहे. नेमके काय घडले हे मी तुम्हाला सविस्तर सांगतो. म्हणजे माझा मुद्दा तुमच्या लक्षात येईल.*

*टार्क्विन कासवाला जेव्हा 100 यार्डाची आघाडी मिळाली तेव्हा या रेससाठी म्हणून त्यानी एक रणनीती ठरवली. दुसऱ्या कुठल्याही गोष्टीचा विचार न करता, चित्त विचलित होऊ न देता, - हळूच का असेना - वेगात*

*किंचितही बदल न करता, न थांबता पुढे पुढे जात राहायचे. परंतु रेसची सुरुवात एका निर्दिष्ट रेषेपासून करायला हवी. या रेषेवर दोन्ही भिडू आल्यानंतरच रेस सुरु होणार व जो पुढे जाईल तो रेस जिंकणार. त्यासाठी अचिलिसला टार्क्विन ओलांडत असलेल्या रेषेपर्यंत पोचणे आवश्यक आहे. टार्क्विन अगोदरच पुढे गेलेला असल्यामुळे अचिलिसला तेथपर्यंत पोचण्यासाठी काही वेळ लागणार हे मात्र निश्चित. कदाचित काही मिनिटं लागणार. परंतु या काही मिनिटात टार्क्विन त्याच्या वेगमर्यादेनुसार आणखी पुढे जाणार. अचिलिसला पुन्हा हे अंतर कापावे लागणार. त्यासाठी कदाचित काही सेकंद लागणार. अचिलिसला पुन्हा ते अंतर पार करावे लागणार. परंतु त्या वेळात टार्क्विन आणखी पुढे जाणार. व पुन्हा एकदा अचिलिसला .... मी काय सांगत आहे हे आतापर्यंत तुमच्या लक्षात आले असेलच. तार्किकदृष्ट्या व गणितीयदृष्ट्या अचिलिस हा कधीच रेसच्या सुरुवातीच्या रेषेपर्यंत पोचू शकणार नाही. त्याचे स्टार्टिंग पॉइंटला पोचणे जवळजवळ अशक्य आहे.*

*माझे हे म्हणणे ऐकल्यानंतर तुम्हाला टार्क्विनवर बेटिंग करावेसे वाटेल. परंतु आता वेळ निघून गेलेली आहे. .... रेस सुरु झालेली आहे. अचिलिस पुढे पुढे जात आहे. ... टार्क्विनच्या जवळ पोचलासुद्धा... अगदी जवळ आला आहे... आणखी जवळ आला आहे... परंतु हे काय अचिलिस टार्क्विनला ओलांडून पुढे गेलासुद्धा!.. मला माझ्या डोळ्यावर विश्वास बसत नाही.....हे शक्य नाही..... कधीच शक्य नाही. ....*

असे म्हणत म्हणत झेनो कॉमेंट्री बॉक्समध्ये कोसळतो.

संदर्भ:Zeno (born 488 BCE) Paradox of Achillis and Tortoise

***

अचिलिस स्टार्टिंग पॉइंटपर्यंत पोचणार नाही या झेनोच्या स्पष्टीकरणातच काही तरी चूक असावी, असे रेसचा ज्या प्रकारे शेवट झाला त्यावरून नक्कीच वाटेल. झेनोच्या या प्रकारच्या स्पष्टीकरणात विसंगती दडलेली आहे. मुळात

या स्पष्टीकरणात दोन असमान गोष्टी - तर्क व अनुभव - एकमेकाशी संबंधित असून दोन्ही खऱ्या ठरू शकतात हा दावा केला आहे. झेनोचा तर्क, अचिलिस टार्क्विनच्या रेषेपर्यंत पोचणारच नाही यावर ठाम आहे. परंतु प्रत्यक्ष अनुभवात अचिलिस त्या रेषेपर्यंत पोचतो; एवढेच नव्हे तर टार्क्विनला मागे टाकत, त्याला हरवून रेस जिंकतो. त्यामुळे तर्क बरोबर की अनुभव बरोबर या विरोधाभासाच्या संभ्रमावस्थेत आपण सापडतो.

काही जणांना या तर्कपद्धतीतच दोष आहे असे वाटण्याची शक्यता आहे. परंतु ही तर्कपद्धती काळ व अवकाशात सातत्य असून त्यांचे बारीकातील बारीक असे अगणित तुकडे करता येतात यावर आधारलेली आहे. अवकाशाचा बारीकसा तुकडा केला तरी अवकाश तसाच राहतो. पाण्याने तुडुंब भरलेल्या विहिरीतील पाणी व त्यातील पाण्याचा एक थेंब यात (पाणी या संज्ञेशी इमान राखल्यास) फरक करता य़ेत नाही. अवकाशही तसाच आहे. अवकाशाचे गुणविशेष असलेल्या लांबी, रुंदी, उंची, वा खोली यावरून अवकाशाचे लहान लहान तुकडे केले तरी शेवटच्या तुकड्यातही अवकाशाचेच गुणविशेष सापडतील. काळाचे सुद्धा मिनिट, सेकंद, मायक्रोसेकंद, नॅनोसेकंद .... असे अगदी बारीक बारीक क्षणात विभागणी करता येते. त्यामुळे अचिलिसच्या मनात काळ व अवकाश यांच्यातील दरी पार करून टार्क्विनच्या स्टार्टिंगच्या रेषेपर्यंत पोचणारच हा एक आशावाद दडलेला होता. मुळात यातच काही तरी गोची आहे. काऱण एक असा क्षण येतो की काळ व/वा अवकाश यांचे आणखी बारीक तुकडे करणे अशक्यातली गोष्ट ठरू शकते. म्हणूनच अचिलिस स्टार्टिंग पॉइंटपर्यंत पोचतो व टार्क्विनला मागे टाकून रेस जिंकतोही!

परंतु येथे आणखी एका तर्कविसंगतीत आपण अडकण्याची शक्यता आहे. अवकाशाच्या बारीकातल्या बारीक तुकड्याला लांबी, रुंदी वा उंची असे काही नसणार. जर तसे काही असल्यास तो बारीकातील बारीक तुकडा होऊ शकणार नाही. त्याचे पुन्हा तुकडे करता येतात. जर अवकाशाचा एक

अविभाज्य भाग असलेल्या तुकड्याला कुठलेही डायमेन्शन नसल्यास अशा सहस्रावधी - कोट्यावधी तुकड्यापासून बनलेल्या अवकाशाला डायमेन्शन्स का असावेत? हाच उपमान काळ या संकल्पनेलाही लागू होतो. काळाचे तुकडे करत असताना एक वेळ अशी येते की यापुढे त्याचे विभाजन करणे शक्य होत नाही. या बारीक क्षणाचे तुकडे होत नसल्यास अशा अपरिमित व अगणित क्षणांपासून बनलेल्या काळाला कालावधी कसा काय असू शकतो? त्यामुळे आता आपल्याला दोन विरोधाभासांचा सामना करावा लागणार आहे. व हे दोन्ही विरोधाभास खरे ठरल्यास दोन संभाव्य गोष्टी असंभाव्यतेकडे नेण्याची शक्यता आहे. यात काही तरी गोधळ आहे हे मात्र नक्की!

यातून आपली सहजासहजी सुटका नाही. याचे उत्तर शोधण्यासाठी गणिताच्या जंजाळात अडकून पडावे लागेल. आरामखुर्चीत बसून कासवाच्या रेससंबंधी केलेले तार्किकभाष्य विश्वासार्हही नाही व ते नैसर्गिक नियमांना अनुसरूनही नाही. गडद अंधारात विजेचा पांढरा बल्ब वापरून उजेड करता येतो. परंतु उजेडात काळा बल्ब वापरून अंधार करता येत नाही. येथे तर्क लढवता येत नाही. म्हणूनच वाद - प्रतिवादात एकमेकाच्या चुका शोधण्यापुरतेच तर्ककर्कशपणा ठीक ठरेल. यातही तर्क चुकीचा नसतो; परंतु प्रत्यक्ष अनुभवाशी जेव्हा तर्कपद्धतीचा पडताळा पाहण्याचा प्रयत्न होतो तेव्हा घोटाळा होतो.

म्हणूनच झेनोला धारातिर्थी पडावे लागले!

(हाच विरोधाभास वेगळ्या प्रकारे सांगता येईल

एका आटपाट नगरीत विशुद्ध गणित (Prue Mathematics) विषयातील एक तज्ञ व दुसरा उपयोजित गणित (Applied Mathematics) विषयातील तज्ञ विद्यार्थ्यांना गणिताचे धडे देत असत. त्यांच्या प्रशिक्षणामुळे विद्यार्थी तार्किकरित्या विचार करू लागले. हुशार होऊ लागले व तेथील राजाला अडचणीचे प्रश्न विचारू लागले. राजाला गणितज्ञांचेच कृत्य आहे हे कळल्यानंतर दोन्ही गणितज्ञांना पकडून तुरुंगात टाकतो. एके दिवशी त्यांना

राजाच्या समोर न्याय निर्णयासाठी हजर केले जाते. त्यांना आजन्म कारावासाची शिक्षा सुनावली जाते. शिक्षेत सूट हवी असल्यास राजा त्यांच्या समोर पर्याय ठेवतो.

*चॉकलेटचा तुकडा समोरच्या भिंतीला चिकटून ठेवला जाईल. व हे चॉकलेट तुम्हाला खावून संपवायचे आहे. त्यासाठी फक्त एक अट आहे. काही ठराविक वेळेत चॉकलेट व तुमच्यातील अंतर अर्ध्या अर्ध्याने कमी करत करत चॉकलेटपर्यंत पोचणे. ही अट पाळून चॉकलेट खाल्ल्यास ताबडतोब सुटका होईल. हा पर्याय नको असल्यास व तसे लिहून दिल्यास फक्त 10 वर्षे शिक्षा भोगावी लागेल. आहे तयारी?*

दोघेही तज्ञ आपापसात चर्चा करू लागले. विशुद्ध गणितज्ञाच्या मते ही अट आपण कधीच पाळू शकणार नाही. कारण दर ताशी अर्धे अर्धे अंतर कापत गेले तरी शेवटी काही अंतर उरणारच की. त्यामुळे आताच पर्याय नको असे लिहून दिल्यास आपल्याला फक्त 10 वर्षेच शिक्षा होणार. *मलाही गणितातील काही न सुटलेल्या कूट प्रश्नावर विचार करायचा आहे व त्यासाठी हा वेळ पुरेसा आहे. आपण तसे राजाला कळवू या.*

उपयोजित गणितज्ञ मात्र पर्याय स्वीकारावा या मताचा होता. *आपण अर्धे अर्धे अंतर कापत गेल्यास एका क्षणी आपण चॉकलेटच्या अगदी जवळ पोचू. माझी जीभ कमीत कमी 4 सेंमी लांबून चॉकलेट चाटू शकते. व खावून संपवूनही टाकू शकते. त्यामुळे हा पर्याय स्वीकारून मी माझी सुटका करून घेणारच.*

उपयोजित गणितज्ञ मौजमजा करत घरी व विशुद्ध गणितज्ञ जेलची हवा खात जेलमध्ये!)



# नाविन्यतेचा धसका!

नाविन्याची ओढ, सृजनशीलता, उपक्रमशीलता, वेगळी वाट, आउट ऑफ दि बॉक्स थिंकिंग, इत्यादी शब्दांच्या बद्दल वाकडे तिकडे कुणी बोलत असल्यास वा लिहित असल्यास बहुतेकांना राग येतो. या गोष्टींबद्दल निगेटिव्ह काही ऐकून घेण्याइतकी सहनशीलता आपल्यात आता नाही. याबद्दल काही बाही लिहिणाऱ्यांना आपण सर्रासपणे मूर्खात काढतो. हे शब्द आजच्या युगाचे परवलीचे शब्द झालेले आहेत. स्टीव्ह जॉब्स, बिल गेट्स, नारायण मूर्ती, रिचर्ड ब्रॉन्सन, टाटा, अंबानी, किरण मुजुमदार, मायकेल डेल सारख्या उपक्रमशील उद्योजकांनी या शब्दामागील संकल्पनांचा पाठपुरावा केल्यामुळेच Fortune 500 च्या यादीत त्यांची नावं झळकत असतात. नवीन काही करून दाखवावे अशी ओढ असलेल्या तरुणांना ही नावं भुरळ पाडणारी आहेत. यांच्या पावलावर पाऊल ठेऊन चालल्यास आपणही भरपूर कमाई करू हा एक आशावाद त्यामागे दडलेला असतो. या नांवांचा इतका गवगवा झाला आहे की आपण सृजनशीलता वा उपक्रमशीलतेच्या विरोधात एक शब्दही उच्चारू शकत नाही. तरीसुद्धा सृजनशीलतेचे, उपक्रमशीलतेचे बाहेर कितीही कौतुक होत असले तरी सर्व सामान्य मात्र मनातल्या मनात या गोष्टींची धास्ती घेत आहेत, हेही मान्य करावे लागेल.

सामान्यपणे आपल्याला धोका पत्करणे आवडत नाही. धोका नेहमीच आपल्याला अस्वस्थ करत असतो. आर्थिक गुंतवणूक, करीअर, इत्यादींच्या बाबतीत आपण नेहमीच जास्त जागरूक असतो. बिनधोक जग, कुठलेही चढ - उतार नसलेले आयुष्य, यांची आपल्याला ओढ असते. अनिश्चिततेची भीती वाटत असते. कुठल्याही प्रकारची अनिश्चितता आपल्या आयुष्यात डोकावू नये यासाठी आपले प्रयत्न चालू असतात. किंबहुना आपल्या जगण्याचे उद्दिष्टच अनिश्चितता दूर करणे हेच असते. आपण आपल्या सवयी, आपली जीवनशैली, आपले व्यवहार, आपल्या आवडी - निवडी, स्टेटस्को मेंटेन करण्याभोवतीच फिरवत असतो.

मुळात सृजनशीलतेची गोष्ट वेगळी असते. त्यात नवीन काही तरी सतत घडत असते. संभाव्यतेबद्दलच्या कल्पना करत असताना, नवीन समीकरणाची जुळणी करत असताना, किंवा वापरात असलेल्या उत्पादनांना नवे स्वरूप देताना, काही वेळा त्या अशक्यप्राय वाटू लागतात. मुळात या नवीन उत्पादनांची चाचणी घेतलेली नसते व चाचणी नसणे म्हणजे अनिश्चितता! ही अनिश्चितता जीवघेणी असते. अत्यंत भीतीदायक असते. व या भीतीची आपण कल्पनाही करू शकत नाही. याव्यतिरिक्त अपयशाचा शिक्का बसल्यास चार जणात नाचक्की होण्याची भीतीसुद्धा त्यात भर घालते. हाती घेतलेल्या कामात पहिल्याच झटक्यात यश मिळेलच याची खात्री कुणीही देऊ शकत नाही. व अपयशाचा शिक्का कुणालाही नकोसा असतो.

व्यवस्थापन्नाचे धडे देणाऱ्या शैक्षणिक संस्था किंवा वैयक्तिक जबाबदारीवर निर्णय घेणारे उद्योजक सृजनशीलतेचे वरवरून कितीही कौतुक करत असले तरी प्रत्यक्ष व्यवहारात नवीन कल्पना समोर आल्यास फेटाळण्याकडेच बहुतेकांचा कल असतो. अगदी शाळा - कॉलेजच्या पातळीवरसुद्धा याचा आपल्याला अनुभव येतो. एखादा विद्यार्थी नवीन काही तरी सुचवत असल्यास शिक्षकाला ते रुचणार नाही. खरे पाहता शिक्षणाचा मूळ उद्देशच सृजनशीलता असताना त्यालाच येथे पायदळी तुडवले जात असते.

IIT वा ICSR सारख्या संशोधनाला उत्तेजन देणाऱ्या संस्थेतील प्रवृत्तीसुद्धा यापेक्षा वेगळी नसते. एखाद्या विद्यार्थ्यानी नवीन कल्पनेचा मागोवा घेण्याचे ठरविल्यास, तुरळक अपवाद वगळता, उत्तेजन दिले जात नाही. फंड्सची कमतरता, पुरेशा वेळेचा अभाव, पाठ्यक्रम संपविण्याची घाई, लालफितीचा कारभार असल्या कारणामुळे त्याचा अपेक्षाभंग होतो. (थ्री इडियट्स चित्रपट आठवा.) मुळात तंत्रज्ञानाचा विकास अपघात, आपत्ती, धोका नसलेल्या सोई सुविधा समाजास उपलब्ध करून देण्याच्या उद्देशाने होत असतो. विकासाची बीजं सृजनशीलतेत असतात. नवीन कल्पना राबविण्यात असतात. परंतु यांच्यासाठी संधीच देत नसल्यास वा मिळत नसल्यास प्रगती

होणार कशी? या सर्व प्रकारामुळे सृजनशील संशोधक नाराज होण्याची शक्यता जास्त. तरीसुद्धा वैयक्तिक महात्वाकांक्षेतून काही होत असले तरी उत्पादनाच्या गुणवत्तेची खात्री देता येत नाही. म्हणूनच सृजनशीलतेबद्दल पूर्वदूषित दृष्टिकोन बाळगून अशा संस्थेतून बाहेर पडलेले महत्वाच्या पदावर पोचून स्टेटस्को मेंटेन करण्यात धन्यता मानतात.

परंतु सृजनशीलतेबद्दलचे औदासीन्य या जगाच्या इतिहासाला नवा नाही. आज जगात वापरात असलेल्या बहुतेक तंत्रज्ञानांना सुरुवातीच्या काळात फार मोठा विरोध सहन करावा लागला. संपर्क साधनं, घर बांधणी, रस्ते बांधणी, वाहन सुविधा, संगणक व्यवस्था, कृषी उद्योग, आहार उत्पादन, रोगोपचार, औषधी व्यवस्था इत्यादी क्षेत्रातील प्रत्येक छोट्या - मोठ्या सुधारणेसाठी सृजनशील संशोधकांना झगडावे लागले. उपक्रमशील उद्योजकांना खस्ता खाव्या लागल्या. मात्र नंतरच्या काही काळानंतर समाजाला त्यांचे महत्व पटले. परंतु अंत:स्फूर्तीतून आलेल्या कल्पनांचा अजूनही तिरस्कार होतच आहे. म्हणूनच अल्बर्ट आइन्स्टाइनला खालील प्रकारचे विधान करावेसे वाटले.

“The intuitive mind is a sacred gift and the rational mind is a faithful servant. We have created a society that honors the servant and has forgotten the gift.”

गेल्या 50 वर्षात या विधानात बदल करण्यासारखे आपल्या देशात काहीही घडले नाही. व यातील प्रत्येक शब्द न शब्द खरा आहे, हेच प्रकर्षाने जाणवत आहे.

ठेविले अनंते तैसेची रहावे|
चित्ती असू द्यावे समाधान||
या संतवचनापासून आपली सुटका नाही!

**प्रतिसाद**

(लेखातील मूळ आशयाकडे दुर्लक्ष करत केवळ वाक्यच्छल करण्याचा प्रयत्न करत असल्यास कुठल्याही लेखाबद्दल अशीच प्रतिक्रिया असू शकते.

संत तुकाराम यांचे रॅशनल विचार त्याकाळच्या हजारो - लाखो लोकांच्या इरॅशनल विचारांपेक्षा वेगळे होते, याबद्दल दुमत असण्याचे कारण नाही. लेखातील आशय मानवी ऐहिक संपत्तीत भर घालणाऱ्या विज्ञान, तंत्रज्ञान, औद्योगिक प्रक्रिया, आरोग्य विज्ञानातील प्रगत संशोधन, इत्यादी क्षेत्रातील सृजनशीलते विषयी आहे. काव्य, साहित्य, धर्म, तत्वज्ञान, इतिहास, मानव्यशास्त्र इत्यादी क्षेत्रातील सृजनशीलता हा वेगळ्या लेखाचा विषय होऊ शकतो. (आणि या क्षेत्रातही रॅशनल विचार नक्कीच सापडतील.) परंतु आइन्स्टाइनला ऐहिकरित्या सुख समृद्ध करणाऱ्या रॅशनल माइंडपासून इंट्यूटिव्ह माइंडपर्यंत झेप मारणे गरजेचे वाटले असावे.

एक लक्षात ठेवायला हवे की सृजनशीलतेची मक्तेदारी फक्त काही निवडक व्यक्तींची (वा समाजाची) असू नये. समाजाच्या संपत्तीत भर घालू शकणाऱ्या सृजनशीलतेला उत्तेजन मिळत असल्यास समाजाची भरभराटी होते. मोबाइल फोन फिनलँडच्या नोकियाने जागतिक बाजार पेठेत आणून खोऱ्याने पैसा मिळविला. मायक्रोसॉफ्ट संगणकाच्या बाजारपेठेत पहिल्या क्रमांकाच्या स्थानावर आहे. इतरांनी सृजनशीलतेचा वापर करत श्रीमंत व्हायचे व आपण त्याचा वापर करण्यात समाधान मानायचे याला काही अर्थ नाही. या गोष्टी आपण का करू शकलो नाही वा करू शकत नाही याचाही विचार व विश्लेषण होणे गरजेचे आहे. (भरपूर गाजावाजा झालेल्या विद्यार्थ्यांसाठीच्या स्वस्तातील आकाश iPad Tablet अजून का विद्यार्थांच्या हातात पडत नाहीत?) *नवीन तंत्रज्ञान, नवीन उत्पादन इतर करत आहेत ना!* आपण फक्त त्यांचा वापर करत त्यांना श्रींमंत करत राहायचे हा विचार पटत नाही.

यासाठी आपल्यातही मोठ्या प्रमाणात सृजनशील व्यक्ती हव्यात. त्यांच्या अफलातील कल्पनांना उत्तेजन देणारे संघ - संस्था हव्यात. व त्यामधून या समाजालासुद्धा काही लाभ मिळायला हवे. *इतर ठिकाणी होत आहे, इतर*

*व्यक्ती करत आहेत* असे म्हणत आपल्यात फक्त ' चित्ती असू दे समाधान' हे योग्य वाटत नाही.)

●●●

# आपलं नशीबच.......!

मॅथ्यू हॅरिसन या लेखकाचे The 7 Laws of Magical Thinking हे पुस्तक आजकाल Best Seller list वर गाजत आहे. या लेखकाने काही काही वेळचे आपले अविवेकी वर्तन आपल्याला सुख समाधान व मानसिक शांती मिळवून देण्यास कसे कारणीभूत होते याचे विश्लेषण केले आहे. त्यावरून आपल्यातील बहुतेकांचा नशीबावर भरपूर विश्वास आहे, असा निष्कर्ष त्यानी काढला आहे. काही जण योगायोग असे गोंडस नाव देवून आपला नशीबावर विश्वास नाही असे दाखविण्याचा प्रयत्न करत असतात. परंतु मनातल्या मनात मात्र नशीबाला कोसत असतात.

ऊन, पाऊस, पाणी, वारा, थंडी, इत्यादी नैसर्गिक नियमाबद्दल आपले काही ठराविक ठोकताळे असतात. पावसाळ्याच्या दिवसात चुकून घरी छत्री विसरून बाहेर पडल्यास हमखास पाऊस पडणार व आपण चिंब भिजणार. शेवटी आपलं नशीब म्हणत गप्प बसणार. मॉलमध्ये सामानांची ट्रॉली सरकवत 5-6 काउंटरपैकी एका काउंटरपाशी बिल देण्यासाठी क्यूमध्ये आपण उभे राहतो. थोड्या वेळाने पलिकडचा क्यू तुलनेने कमी लांबीचा व लवकर लवकर पुढे सरकत आहे हे लक्षात येते. आपण वेळ वाचविण्यासाठी क्यू बदलतो. थोड्या वेळात पूर्वीच्या क्यूमधील आपल्यासमोर उभा असलेला ग्राहक बिल भरून निघूनसुद्धा जातो व आपल्यामागे उभा असलेलासुद्धा! आपण मात्र अजूनही प्रतिक्षेतच! पुन्हा एकदा आपलं नशीबच xxxx म्हणत तडफडतो. बँकेत काही तातडीचे काम करण्यासाठी जावे तर बँक बंद वा तिथला संगणक बिघडलेला. एटीएमवर पैसे काढायला जा, शटर बंद... एक ना दोन.. असे कितीतरी उदाहरणं असतील. म्हणूनच आपले नशीब आपल्यापेक्षा पुढे जाऊन आपला सूड घेत असते, एवढे तरी मान्य करायला हवे. तार्किकदृष्ट्या अत्यंत योग्य वाटणारी आपली कृती खरोखरच आपलं नशीब बदलू शकेल का?

या संदर्भात चाचणी घेतल्यानंतर काही मजेशीर गोष्टी पुढे आल्या. एका सर्वेक्षणात आपण विकत घेतलेल्या लॉटरी तिकीटाची आपल्या मित्राबरोबर अदलाबदल केल्यास आपल्या लॉटरी तिकिटाला बक्षीस मिळेल का? हा प्रश्न विचारल्यावर सुमारे 90 टक्के लोकांनी तसे काही होणार नाही असे तर्कशुद्ध उत्तर दिले. परंतु याच प्रश्नाचे उत्तर आपल्या पूर्वानुभवावरून देण्यास सांगितल्यावर सुमारे 46 टक्के लोकांनी बक्षीस लागेल असे सांगितले. एखाद्या शत्रुच्या तिकीटाची अदलाबदल केल्यास शत्रुला बक्षीस नक्की मिळेल यावर अनेकांचा विश्वास होता.

नोकरीच्या इंटरव्ह्यूसाठी एखादा विशिष्ट प्रकारचा शर्ट घातल्यास इंटरव्ह्यू सोपा जाईल अशी एक अटकळ आपल्या मनात असते. आपल्या अशा कृतीतून आपण आपल्या नशीबाला भुरळ पाडण्याच्या प्रयत्नात असतो. अशीच एखादी अतार्किक भन्नाट कृती करून आपण आपल्या नशीबाला चकवू शकतो यावर आपला ठाम विश्वास असतो. हळू हळू पुढे सरकत असलेल्या मॉलमधील क्यू बदलून दुसऱ्या काउंटरच्या क्यूत उभे राहणे हे याच विश्वासाचे द्योतक आहे.

मुळात आपण स्वत:बद्दल विचार करताना नकारात्मक दृष्टीने विचार करत असतो. त्यामुळे आपला क्यू वेळखाऊ आहे, या काउंटरवरचा बिल करणारा आळशी आहे, समोरच्या ग्राहकाकडे भरपूर सामान आहे... अशा प्रकारच्या विचारांची मालिका आपल्याला नाउमेद करते व आपण कुठली तरी अविवेकी, अतार्किक कृती करण्यास तयार होतो. आपण ज्या प्रकारे विचार करत सुटतो त्याचप्रमाणे घटना घडणार याची पुरेपूर खात्रीसुद्धा आपल्याला असते.

ही मानसिक प्रक्रिया तीन पातळीवर चालते; नकारात्मक विचार करून नशीबाला चकवणे, गोष्टी अपेक्षेप्रमाणे न होणे व शेवटी आपला (चुकीचा) अंदाज खरा ठरणे. जाणीवपूर्वक केलेल्या कृतीसाठी जास्त बौद्धिक श्रम लागतात. आपली जाणीव शाबूत आहे की नाही यासाठी मानसतज्ञ अमुक

एका तीन आकडी संख्येमधून (उदा: 564) प्रत्येक वेळी 3 वजा करत जाण्यास सांगितले जात असते. परंतु याचीसुद्धा आपल्याला भीती वाटू लागते. मानसतज्ञ हाच अवघड प्रश्न मला विचारणार या धास्तीमुळे आपली वजाबाकी नक्की चुकणार. अशा प्रकारच्या नकारात्मक विचारांच्या साखळीमुळे आपण गांगरून जातो. व माहित असलेल्या गोष्टीसुद्धा विसरू लागतो.

नशीबाला चकवण्याच्या नादात आपण विनाकारण धोका पत्करत असतो. किंवा फाजिल विश्वास बाळगत असतो. आपणच काही ठोकताळे ठरवतो. व त्या आधारे नशीबाला फसवत आहे या धुंदीत असतो. मुळात आपल्याला यश हवे असते, परंतु विचार मात्र अपयशाचा करत असतो. थोडीशी स्तुती केल्यास अपशकुन होणार याची मनात कुठेतरी धुकधुक असते. म्हणूनच आपल्या वागण्यात वा बोलण्यात मनापासून दाद दिली आहे असे कधीच होत नाही. मीठ म्हटलं की अपशकुन होते म्हणून मिठाला साखर म्हणत आपण गृहिणीला तोंडघशी पाडतो. आपण जे काही नकारात्मक म्हणतो तसेच होत जाणार याची एक अव्यक्त भीती आपल्या मनात असते म्हणूनच *शुभ बोल रे नाऱ्या...* ही म्हण प्रचलित झाली असावी. सचिन शंभर धावा काढू शकणार नाही असे मनात आले की आपले वागणेसुद्धा त्याप्रमाणे बदलत जाते. जीवविमा न उतरविण्याचे कारणही हेच असावे. कारण विमा उतरवले की आपण मरणार याची मनोमन खात्री असते.

पिढ्यान पिढ्या आलेल्या रूढी, परंपरा, इष्ट - अनिष्ट प्रथा आपण पाळत असतो. त्यातील अनेकांचा आधुनिक जीवनशैलीशी काहीही देणे घेणे नसते. त्या टाकाऊ असतात. तरीसुद्धा (विकृत स्वरूपात तरी का होईना) त्यांचे पालन केले जाते. कारण कोण जाणे, त्या न पाळल्यास आपण गोत्यात येऊ हाच विचार त्यामागे असतो.

त्यापायी अशा प्रकारच्या श्रद्धांना तडा देणे, त्यातून श्रद्धावंतांना बाहेर काढणे, त्यांच्या मनातील भीती घालवणे, त्याना विवेकी बनवणे दिवसे न दिवस कठीण होत आहे.

## एकाकीपणाचे बळी!

इलेक्ट्रॉनिक्स तंत्रज्ञानातील अभूतपूर्व प्रगतीमुळे एकविसाव्या शतकातील - इतर व्यवस्थापनेप्रमाणे - कार्यालयीन व्यवस्थापनेत आमूलाग्र बदल झालेले आहेत. प्रत्येक गोष्टीला ऑनलाइनची जोड दिली जात आहे. प्रगत तंत्रज्ञानावर आधारलेल्या अत्याधुनिक सोई - सुविधांच्या किंमती कोसळत असल्यामुळे व सामान्यांनासुद्धा परवडतील अशा किंमतीत मिळू लागल्यामुळे ई-मेल, व्हाइस मेल, व्हिडिओ कॉन्फरन्सिंग, इंटरनेट, मोबाइल फोन, स्मार्ट फोन, सॅटलाइट फोन, टॅब्लेट पीसी, आयपॅड, इत्यादी सुविधा अनेक छोट्या मोठ्या कार्यालयात मोठ्या प्रमाणात पोचत आहेत. या सुविधामुळे कार्यालयांचे स्वरूपच पूर्णपणे बदलत आहे. पेपरलेस्स कार्यालयाची संकल्पना राबवली जात आहे. फाइल्सचे ओझे कमी करण्याचे प्रयत्न चालले आहेत. कदाचित काही दिवसात फाइल्स नामशेषसुद्धा होतील. कार्यालयास येण्या-जाण्यासाठी लागणारा वेळ, त्यासाठी द्यावे लागणारे श्रम, जागा - इमारत व इतर मूलभूत सुविधा, प्रशासन व्यवस्था या सर्वांना काटछाट देऊन एखादी सर्वस्वी वेगळी व्यवस्था निर्माण करणे शक्य झाले आहे. संगणकातील माहितीच्या आधारे निर्णय घेणे शक्य होणार आहे. निर्णयप्रक्रियेचे सुलभीकरण होत आहे. त्यात पारदर्शिकता आणणे शक्य होत आहे. ई-मेल, एसएमएस व मोबाइलद्वारे माहिती त्वरितपणे दुसऱ्या ठिकाणी पोचविणे सुलभ झालेले आहे.

आतापर्यंतच्या कार्यालयीन व्यवस्थापनेत एकाच ठिकाणी सर्व कर्मचारी वर्ग जमत असल्यामुळे एकमेकांची निदान तोंडओळख तरी होत होती. सुट्टीच्या वेळी गप्पा होत होत्या. एकमेकांची विचारपूस होत होती. मानवी संबंध जिव्हाळ्याचे वाटायचे. यानंतर या सर्व गोष्टी इतिहासजमा होण्याच्या मार्गावर आहेत.

येथून पुढे भासमान कार्यालयाची (virtual office) संकल्पना वास्तवात बदलणार आहे. या व्यवस्थेत सर्व प्रकारच्या कार्याची विभागणी वेगवेगळ्या प्रकल्पाच्या स्वरूपात असणार आहे. प्रकल्पासाठी योग्य कार्यकारी

व्यवस्थापक नेमला जाईल. तिला/त्याला त्या प्रकल्पाची पूर्ण माहिती संगणकासारख्या सुविधाद्वारे वेळोवेळी दिली जाईल. प्रकल्पाचे अनेक टप्पे असतील. कामाच्या स्वरूपाप्रमाणे त्या त्या क्षेत्रातील विशेषज्ञांशी ई-मेल, मोबाइलद्वारे संपर्कात राहून कामाविषयीची सर्व माहिती संगणकावर गोळा केलेली असेल. शंकांचे निरसन केले जाईल. व्हिडिओ कॉन्फरन्सिंगद्वारे चर्चा होईल. फील्डवर्कसाठी कंत्राट दिले जातील. या सर्व गोष्टी सर्व संबंधित व्यक्ती घरबसल्या लॅपटॉप व इतर सुविधा वापरून सहजपणे करू शकतील.

प्रत्यक्षात कार्यालयाची इमारत, निर्दिष्ट वेळा, मीटिंग्स, वगैरे काहीही नसतील. कारण यातील प्रत्येक व्यक्तीची जागा व वायफाय जोडलेले लॅपटॉप म्हणजेच कार्यालयीन टेबल आणि व्यक्तीच्या जागेला व्यापणारा अवकाश हेच कार्यालय असेल. संवाद साधण्याच्या आधुनिक संपर्कसुविधा उपलब्ध असल्यामुळे यातील व्यक्ती एकमेकापासूल शेकडो कि.मी. दूर असल्यातरी काहीही बिघडणार नाही. कुठल्याही व्यक्तीची प्रत्यक्ष भेट न घेता समोरासमोर संवाद न करता प्रकल्पांची कार्यवाही केली जाईल. प्रकल्पापुरतेच काही व्यक्तींशी संबंध, काही काळ, येत असल्यामुळे कुणाशीही भावनिक गुंतवणुकीची गरज भासणार नाही. प्रत्येक वेळी नवीन प्रकल्प/काम, नवीन व्यवस्थापन, अशी अवस्था यात आहे. संपर्कात असलेली व्यक्ती पुरुष की स्त्री, वयस्कर की तरुण, अनुभवी की नवीन इत्यादी मुद्दे गौण ठरणार आहेत.

अशाप्रकारची भासमान कार्यालये आताच प्रत्यक्षात अस्तित्वात आहेत. माहिती तंत्रज्ञान क्षेत्रातील नावाजलेल्या कंपन्यांचे व्यवस्थापन अशाच प्रकारच्या भासमान कार्यालयातून होत आहे. कंपन्यातील कार्यकारी व्यवस्थापकांना सर्व इलेक्ट्रॉनिक्स सुविधा पुरविल्या जात असून त्यांच्या कामाचे स्वरूप भासमान कार्यालयाच्या संकल्पनेनुसार केले जात आहे. फाइल्सची झंझट नाही. मीटिंग्सची गडबड नाही. टार्गेट डेटच्या बंधनाव्यतिरिक्त ऑफिसला येण्या -जाण्याच्या वेळेचे वा रजा - सुट्टी इत्यादींचे

बंधन नाही. काही मोजक्या सहकाऱ्याव्यितरिक्त कुणाचाही संबंध नाही. मोबाइल्ससुद्धा सायलेंट मोडवर असल्यामुळे सारे कसे शांत, शांत!

परंतु घी देखा लेकिन बडगा नही देखा याचा अनुभव यातील अनेकांना येत आहे. ई-मेल व मोबाइल फोन या सुविधांमुळे अनेक सक्षम व संवेदनशील अधिकाऱ्यांमध्ये एकाकीपणा वाढल्याचे जाणवत आहे. माणसांचा प्रत्यक्ष संबंध कमी होत असल्यामुळे स्वत:विषयी चीड निर्माण होत आहे. एखाद्या प्रामाणिक अधिकाऱ्याला महत्वाच्या बैठकीस बोलावले नसल्याचे लक्षात आल्यास मला का बोलविले नाही?, माझे काही चुकले का?अशा नाना कुशंका त्याच्या मनात घोळत असतात. त्याच्या वरिष्ठ अधिकाऱ्यालाही तीच धास्ती असते. दोन्ही व्यक्ती कुढत असतात. शंका मनातल्या मनातच दाबल्या जातात.

या समस्येवर प्रत्यक्ष संवाद हाच एक उपाय होऊ शकतो. दोघेही अस्वस्थ आहेत. काळजीत आहेत. भावनिक अपराधातून स्वत:ला दोष न देता प्रत्यक्ष भेट घेणे हाच समस्या निवारणाचा मार्ग आहे. 'मानवी क्षणा'त दोन व्यक्ती काही काळ मानसिकरित्या समरस होण्यासाठी भौतिक अवकाश वाटून घेणे अभिप्रेत असते. आधुनिक संपर्कसुविधेमध्ये मानवी क्षणाला वाव नसतो. मानवी क्षणाच्या अभावात विनाश करणारी शक्ती दडली आहे, याची हळू हळू जाणीव होत आहे.

मानवी क्षणात व्यक्तींची प्रत्यक्ष उपस्थिती आणि त्यावेळची भावनिक व बौद्धिक एकाग्रता या दोन गोष्टींना जास्त प्राधान्य दिले जाते. केवळ प्रत्यक्ष उपस्थिती किंवा केवळ एकाग्रता असून चालत नाही. तासन् तास विमानातून वा रेल्वेतून प्रवास करत असताना शेजारचा प्रवासी आपल्यासमोर उपस्थित असतो. यातून मानवी क्षणाला काही मदत मिळत नाही. तसेच फोनवरून संवाद साधताना संपूर्ण लक्ष केंद्रित केले जात असते. परंतु यातही मानवी क्षणाचा अभाव जाणवतो.

मानवी क्षण सफल होण्यासाठी दिवसातील थोडा वेळ खास यांच्यासाठीच राखून ठेवण्याची गरज आहे. टेबलावरील कागद पत्रे बाजूला सारून संगणक, लॅपटॉप, मोबाइल स्विच ऑफ करून कुठेही न हरवता, समोरच्या व्यक्तीशी पूर्णपणे लक्ष केंद्रित करून, संवाद साधणे गरजेचे आहे. असे केल्यामुळे समोरची व्यक्ती भारावून जाते व योग्य प्रतिसाद देऊ लागते. प्रत्यक्ष संवादामुळे सर्जनशील, सकारात्मक परिणाम दिसू लागतात.

एड्वर्ड हालोवेल या अमेरिकन मानसशास्त्रज्ञाचा या विषयावर हार्वर्ड बिझिनेस रिव्ह्यू या द्वैमासिकात एक लेख प्रसिद्ध झाला होता. त्याच्या मते, दैनंदिन व्यवहारातून मानवी क्षण लोप पावत असल्यामुळे फार मोठ्या धोक्याला आपल्याला तोंड द्यावे लागणार आहे. हालोवेलचे अनेक रुग्ण मोठमोठ्या कंपन्यांचे कार्यकारी अधिकारी होते. बाहेरच्या जगाच्या दृष्टीने त्या सर्व यशाच्या शिखरावरील व्यक्तीच वाटतात. परंतु प्रत्येकाच्या आयुष्यात मानवी संबंधांच्या उणिवा प्रकर्षाने जाणवतात. हे सर्व एकाकीपणाचे बळी आहेत. त्यांची मनस्थिती गोंधळलेली आहे. कामाच्या ठिकाणी योग्य निर्णय घेण्यास ते असमर्थ ठरत आहेत. या मानसशास्त्रज्ञाच्या उपचारपद्धतीत मानवी क्षणांवर जास्त भर दिल्यामुळे सकारात्मक प्रतिसाद मिळतो हे लक्षात येऊ लागले.

या मानसशास्त्रज्ञांच्या अनेक रुग्णामध्ये प्रत्यक्ष मानवी संपर्क तुटल्यामुळे एका प्रकारची अव्यक्त भीती दडलेली होती. कार्यालयाच्या बदलत्या स्वरूपामुळे मानवी क्षणांना वाव मिळत नव्हता. सहोद्योगींचा इलेक्ट्रॉनिक्स संवाद माध्यमाच्या साधनांचा अती वापरामुळे व सर्वस्वी त्यांच्यावर विसंबून असल्यामुळे ही परिस्थती उद्भवत आहे असे हालोवेल यांना वाटते. या रुग्णांना त्यांचे अस्तित्व एका निर्जन बेटावरील अस्तित्वासारखे वाटत असावे. विश्वास गमावलेला आहे. कार्यालयासाठीचा वेळ जीव घेणारा वाटत आहे. मानवी क्षणांच्या अभावामुळे परस्परावर अविश्वास, अनादर व असंतोष निर्माण होत

आहेत. ही साखळी एकदा सुरु झाल्या सांसर्गिक रोगाप्रमाणे सर्वकडे पसरायला वेळ लागत नाही.

परंतु या इलेक्ट्रॉनिक्स सुविधा अजिबात नको असे म्हणण्यातही तथ्य नाही. या अत्याधुनिक सुविधामुळे कामाला गती मिळत आहे. निर्णयप्रक्रियाले कमीत कमी वेळ लागत आहे. ती सोपी होत आहे. जगातील कानाकोपऱ्यात असलेल्याशी संपर्क साधून माहिती मिळवता येते. सर्व माहिती उपलब्ध होऊ शकते. जे जे काही उत्कृष्ट आहे त्याचा आपल्या कामात उपयोग करता येतो. रूटिन कामासाठी जास्त वेळ खर्च होत नाही. घरबसल्या अनेक गोष्टी करता येतात.

मात्र या सुविधांना उपयोगात आणत असताना मानवी क्षणांना आपण मुकत आहोत हे लक्षात घेतले जात नाही. हालोवेलच्या मते, अनेक मानसिक रुग्ण केवळ मानवी जिव्हाळयाच्या अभावामुळेच रुग्णावस्थेत पोचलेले असतात. हे नेमके कशामुळे होत आहे, याचेही विश्लेषण हालोवेल यानी केले आहे.

मानवी क्षणांचा अभाव हा भावनिक स्वास्थ्य बिघडवू शकतो, याचे प्रत्यंतर बालसंगोपनाच्या क्षेत्रात काम करणाऱ्यांना नेहमी येत असते. बालसंगोपनात केवळ आहार व कपडेलत्ते पुरेसे नसून वेळोवेळी उराशी कवटाळणे, कडेवर घेणे, लाड करणे, खेळविणे, त्यांच्याशी जास्तीत जास्त जवळीक साधणे, यावर भर दिला जातो. हे न झाल्यास त्या बालकाचा मेंदू व मज्जासंस्था यांचा नीटसा विकास होत नाही, असे तज्ञांचे मत आहे.

1974 मध्ये कॅलिफोर्निया येथील 4725 नागरिकांच्या एका सर्वेक्षणात त्यांची जीवनपद्धती व आरोग्यविषयक माहिती गोळा करण्यात आली. या अभ्यासानुसार सामाजिकदृष्ट्या एकाकी जीवन जगत असलेल्या नागरिकामध्ये मृत्युचे प्रमाण इतरांपेक्षा तीन पट जास्त होते. 1997 मध्ये घेतलेल्या सीऍटलमधील सर्वेक्षणात तेथील रहिवाशांमध्ये एकाकी जीवन जगणाऱ्यापेक्षा इतरांच्या औषधोपचारावरील खर्च फार कमी होता. सामाजिक संबंधामुळे

रोगप्रतिकारक शक्तीत लक्षणीय प्रमाणात वाढ होऊ शकते, असे एका अभ्यासांती कळले. तसेच पहिल्या सौम्य हृदयाघातानंतरच्या आयुष्यातील वाढीसाठी मानवी सलोखा जास्त गुणकारक ठरतो. मॅकआर्थर फौंडेशनतर्फे घेतलेल्या आयुर्मर्यादेतील वाढविषयक अभ्यासानुसार, व्यक्तीच्या सुखी जीवनासाठी दोन निकषांना प्राधान्य दिले पाहिजे. एक, मित्र व नातेवाइकांच्या भेटीगीठी व दुसरे, प्रत्येकांचा सामाजिक व कौटुंबिक मेळाव्यातील सहभाग. एका पाहणीनुसार, रोज चार - पाच तास इंटरनेटवर सर्फिंग करणाऱ्या व्यक्तीमध्ये मानसिक स्वास्थ्य बिघडल्याची लक्षणं आढळली होती. इलेक्ट्रॉनिक्सचे विश्व कितीही थरारक व उपयोगी वाटत असले तरी ते मानवी संबंधांना पर्याय होऊ शकत नाही.

मानवी क्षण आपल्या आयुष्यातून लोप पावले तर वाईटात वाईट काय होऊ शकते? तज्ञाच्या मते अशी व्यक्ती संभ्रमावस्थेत जाण्याची शक्यता आहे. सामान्यपणे अशा व्यक्ती चिंताग्रस्त असतात. प्रत्यक्ष संवादात घडत असलेले शारीरिक हावभाव, देहबोली, ध्वनीतील चढउतार, यांचा अभाव इलेक्ट्रॉनिक्स माध्यमातून केलेल्या संवादात मोठ्या प्रमाणात जाणवतो. स्मायलीज देहबोलीची जागा घेऊ शकत नाहीत. संवेदनाशील व्यक्तींना या गोष्टी तीव्रतेना जाणवतात. एकाकीपणातून उद्भवलेल्या काळजीमुळे व्यक्तीला वास्तवतेचे भान रहात नाही. एकमेकाबद्दलच्या गैरसमजुतीत वाढ होऊ लागते. सहनशीलतेवर ताण पडू लागतो. आपल्या ऑफीसबद्दल, आपल्या सहकाऱ्याबद्दल, स्वतच्या क्षमतेबद्दल, स्वतच्या हेतूबद्दल नको त्या कुशंका घेतल्यामुळे मनस्वास्थ्य बिघडते.

मानवी क्षणाच्या अभावामुळे लोक फार विचित्रपणे वागतात. त्यांच्यातील हिंसक प्रवृत्ती उफाळून येते. कुठलाही मुलाहिजा न ठेवता एखाद्या तीक्ष्ण हत्यारासारखे की-बोर्ड, मोबाइल, इत्यादींचा वापर केला जातो. निरुपद्रवी दिसणारी व्यक्ती आक्रमक बनते.

मानवी क्षण मात्र अशा प्रसंगी नियंत्रकाचे काम करतात. काही कंपन्या भासमान कार्यालयाच्या संदर्भात जाणीवपूर्वक प्रयत्न करून मानवी क्षण वाढविण्याचे प्रयत्न करत आहेत. मीटिंग्स, कॉन्फरन्सेस इत्यादीत नियमितपणे भाग घेण्यास उत्तेजन देतात. 'हाय टेक' चे रूपांतर 'हाय टच' मध्ये करण्याचा हा प्रयत्न आहे. यात संबंधित व्यक्तीचाही भरपूर फायदा होतो. जाणीवपूर्वक व्यूहरचना करत मानवी क्षण आणत राहिल्यास नि:सत्व व नीरस वाटू लागलेल्या कार्यालयीन कामकाजात जिवंतपणा आणणे शक्य आहे.

तंत्रज्ञानातील अभूतपूर्व प्रगतीमुळे विविध दरवाजे खुले झालेले आहेत. भरपूर संधी उपलब्ध होत आहेत. कार्यालयातील टेबलापासून व 10 ते 5 या वेळेच्या विळख्यातून समाजाची सुटका होत आहे. आता माघार घेणे शक्य नाही. परंतु मानवी क्षणाशिवाय पुढचे पाऊल ठेवणे धोक्याचे आहे. मानवी क्षणांचा विचार न करता पुढे जात राहिल्यास फार मोठी किंमत मोजावी लागणार आहे. स्वत:वरील विश्वास द्विगुणित करण्यासाठी, उत्साह टिकविण्यासाठी, व माणूस म्हणून जगण्यासाठी मानवी क्षणांची उपयुक्तता वादातीत आहे, हे मान्य केल्याशिवाय गत्यंतर नाही.



# उत्तरदायित्व

***आपण करत असलेल्या कृतीला आपणच कितपत जबाबदार असतो?***

तुम्ही करत असलेल्या कृतीवर तुमचेच पूर्णपणे नियंत्रण असून तुमच्या अपेक्षेप्रमाणे ते तुम्ही पूर्ण करणार. हे करत असताना त्याच्यामुळे होणाऱ्या परिणामांची जबाबदारीसुद्धा तुम्हालाच स्वीकारावी लागणार. प्रत्यक्ष व्यवहारात मात्र वेगळेच घडत असते. फायद्याची गोष्ट असली की मीच केले म्हणणाऱ्यांची रीघ लागते. तोटा झाल्यास मात्र जबाबदारी दुसऱ्यावर झटकून मोकळे होण्याकडे कल वाढतो. मुळात जबाबदारी वेळ, प्रसंग वा व्यक्तीनुसार बदलत राहते. सामान्य परिस्थितीत उत्तरदायित्वाची आठवण होत नसली तरी अटीतटीच्या प्रसंगात त्याचा कस लागतो. व्यक्तीचा प्रत्यक्ष सहभाग होता की फक्त वरवरून सहानुभूती यातून नैतिक जबाबदारी ठरवता येते. रस्त्यावरच्या अपघातग्रस्त व्यक्तीला रुग्णालयात पाठविण्याची जबाबदारी तेथे हजर असलेल्या प्रत्येकाची असते. परंतु हे काम दुसरा कोणी तरी करेल म्हणून आपण पुढाकार घेत नाही. व घटनास्थळापासून जास्तीत जास्त लांब पळण्याच्या पावित्र्यात असतो. ही नैतिक जबाबदारी आपल्याला पेलवत नाही अशी मनाची समजूत करून आपण काही तरी निमित्त काढून काढता पाय घेतो. येथे अडकण्यापेक्षा जाता जाता कुठेतरी भीक मागत असलेल्यांच्या कटोरीत 10 रुपयाची नोट भिरकावून सामाजिक जबाबदारीतून मुक्त होण्याचा अत्यंत सुलभ मार्ग निवडतो. अगोदरची नैतिक जबाबदारी टाळल्याची भरपाई अशा प्रकारे करू पाहतो.

नैतिकता ही इतक्या सहजासहजी पचनी पडणारी गोष्ट नाही. एका माणसाला वाचविण्यासाठी 10 जणांचा जीव धोक्यात घालावा का? कदाचित आपले उत्तर त्या एकट्या माणसाला मारून दहा जणांचा जीव वाचवावा हे असल्यास ती एकटी व्यक्ती तुमचा मुलगा वा जवळच्या नात्यातील असल्यास काय करावे? समस्या तीच. परंतु विचाराची दिशा बदललेली. एखादा

आवडता चित्रपट नेटवरून डाउनलोड करणे चित्रपटाची पायरेटेड सीडी विकत घेण्यापेक्षा कमी अनैतिक. वा एखाद्याची वैयक्तिक डायरी वाचण्यापेक्षा त्याला आलेले ईमेल वाचणे कमी अनैतिक. अशा प्रकारे नीती - अनीती सापेक्ष ठरत जाते व जबाबदारीची जाणीवसुद्धा!

नेहमीच्या रहाटगाडग्यात अडकलेल्या आपल्या सारख्यांना कदाचित सहानुभूती हे गुणवैशिष्ट्यच आपल्याला जागे करून कृती करण्यास भाग पाडत असावी. परंतु ही सहानुभूती नेहमीच उत्स्फूर्ततेतून व भावनाविवशतेतून जन्मास येत असल्यामुळे आपण करत असलेली कृती, परिणामाच्या जबाबदारीचा विचार करण्यास पुरेसा वेळ देत नाही. याचा अर्थ असा नव्हे की आपण कोरडे पाषाण, भावनाशून्य जीवन जगत रहावे. परंतु कृतीच्या अंतिम परिणामाची जाणीव ठेवतच कृती करावी, हाच जबाबदार व्यक्तीचा उद्देश असावा व स्वीकारलेल्या जबाबदारीपासून पळवाट काढू नये. जबाबदारीच्या संदर्भात तत्वनिष्ठा व मानसिकता यांना विसरता येत नाही.

मानसिकतेची जडण घडण सहानुभूती व भावनेला अनुकूल असली तरी जबाबदारीयुक्त वर्तन, साधन शुचिता, कृतीतील सातत्य, वेळेचे भान इत्यादींनाही फार महत्व आहे. तत्वशून्य कृती बेजबाबदारीपणाला जन्म देते.

उत्तरदायित्वाच्या संदर्भातील निर्णय घेताना कुठल्या थरापर्यंत जबाबदारी उचलावी हा प्रश्न उपस्थित होतो. व हा निर्णय शहाणपणाचा व आव्हानात्मक असू शकतो. काहींना जबाबदारी घेण्याची घाई असते. व घाई गर्दीत केलेल्या कृतीतून काही विपरीत घडल्यास इतर कशावर तरी जबाबदारी ढकलण्याची पाळी येते. कदाचित हाताबाहेर गेलेल्या परिस्थितीवर वा इतर कुणावर वा शासनावर दोषारोप करून मोकळे व्हावे. लागते. रोगोपचारात उत्तरदायित्वाला भार महत्व असते कारण येथे एखाद्याच्या जीवन मरणाचा प्रश्न असू शकतो. उपचार करणारे - व्यक्ती असो वा एखादी टीम असो - जबाबदारी टाळू शकत नाहीत. 'कर्मण्ये वाधिकारस्ते मा फलेशु कदाचन...' याचा येथे उपयोग होत नाही. आपण उदासीन राहून फलाची अपेक्षा करू लागल्यास वा परिस्थिती

आपोआपच सुधारणा आणेल असे wishful thinking करत असल्यास ते बेजबाबदार वर्तन ठरेल. त्याचप्रमाणे कुवतीपेक्षा जास्त जबाबदारी अंगावर घेणेसुद्धा त्रासदायक ठरू शकेल. *जे जे काही चुकत आहे त्याला मीच सर्वस्वी जबाबदार आहे* ही मानसिकता व त्यातून अपराधीगंड यामुळे आपण कुढत राहतो व मानसिक संतुलन बिघडवून घेतो.

या मानसिकतेवर एक उपाय म्हणजे प्रत्येक टप्प्यावर जबाबदारीचे विश्लेषण करत राहणे. अपराधीपणाची टोचणी वाटत असल्यास या सर्व प्रक्रियेमध्ये कोण कोण होते, घटना कसे घडत गेल्या, प्रत्येकाचा सहभाग किती, इत्यादीवरून जबाबदारीचे संपूर्ण चित्र उभे करता येऊ शकते. अशा प्रकारची विश्लेषण प्रक्रिया गुंतागुतीची असली तरी विश्लेषणाची जबाबदारी दुसऱ्यावर ढकलता येत नाही. स्वत: आपणच केल्यास आपल्यावरील जबाबदारीचा अंदाज, कुठल्या घटकामुळे काय काय घडत गेले, इत्यादीची योग्य माहिती मिळू शकेल. त्यावरून यशापयशाला आपण कितपत जबाबदार आहोत हे नक्कीच लक्षात येऊ शकेल.

एखाद्याला जबाबदारीतून मुक्त करतानासुद्धा विचारपूर्वकपणे निर्णय घेण्याची गरज आहे. 'तिचा स्वभावच तसा आहे' वा 'तो पहिल्यापासूनच असा होता' ही कारणं एखाद्याला जबाबदारीतून मुक्त करू शकतीलही. परंतु 'तिने स्वभाव बदलण्यासाठी काही प्रयत्न केले का?' वा 'तो प्रगल्भ होण्यासाठी काही उपाय केले का?' या प्रश्नांना उत्तर शोधून जबाबदारी निश्चित करावी लागेल. काही तरी लंगडे समर्थन देत जबाबदारीतून मुक्त होण्याची धडपड करणे जबाबदार व्यक्ती म्हणून शोभणारी नाही.



# स्त्री जन्माची (जैविक) कहाणी

**पुरूषी नजरेतून सुशिक्षित स्त्री**

** अती विद्येने स्त्रिया व्यभिचारी होतील*

** स्त्रियांस सोडचिठ्ठी द्यावयाची असेल तरच स्त्री शिक्षणाविषयी अनुमोदन करावे.*

** अनेक स्त्रिया करण्याची पुरूषांना आज मोकळीक आहे. आपल्या हातून कदाचित परद्वारी गमन होते. स्त्रिया शिकल्या की त्या प्रश्न करतील "आम्हांला मोकळीक का नसावी "*

** स्त्रियांस शिकवून भाक-या भाजाव्या काय ?*

** स्त्रिया विद्वान झाल्यातर भ्रतार, आप्तपुरूष, वडील माणसे त्यांचा वचक बाळगणार नाहीत.*

** स्वंयवर, पुर्नविवाह, पुरषासारखे अधिकार मागणे याकरिता स्त्री बंड करेल.*

** बायका शिकू लागल्या तर त्यांचे नवरे मरतात.*

** बायकांना शाळेत पाठवले तर पुरषांच्या दर्शनाने भीड मर्यादा राहणार नाही*

** शाळेमध्ये कलावंतीण/हीन जातीच्या संसर्गाने पवित्रता व सदाचार जाईल.*

स्त्रियांना शिक्षण देऊ नये यासाठी अट्टाहास करणारे वर उल्लेख केलेले मुद्दे 'ज्ञान प्रसारक' या मराठी मासिकाच्या जानेवारी 1852 च्या अंकात प्रसिद्ध झाले होते. यावरुन स्त्रियाबद्दल, स्त्री शिक्षणाबद्दल त्याकाळी व्यक्त होत असलेली घृणा, तिरस्कार यांचा अंदाज येईल.

गेल्या दीडशे वर्षात पुलाखालून भरपूर पाणी वाहून गेले आहे. टोकाच्या मतांची धार बोथटली आहे. परंतु पुरुषी मनाच्या कोप-यात यातील अनेक अवशेष अजूनही शिल्लक आहेत. याचा प्रत्यय प्रसार माध्यमाद्वारे आपल्याला पदोपदी येत असतो. पारंपरीक पुरषांना स्त्रीची सतत लाजरी, बुजरी, संकोची, वर मान करुन न बोलणारी अशीच प्रतिमा आवडते. सुशिक्षित स्त्री मात्र त्या प्रतिमेला धक्का देत असते. पुरुषांच्या जगात स्त्रीचे नेमके काय स्थान आहे. याविषयी मोठ्या प्रमाणात अभ्यास होत असून वर्तनशास्त्राच्या

संशोधकांनी याविषयीच्या अनेक मिथकांचा भांडाफोड केला आहे.



**बाहुली-भातुकली विरुद्ध चेंडू-गाड्या**

पुरुष व स्त्री याच्यांत सांस्कृतिकरित्या समानता आणण्यासाठी सत्तरच्या दशकात मुलांच्या हातात बाहुली व भातुकलीची खेळणी व मुलींच्या हातात गाड्या, चेंडू सारख्या खेळणी देत होते. स्त्रियांची चूल-मूल ही प्रतीमा बदलून पुरषासारखे सशक्त, सक्षम, सबल करण्याचा हा क्षीण प्रयत्न होता. खेळणी बदलल्यामुळे फरक पडू शकतो या गैरसमजुतीचा हास्यास्पद प्रकार होता. आज ते का शक्य नाही कळत आहे. मुलगा व मुलगी उपजतच काही परस्पर विरोधी गुण-विशेष घेऊन जन्माला येतात. खेळणींची निवडसुद्धा त्यानुरच होत असते.

मुलगा वा मुलगी – स्त्री वा पुरुष – यांची जडण-घडण उत्क्रांतीतून झालेली आहे, व त्यांच्या वर्तनात फरक आहे, याबद्धल आज तरी दुमत नाही. परंतु यातील कुठले गुणविशेष जैविक उत्क्रांतीतून तावून सुलाखून आलेल्या आहेत व कुठले गुण विशेष सामाजिक, सास्कृंतिक व कालमान परिस्थितीच्या दबावातून आलेल्या आहेत, हा संशोधनाचा विषय असून याचा अजूनही नीटसा अंदाज आलेला नाही.

**जन्मजात गुणविशेष**

काही वर्षापूर्वी अमेरिकेतील हार्वर्ड विघापीठाचे कार्याध्यक्ष, लॅरी समर्स यांनी स्त्रियामधील उपजत गुणामुळेच त्या अत्यंत जवाबदारीच्या वा निर्णय क्षमतेची गरज असलेल्या भौतिकी, गणितीय व अभियांत्रिकीच्या उच्च पदापर्यंत पोचू शकत नाहीत असे विधान केल्यानंतर हलकल्लोळ माजला होता. यावरुन स्त्री-पुरूषातील गुणविशेषांचा प्रश्न किती नाजूक व संवेदनशील आहे याची कल्पना येईल. चर्चेचा प्रस्ताव म्हणूनसुद्धा हे विधान स्वीकारार्ह नाही. मानवी स्वभावाचे स्पष्टीकरण म्हणून केलेले हे विधान अस्पष्ट व उघडउघड सुप्रजनास (युजेनिक्स) उत्तेजन देते आणि स्त्री-पुरूष विषमतेच्या दरीत भर घालते असा आरोप केला जात होता. नव-डार्विनवादी स्त्री-पुरूषांतील भेद दाखवणार-या काही उपजत गुणविशेषांचा मागोवा घेत आहेत. मेंदूच्या स्कॅनिंगचा अभ्यास करुन हे ठळक भेद कुठले आहेत याची त्यांना कल्पना येत आहे. त्यामुळे यासंबंधीच्या आपल्या पूर्वग्रहदूषित मतांना धक्का बसत आहे.

स्त्री म्हणजे काही संप्रेरकयुक्त पुरूष असा समज एकेकाळी होता तो पूर्णपणे चुकीचा असून मेंदूतील स्थित्यंतरामुळे स्त्रीत्व घडते असा दावा आज केला जात आहे. आठव्या आठवड्यापर्यंतच्या भ्रूणावस्थेतील स्त्री-पुरूष मेंदूत फरक नसतो. इतर शारीरिक अवयवाप्रमाणे गर्भावधी व प्रसूतीनंतरचा काही काळ या अवधीत टेस्टोस्टेरोन या संप्रेरकाच्या स्त्रावामुळे स्त्री-पुरूष मेंदूत फरक पडत जातो. या संप्रेरकात भिजून चिंब झालेला मेंदू मोडतोड करण्यासारख्या पुरूषी वर्तनाला उत्तेजन देतो. वर्तनातील हा फरक फार लवकर जाणवू लागतो. जन्माला आल्यानंतरच्या एका दिवसाची मुलगी, पाहणा-यांच्या चेहऱ्याकडे जास्त वेळ निरखून पाहते. तर मुलगा त्यांच्या जवळील मोबाइलकडे निरखून पाहतो. गर्भावस्थेत टेस्टोस्टेरोन स्त्राव जास्त झालेली मुलगी मुलांची खेळणी हातळण्यात रूची घेते व मुलगा आईच्या चेह-याकडे जास्त वेळ बघत नाही. संप्रेरकाचा स्त्राव कमी झालेल्या मुलात शब्दसंग्रह जास्त असतो. हा अभ्यास अजून प्राथमिक अवस्थेत असून संशोधन होत आहे. एक वर्षाच्या आतच

मुलगा व मुलगी यांच्यातील खेळणांच्या निवडीतील व्यत्यास लक्षात येऊ लागतात. मुलांना बंदूक, चेंडू, गाड्या आवडतात. मुलींना बाहुल्या, भातुकलीतील खेळणी आवडू लागतात. या गुणविशेषांवर सांस्कृतिक साचेबंदपणाचा आरोप करता येत नाही.

**मेंदूवरील संशोधन**

स्त्री-पुरूषातील वर्तनातील व्यत्यास हा त्यांच्या मेंदूरचनेतील फरकांचा फलित असावा. फरक नक्कीच आहे परंतु त्यातून निष्कर्ष काढणे जिकिरीचे आहे. उदाहरणार्थ, पुरूषांचा मेंदू तुलनेने नऊ टक्के मोठा आहे. पुरूषाची बुद्धीमता जास्त आहे हे ठसवण्यासाठी याचा उपयोग यापूर्वी केला जात असे. परंतु मुळातच पुरूष हा स्त्रीपेक्षा जास्त आकारमानाचा असल्यामुळे मेंदूच्या आकारातील हा फरक असून बुद्धीमत्तेशी त्याचा संबध लावता येत नाही.

अलीकडे मेंदूबद्दलच्या ज्ञानात मोठ्या प्रमाणात भर पडत आहे स्त्री मेंदूत करड्या द्रवाचे (ग्रे मॅटर) प्रमाण तुलनेने जास्त आहे. स्त्री मेंदूतील काही भागात मज्जा-पेशींची वीण जास्त घट्ट आहे. यामुळे एकूण मज्जा-पेशींच्या संख्येत कुठलाही फरक पडला नाही. परंतु मेंदूच्या दोन्ही अर्धगोलांना जोडणारी पांढऱ्या द्रव्यापासून तयार झालेली कॉर्पस कॅलोसमचा आकार स्त्रीच्या तुलनेने पुरषांच्यात लहान असतो. म्हणूनच जटिल समस्येचे उत्तर शोधताना पुरुषाचा मेंदू एकाच अर्ध गोलाची निवड करतो तर स्त्री दोन्ही अर्ध गोलाची निवड करते.

मेंदूची रचना व नस जोडणीतील हे व्यत्यास बुध्यांकाच्या चाचणीवर कुठलाही परिणाम करत नाहीत. फक्त या चाचणीचा प्रतिसाद स्त्री पुरूषांच्या मेंदूत वेगवेगळया रीतीने मिळतो. गणितीय तर्क व पुरुषातील टेम्पोरल लोब प्रक्रिया यांचा एकमेकाशी संबंध आहे हे लक्षात आले असून स्त्रियांच्या संदर्भात हा संबंध आढळला नाही. बुध्यांकासाठी पुरूष करड्या द्रव्यावर तर स्त्रिया पांढ-या द्रव्यावर विसंबून असतात.

मेंदूचा आकारमान व त्याची अंतर्गत/बाह्य रचना आणि स्त्री-पुरूषांतील वर्तन व्यत्यास किती गुंतागुंतीची असू शकेल याची कल्पना येऊ शकेल. मेंदूची रचना व वर्तन यांचा अन्योन्य संबध आहे असे क्षणभर मान्य केले तरी या गोष्टी उपजत आहेत असे विधान आपण करू शकणार नाही. आत्तापर्यंतचे सर्व संशोधन प्रौढ व्यक्तींच्यावर केल्या आहेत. वर्तनातील व्यत्यासांना केव्हापासून सुरुवात होते याची अजून कल्पना नाही. मेंदूत प्रौढ वयातसुद्धा उत्परिवर्तन (म्युटेशन) होऊ शकते. माणसातील त्रिमितीय गुण-विशेषांसाठी कारणीभूत असलेल्या मेंदूजवळील हिप्पो कॅम्पस या भागातील मज्जापेशींचे पुनरूत्पादन संप्रेरकामुळे होत असते व त्या पेशी टिकून असतात. स्त्रियांचा मेंदू या दृष्टीने फार लवचिक असतो. गर्भारपण, ऋतुनिवृत्ती व यौवनावस्थेत पदार्पण या कालावधीत मोठ्या प्रमाणात त्यांच्यात फरक होत असतो.

**मानसशास्त्रीय संशोधन**

स्त्री-पुरूषात मानसिकरित्या भेद आहेत की नाही, याचा अनेक संशोधकानी अभ्यास केला आहे. अभ्यासकांनी व्यक्तिमत्व, सामाजिक वर्तन, स्मरणशक्ती व काही क्षेत्रातील त्यांची क्षमता यावर लक्ष केंद्रित करून निष्कर्ष काढले आहेत. पुरूष जास्त आक्रमक व गणितीय विश्लेषणात प्रभुत्व असलेले तर स्त्रिया जास्त भावुक व वाक्-सामर्थ्य असलेले आहेत असा निष्कर्ष काढण्यात आला.

या प्रकारच्या अभ्यासांच्या पण काही समस्या आहेत. मुळातच संशोधकांचा केवळ सकारात्मक निष्कर्षांना प्रसिद्धी देण्याकडे कल असतो. त्यामुळे ज्यात फरक आढळत नाही त्यांना प्रसिध्दीच मिळत नाही. काही वेळा लिंगभेदातील किरकोळ फरकांनासुध्दा अमाप प्रसिध्दी मिळते, व प्रसार माध्यमं अशा गोष्टीचें उदात्तीकरण करून दिशाभूल करतात. म्हणूनच अपुऱ्या व चुकीची माहिति असलेल्या *'मेन फ्रॉम मार्स व विमेन फ्रॉम व्हिनस'* सारख्या पुस्तकांच्या लाखो प्रती खपतात. उदाहरणार्थ, पुरूषांपेक्षा स्त्रियामध्ये संभाषण क्षमता जास्त आहे, असा एक समज आहे. शब्दसामर्थ्य वा वाचनाचे रसग्रहण

यांचे अनेक चाचण्या घेतल्यानंतरसुद्धा मुलं व मुलींमध्ये तसा फार फरक जाणवला नाही. प्रौढ स्त्रिया मात्र तुलनेने जास्त बोलघेवडे असतात व त्यांच्याकडे विपुल शब्दभांडार असतो. विशेष म्हणजे हा फरकसुध्दा जाणवण्याइतका मोठा नव्हता.

**सांख्यिकी मापदंड**

लिंगभेदाची तुलना करण्यासाठी ‘डी’ या सांख्यिकी मापदंडाचा वापर संशोधक करत आहेत. दोन गटातील – स्त्री व पुरूष – सरासरी व्यत्यासाला कुठल्या घटकांचा हिस्सा कारणीभूत आहे हे दर्शविणारे ते एक मानक आहे. स्त्री व पुरूषामधील सरासरी उंचीतील फरक दर्शवणाऱ्या 'डी' चे मूल्य 2 आहे. कुठल्याही स्त्री-पुरूष गटाचा अभ्यास केल्यास पुरूषांची सरासरी उंची स्त्रियांपेक्षा जास्त आहे, याबद्दल दुमत नाही. वर्तणूक व मानसिक दृष्यघटनेंच्या संदर्भात ‘डी’ चे मूल्यांकन केले असून डी चे मूल्य 0.8 असल्यास जास्त 0.6 असल्यास माफक, व 0.2 असल्यास कमी असे समजले जाते. 0.2 पेक्षा कमी मूल्य असल्यास व्यत्यास किरकोळ आहे. या मूल्यांकनाचा वापर करून लिंगभेदासंबंधातील काही घटकांचे संख्याशास्त्रीय प्रमाणित विश्लेषण केले आहे. यासाठी गणितीय क्षमता, वाक्-सामर्थ्य व आक्रमकवर्तन हे गुणविशेष निवडले होते. यातील काही महत्वाचे निष्कर्ष खाली नमूद केले आहेत.

( + पुरूषासाठी, - स्त्रियासाठी )

**पुरूषांची सरशी: डी**

त्रिमितीय संकल्पना +0.73

आक्रमक वर्तन +0.6

गणितीय क्षमता (15-25 वयोगट) +0.32

**किरकोळ व्यत्यास: डी**

शब्द संग्रह -0.02

वाचन रसग्रहण -0.03

गणितीय क्षमता (11-14 वयोगट) -0.02

**स्त्रियाची सरशी: डी**

स्मित हास्य -0.4

स्पेलिंग -0.45

अप्रत्यक्ष आक्रमक वर्तन -0.74 ते +0.05

**शारीरिक क्षमता:** शारीरिक क्षमतेच्या बाबतीत मात्र पुरूष स्त्रियापेक्षा वरचढ आहेत. (चेंडू जास्त वेगाने फेकणे +2.14, चेंडू लांब अंतरापर्यंत फेकणे +1.98) या क्षमता पुरूषाच्या शारीरिक उंचीवर अवलंबून असल्यामुळे यात आश्चर्य वाटण्यासारखे काहीही नाही. लैंगिक गुणविशेषांचा अभ्यास करताना हस्त मैथुनाची वारंवारता (+0.96) व विवाहबाह्य संबंध (+0.81) पुरूषांच्यात जास्त प्रमाणात आढळतात. लैंगिक समाधानाबाबतीत मात्र स्त्री-पुरूषात काही व्यत्यास नाही.

**आक्रमकता:** आक्रमकतेच्या बाबतीत पुरूषांची सरशी आहे (+0.6) याबद्दल दुमत नाही. परंतु यावरून निर्ष्कष काढण्यात घाई करण्यात अर्थ नाही. एका अभ्यासानुसार पुरूषांच्या आक्रमकतेत दिखाऊपणा जास्त असतो. याउलट स्त्रीला कुठलेही दुष्परिणाम होणार नाहीत याची खात्री असल्यास तीसुध्दा जास्त आक्रमक बनते. हिंस्त्र बनते. हिंस्त्र असो वा नसो, स्त्रिया आपला राग दीर्घकाळ जोपासतात. या रागाचे पुढे काय होते याचा अभ्यास करताना पुरूष शारीरिक इजा करून मोकळे होतात परंतु स्त्रियांचा कल शारीरिक इजा करण्यापेक्षा टोचून बोलणे, अफवा पसरवणे, निंदा करणे इत्यादी प्रकाराने मानसिक इजा करण्याकडे असतो, हे लक्षात आले. स्त्रियांचे मातृहदय त्यांना शारीरिक इजा करण्यास अनुमती देत नसेल.

**गणितीय क्षमता:** गणितीय क्षमतेच्या बाबतीत असलेला मोठा फरक हासुध्दा चर्चेचा विषय आहे. यौवनावस्थेत पदार्पण करेपर्यंत मुलं व मुलींच्या याबाबतीतील क्षमतेत फरक नाही. यामुळे स्त्री पेक्षा पुरूष सर्व वयोमानात गणितीय संकल्पनाची जाण, संगणन (कॉम्प्युटेशन) इत्यादी कौशल्यात स्त्री वा

पुरूष असा भेद करता येत नाही. फक्त गणितांची उत्तरं शोधण्याच्या कौशल्यात प्रौढ पुरूषांची सरशी आहे.

स्त्रियापेक्षा पुरूष त्रिमितीय वस्तूंची कल्पना करण्यात, मनातल्या मनात त्या वस्तू फिरवण्यात, सुटे भाग जोडण्यात जास्त सक्षम आहेत. (+0.73) अभियांत्रिकीत, रचनाशास्त्रात या प्रकारच्या कौशल्याची गरज भासते. पुरूषातील ही क्षमता कदाचित गर्भावस्थेतील टेस्टोस्टेरोन संप्रेरकाच्या अती स्त्रावामुळे आली असण्याची शक्यता आहे. म्हणूनच याच्या अतीस्त्रावामुळे काही मुलींच्या त्रिमितीय संकल्पनेच्या क्षमतेत वाढ झालेली असते हे लक्षात आले.

परंतु अवकाशासंबधीच्या कामात पुरूषांचा वरचष्मा असतो असा त्याचा अर्थ होत नाही. पुरूष या बाबतीत जास्त कुशल आहेत हा एक भ्रम आहे. पुरूष व स्त्रिया मार्ग निदर्शनाच्या बाबतीत समान आहेत. फक्त हे कार्य कशा प्रकारे केले जाते याबद्दल भेद आहेत. स्त्रिया मार्गातील खाणाखुणा लक्षात ठेऊन मुक्कामापर्यंत पोचतात. पुरूष मात्र त्रिमितीच्या आधारे दिशा व अंतर यांचा अंदाज घेत घेत मुक्कामाला पोचतो.

पुरूषांच्या गणितीय कौशल्याबाबतीतसुद्धा असाच भ्रम पोसला जात आहे. यासाठी गणित व विज्ञानाच्या प्राध्यापिकांची कमी संख्या याकडे बोट दाखवले जात असते. सरासरी क्षमता लक्षात घेतल्यास स्त्री व पुरूष यात व्यत्यास नाही. या क्षमतेच्या वितरण वक्राचा (डिस्ट्रिब्युशन कर्व्ह) अभ्यास केल्यास वक्राच्या दोन्ही टोकांच्या भागात पुरूषांची संख्या जास्त आहे. हे लक्षात येईल यावरून काही पुरूष तद्दन मूर्ख किंवा विलक्षण बुध्दिवंत असू शकतात, असा अनुमान काढता येईल.

डॉ लॅरी समर्स यांनी केलेल्या विधानाचा परामर्श घेत असताना गेल्या पन्नास वर्षात शैक्षणिक व इतर ज्ञानक्षेत्रात स्त्रियांनी केलेल्या अभूतपूर्व प्रगतीकडे दुर्लक्ष करता येत नाही. शिस्तीचे पालन करत व वाटेतील सर्व अडथळे पार करत वरच्या सोपानापर्यंत त्या पोचल्या आहेत. इतर कुठल्याही

मनोऱ्यापेक्षा शैक्षणिक क्षेत्राच्या हस्तिदंताच्या मनोऱ्यापर्यंत पोचणे आज जरी दुरापास्त वाटत असेल. तरी यासाठी वैज्ञानिक, गणितीय व अभियांत्रिकी क्षेत्रातील उच्च पदासाठी स्त्रियांचा नगण्य सहभागास त्याच्यांतील उपजत किंवा उत्परिर्वतक गुणविशेषांचा योगदान कितपत आहे याचा पुन्हा एकदा अंदाज घ्यावा लागेल.

उपजत असू शकेल पंरतु उत्परिवर्तक नाही असे म्हणता येणार नाही. त्रिमितीय क्षमतेची वाढ प्रशिक्षणातून, प्रोत्साहनातून शक्य आहे. अभियांत्रिकीतील प्रशिक्षणामुळे कौशल्य प्राप्त झालेल्या स्त्रियांचे प्रमाण 47 टक्क्यापरून 77 टक्क्यापर्यंत गेलेली उदाहरणं आहेत. त्या आता संक्रमणावस्थेतून जात आहेत. शैक्षणिक क्षेत्रातील हस्तिदंताच्या मनो-यापर्यंत त्या नक्कीच पोचतील.

जीवशास्त्र आपल्या जडण घडणीला कारणीभूत आहे हे मान्य असले तरी जीवशास्त्र हाच आपल्या मुक्कामाचे स्थान आहे असे म्हणण्यात अर्थ नाही.



# ध्यानम् सरणम् गच्छामी ....

ध्यानधारणा ही कुणाच्याही गळी उतरवण्यास सुलभ गोष्ट आहे हे प्रथम मान्य करायला हवे. अनादी काळापासून ध्यानधारणा सर्वांच्या परिचयाची आहे. जगभरातील बहुतेक धर्मांनी ध्यानप्रकाराचा पुरस्कार केला आहे. धार्मिक मान्यतेमुळे हा एक चांगला संस्कार आहे असे वाटत आले आहे. अगदी 1-2 मिनिटापासून ते दिवसातील 16-18 तास वेळेची अपेक्षा करणारे विविध ध्यानप्रकार आहेत. परंतु अलिकडे ध्यानधारणेला बाजारी स्वरूप आल्यामुळे काही तरी भव्य दिव्य यातून निर्माण होते असे सुशिक्षिताना वाटत आहे. परंतु ध्यानधारणेमुळे खरोखरच काही ठाशीव फरक जाणवतो का? हा प्रश्न आता विचारावासा वाटतो. या प्रश्नाचे उत्तर शोधण्यापूर्वी या प्रश्नाला अजून काही पदर आहेत, याकडे लक्ष द्यावे लागणार आहे. ध्यानधारणेच्या उपयुक्ततेबद्दलच्या विधानामध्ये काही तथ्य आहे का? याची वैज्ञानिकदृष्ट्या तपासणी करावी लागेल. तसेच ध्यानधारणेमध्ये वैज्ञानिक असे काही असू शकेल का? हाही प्रश्न विचारता येईल. वैद्यकीयदृष्ट्या त्याचे काही दुष्परिणाम होत असल्यास त्याची माहिती करून घ्यावी लागेल.

**वैज्ञानिक संशोधन**

गेली पन्नास वर्षे ध्यानधारणेवर वैज्ञानिक संशोधन केले जात आहे. ध्यानधारणेत अक्षरश: शेकडो प्रकार आहेत. त्यामुळे संशोधन पुढे सरकत नाही. जितक्या व्यक्ती तितके प्रकार असा काहिसा विचित्र अनुभव संशोधकांना येत आहे. तरीसुद्धा काही प्रमाणात संशोधन चालूच आहे. ढोबळ मानाने ध्यानधारणेचे दोन प्रकार करता येतात. एका प्रकारात मनात एखादी वस्तू - मूर्ती, मंत्र, शब्द वा असले काही तरी धरले जाते व त्याचेच स्मरण पुन्हा पुन्हा दिवसातून जमेल तेवढ्या वेळ केले जाते. यामुळे मनात इतर भावना वा विचार व बाहेर घडणाऱ्या बारीक सारीक घटनांच्याकडे लक्ष न जाता एकाग्रता साधली जाऊ शकते. (या ध्यानधारणेत चित्त विचलित होऊ नये म्हणून डोळे बंद करणे अपेक्षित असते. ) दुसऱ्या प्रकारात असे एखाद्याच गोष्टीकडे मन

केंद्रित न करता सर्व गोष्टींना मुक्त प्रवेश दिला जातो. मनपूर्ततेला महत्व देत मनात येणाऱ्या अनुभवांना एकाग्रतेचे लक्ष मानले जाते. य़ा प्रकारची ध्यानधारणा करत असताना ध्यानोपासक एका ठिकाणी बसून डोळे उघडे ठेऊनच ध्यान करत असतो. तो आपल्या मनात उमटलेले विचार, डोळ्यासमोर दिसणारे दृष्य, ऐकू येणारे शब्द यात काहीही फरक करत नाही. त्यांना दूर सारत नाही. अशा प्रकारच्या ध्यानधारणेत अनुभवांचा प्रवाह अव्याहतपणे वाहत असतो. या अनुभवांचे वर्णन, विश्लेषण वा चिकित्सा करता येत नाही, अशी त्यांची ठाम समजूत असते.

पहिल्या ध्यान प्रकारात आपल्यासमोर असलेले जग पूर्णपणे नाहिसे झालेले आहे, या समजुतीला जास्त महत्व दिले जाते. परंतु दुसऱ्या प्रकारात आपल्यासमोर दिसणारे जग नाहिसे न होता अगदी नवे कोरे ताजे, यापूर्वी कधीच न पाहिलेले अशा स्वरूपात दिसते असा त्यांचा दावा आहे. बौद्ध धर्माशी संबंध जोडणारे झेन, विपश्यना यासारखे ध्यान प्रकार या दुसऱ्या प्रकारात मोडतात. गुरू परंपरेतील ध्यान पहिल्या प्रकारात मोडते.

या दोन्ही प्रकारात एखादा आगंतुक विचार मनात आला तरी त्याला मुद्दाम बाजूला न सारता किंवा त्याला दाबून न ठेवता नैसर्गिकरित्याच आपोआप मनातून निघून जावे अशी अपेक्षा केली जाते. काही वेळेपुरते का होईना मन स्थिर ठेवण्यासाठी थोडासा कालावधी त्यासाठी देणे हा उद्देश त्यामागे असतो. अनेक प्रकारचे विचार व भावना आपले लक्ष विचलित करण्यासाठी टपून बसलेले असतात. त्यात आपण गुंतत जातो, वाहवत जातो. केव्हा गुंतलो हेसुद्धा आपल्याला कळत नाही. त्यातून मनोविकाराची शक्यता असते. मनोविकारातून मनस्वास्थ्य बिघडते, बिघडलेले मनस्वास्थ्य शरीरस्वास्थ्य बिघडू पाहते. अशाप्रकारे हे चक्र चालू होते. परंतु त्या विचारांना व भावनांना मोकळीक देणे हा एक त्यावरचा उपाय असू शकतो. काही काळानंतर ते विचार व त्या भावना परत येणार नाहीत असे यात गृहित धरले जाते.

ध्यानधारणेत ध्यान करण्याचे कौशल्य हस्तगत करण्यावर नेहमीच भर दिला जात असतो. जसजशी ध्यानधारणेतील कुशलता वाढत जाते तसतसे आपल्याला 'अनुभव' येऊ लागतात. अतीव आनंद, देहाच्या हलकेपणाचा अनुभव, हवेत तरंगल्यासारखे वाटणे, आहे त्या परिस्थितीला जुळवून घेण्याची मानसिकता, त्रयस्थपणे जगाच्या घडामोडीकडे बघण्याची वृत्ती वगैरे प्रकारचे अनुभव विकसित होऊ लागतात, असे ध्यानधारणेच्या पुरस्कर्त्यांचे म्हणणे आहे. या अनुभवांचे वर्णन (म्हणजे नेमके काय कुणास ठाऊक!) शब्दात पकडता येत नाही असे त्यांचे म्हणणे असते. त्यातील नेमकेपणा प्रत्येक ध्यानपद्धतीप्रमाणे बदलत जातो. त्यातील अत्युच्च अनुभव म्हणजे समाधी (?) निर्वाणावस्था (?) वा साक्षात्कार (?) अशा गोष्टींचे उदात्तीकरण करत त्यांचे प्रलोभन सर्वासमोर ठेवले जाते. बहुतेक ध्यानपद्धतीत या सर्वांवर धार्मिकतेचा मुलामा चढवला जातो. धार्मिक मान्यतेमुळे ध्यानधारणेतील जास्त अनुभवी स्वत:ला इतरापासून वेगळे, श्रेष्ठ असे समज करून घेतात. काही ध्यानपद्धतीत मात्र अशा अनुभवांना विशेष महत्व दिले जात नाही. त्यांच्या मते हाही एक नैसर्गिक वाढीचाच प्रकार असून त्याबद्दल जास्त न बोलण्याची गरज नाही. बाजारीकरणामुळे ध्यानधारणेच्या अशा अनुभवांना प्रसिद्धी मिळत राहते. त्याची जाहिरात केली जाते. दुसरीकडे जपानच्या झेन पद्धतीसारख्या प्रकारात ध्यान म्हणजे केवळ (स्वस्थ) बसणे एवढ्या पुरतेच मर्यादित अर्थाने बघितले जाते.

यातच ध्यान प्रकारातील विसंगती दडली आहे. उद्देश स्पष्ट नाही, उद्देशाच्या मार्गाचा पत्ता नाही, एकवाक्यता नाही. ध्यानधारणेच्या पुरस्कर्त्यांना खोदून खोदून विचारल्यास अनुभवांच्या मार्गाने जातानाच प्रगती होत राहील, असे संदिग्ध काही तरी सांगितले जाते. ही संदिग्धता नकारात्मक असते. उद्देश साफल्यासाठी निश्चित असा एकच मार्ग असावा लागतो. उदाहरणार्थ, एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी जाण्यासाठी हजारो मार्ग असू शकतील. परंतु सर्वात कमी अंतराचा मार्ग एकच असतो. कुठल्याही मार्गाने जा कुठलेही

ठिकाण येईल त्याच ठिकाणी तुला जायचे होते असे कुणी म्हणू लागल्यास त्यात नक्कीच तार्किक विसंगती आहे असे म्हणता येईल.

ध्यानधारणेत प्रयत्न करताना मार्ग बदलत गेल्यास यातला नेमका योग्य मार्ग कोणता व योग्य बदल कोणते याची पूर्व कल्पना असणे गरजेचे आहे. जाणीवेची एखादी उन्नतावस्था किंवा मोजमाप करण्यासारखे एखादे कौशल्य किंवा जगाकडे वेगळ्या प्रकाराने पाहू शकणारी अंतर्दृष्टी असले काहीही ध्यानधारणेतून निश्चित प्रयत्नानंतर साध्य होईलच असे ठामपणे सांगता येत नाही. सर्व काही बेभरवशाचा व्यवहार, संदिग्ध, धूसर!

**ताण-तणाव**

ध्यानधारणेमुळे मानसिक ताण-तणाव कमी होतो व असाधारण परिस्थितीचा सामना करण्याचे बळ प्राप्त होते असा पुरस्कर्त्यांचा दावा असतो. इतरांच्या तुलनेत ध्यानोपासक जास्त खंबीरपणे परिस्थिती हाताळू शकतात यावर त्यांचा विश्वास असतो. ध्यानधारणेसाठीच म्हणून पगारी रजा देण्याची आयएएस, आयपीएस दर्जाच्या अधिकाऱ्यांच्या मागणीमुळे महाराष्ट्र शासनाने रजा देण्यास अनुमती दर्शविली. जबाबदार पदावर काम करत असताना ताण वाढू नये, मनस्वास्थ्य लाभावे, मनाचा समतोल बिघडू नये, योग्य निर्णय घेता यावे व त्यासाठी विपश्यना या ध्यानधारणा मार्गाचा अंगीकार करावा अशीही शासनाची सूचनावजा आज्ञा होती.

ध्यानधारणेमुळे मानसिक ताण तणाव कमी होतो याबाबतीत मात्र सर्व प्रकारच्या ध्यानांच्या पुरस्कर्त्यात एकमत आहे. हायपरटेन्शन, दमाविकार, दाढदुखी, व्यसनाधीनता, निद्रानाश, मधुमेह, इत्यादी विकारावर ध्यानधारणा एक उपचार पद्धती म्हणून सुचवली जाते. सुरुवातीच्या काही चाचण्यामध्ये ध्यानामुळे हृदयाचे ठोके, घाम, श्वासोच्छवास, रक्तदाब इत्यादी शारीरिक लक्षणावर परिणाम होऊ शकतो हे आढळले. परंतु या प्रयोगात काही त्रुटी होत्या. यात प्रामुख्याने ध्यानाच्या अगोदर व ध्यानानंतर या लक्षणांची मोजणी केली होती. विज्ञान प्रयोगात अगदी महत्वाची मानलेली नियंत्रित प्रयोगाची

पद्धत वापरली नव्हती. नियंत्रित प्रयोग करताना ध्यान करणारे व ध्यान न करणारे अशा दोन्ही गटांना विश्रांती घेण्यास सांगितले. त्यानंतर ताण तणावाच्या लक्षणांचे मोजमाप करण्यात आले. आश्चर्याची गोष्ट म्हणजे दोन्ही गटांच्या लक्षणात काही फरक दिसून आला नाही. यावरून थोडीशी विश्रांती घेतल्यास ध्यानाची गरज भासणार नाही असे निष्कर्ष काढण्यात आले. व्यसनाधीनता वा दम्यासारख्या रोगांसाठी दिवसातून काही वेळा विश्रांती घ्या असा सल्ला दिल्यास कुणी ऐकून घेतील का?

या वैज्ञानिक प्रयोगाचे निष्कर्ष स्वीकारणे ध्यानोपासकांना जड वाटू लागले. परंतु आणखी काही प्रयोग केल्यानंतरसुद्धा पहिल्यांदा काढलेल्या निष्कर्षांनाच पुष्टी मिळाली. तरीसुद्धा ध्यान जरी ताण तणाव कमी करत नसले तरी ध्यान असाधारण परिस्थितीचा सामना करण्यासाठी शक्ती देते असा दावा ध्यानोपासक करू लागले. याबद्दलच्या तपासणीसाठी काही प्रयोग सुचवण्यात आले. एका प्रयोगात ध्यानधारकांना व ध्यान न करणाऱ्यांना एक चित्तथरारक चित्रपट दाखवण्यात आला. चित्रपट पाहून झाल्यानंतर त्यांच्या मनस्थितीचा अंदाज घेणारे काही प्रश्न विचारण्यात आले. त्यांच्या बुद्ध्यांकाची चाचणी घेण्यात आली. त्यानी दिलेल्या उत्तरावरून काही निष्कर्ष काढण्यात आले. चित्रपट बघत असताना

ध्यानधारकांची प्रतिक्रिया ध्यान न करणाऱ्यांच्या तुलनेने सौम्य होती. परंतु प्रत्यक्ष चित्रपट बघण्यापूर्वी ध्यानधारकांची प्रतिक्रिया तीव्र होती हे मात्र संशोधकांना बुचकळ्यात टाकणारे वाटले. ध्यानधारकांची अस्वस्थता कमी होती हे जरी खरे मानले तरी त्यांच्या अजिबात अपेक्षा नव्हत्या असे म्हणणे रास्त वाटणार नाही.

दुसऱ्या एका प्रयोगात तीन गट निवडण्यात आले. एक गट नित्या नियमाने ध्यान करणाऱ्यांचा होता. दुसरा गट चार महिने स्नायूंच्या शिथिलतेसंबंधी व्यायाम करणाऱ्यांचा होता. व तिसरा गट मात्र या दोन्ही प्रकारात न बसणाऱ्यांचा होता. या तिन्ही गटांना प्रयोगाच्या वेळी कानठळ्या बसवणारा

मोठा आवाज ऐकवण्यात आला. आवाज ऐकवण्यापूर्वी, आवाजाच्या वेळी व आवाजानंतर गटातील सर्वांच्या हृदयाचे ठोके मोजण्यात आले. ध्यानधारकांच्या गटातील ध्यानस्थांच्या हृदयाचे ठोके आवाज ऐकण्यापूर्वी व आवाज ऐकून झाल्यानंतर जास्त जोरात होते. परंतु प्रत्यक्ष आवाज होताना मात्र इतरांपेक्षा अगदी कमी प्रमाणात पडत होते. यावरून ध्यानधारकामध्ये ताण तणावाच्या प्रसंगात अस्वस्थता व चिंतेची भावना कमी आहे असे वाटत असले तरी ताण तणावामुळे उद्भवलेल्या शारीरिक लक्षणामध्ये काही फरक पडत नाही हेच दिसून येते. ध्यान धारणा ताण तणावापासून आपल्याला मुक्त करू शकत नाही हेच यावरून सिद्ध होते.

बौद्ध ध्यानपद्धतीचा हिरीरीने पुरस्कार करणारे वर उल्लेख केलेले निष्कर्ष वाचून आपलेच तत्वज्ञान बरोबर असल्याचे जाणून कदाचित सुखावत असतील. कारण त्यांच्या ध्यानपद्धतीत जग जसे आहे तसे स्वीकारणे अपेक्षित असते. ध्यान केल्यामुळे काही तरी मिळू शकते याची अपेक्षा करणे निरर्थक असते असा त्यांचा सिद्धांत आहे. जग आहे तसे स्वीकारल्यामुळे मानसिक गोंधळ नाही, कुठलाही भ्रम नाही, असे बौद्ध ध्यानोपासकांना वाटते. दु:खाचे मूळ शोधण्यास ध्यानाचा हातभार लागतो असेही त्यांना वाटते. परंतु जग आहे तसे स्वीकारणे म्हणजे नेमके काय हे स्पष्ट होत नाही. मानसशास्त्रज्ञांच्या मते माणसांचा मेंदू ज्ञानेंद्रियांच्या इनपुट्सवरून जगाचे प्रतिरूप (मॉडेल) तयार करतो. हे प्रतीरूप त्यांच्या इच्छा, आकांक्षा पूर्ण करणाऱ्या असतात. म्हणजेच त्यातील बहुतेक गोष्टी सकारात्मक असतात. त्यांच्या आवाक्याबाहेरची कुठलीही गोष्ट त्या प्रतिरूपात नसते. ते एक त्यांचे स्वतंत्र जग असते. परंतु याचा अर्थ बाहेर असलेल्या वास्तव परिस्थितीतील खऱ्या जगाचे ते प्रतीरूप असते असे म्हणता येणार नाही. या प्रतीरूपाचा पाया इंद्रियगम्य माहितीवर आधारित असल्यामुळे इंद्रियांना - त्यांच्या न कळत - त्यांना न जाणवलेल्या माहितींची त्यात सरमिसळ होऊ शकते. म्हणजेच त्या व्यक्तीला समजलेले जग व वास्तवात असलेले जग यामध्ये नक्कीच तफावत असते.

यासंबंधी एक प्रयोग करताना रोज 15-16 तास नियमितपणे ध्यान करणारे व फक्त 2 तास ध्यान करणारे असे दोन गट निवडण्यात आले. त्यांना लांबून 2 ते 4 वेळा प्रखर दिव्याची ज्योत दाखवण्यात आली. काही वेळा दिव्याची उघड झाप करण्यात येत होती. परंतु या दोन्ही गटात प्रकाशाच्या आकलनाविषयी विसंगती आढळली. म्हणजेच इंद्रियाद्वारे मिळालेली सर्व माहिती अचूक असेलच याची खात्री देता येणार नाही

**जगाचे मॉडेल**

माणूस नेहमीच आपल्याला जे जग हवे त्याचेच प्रतीरूप मनात साठवत असतो. त्यात त्या व्यक्तीची जाण, समज, अनुभव वैचारिक कुवत यांचेच प्रतिबिंब उमटलेले असते. त्याच्यातील मर्यादा व वैशिष्ट्ये यांचा शोध त्या प्रतीरूपात घेता येते. उदाहरणार्थ लहान मुलं परिकथेच्या जगात वावरत असतात. तरुण-तरुणींचे रोमॅंटिक जग इतराहून वेगळे असते. .....तसेच त्या प्रतीरूपात त्या त्या व्यक्तीच्या पूर्वानुभवाचा संग्रहही असतो. त्यामुळे त्या व्यक्तीला उमजलेले जग हे वास्तवापासून शेकडो कोस दूर असते.

याबाबतीतही एक प्रयोग करण्यात आला. या प्रयोगात एका गल्लीतील रस्त्याचे, त्यातील घरांचे व झाडा-जुडपांचे एक चित्र काहींना दाखवण्यात आले. व असेच एक हुबेहूब रेखाचित्र काढण्यास सांगितले. यातील बहुतेकांच्या रेखाचित्रात दारे खिडक्या, घरांचे छप्पर, झाडे इत्यादींचे प्रमाण मूळ चित्राप्रमाणे नव्हत्या. चित्र काढणारे आपापल्या मनात साठलेल्या दारे-खिडक्यांचे चित्र काढत होते. मनात साठवलेल्या कल्पनांनाच चित्ररूप देण्याचा तो प्रयत्न होता. म्हणून त्यात अनेक लहान मोठे चुका राहिल्या होत्या.

**एकाग्रता**

इतरापेक्षा ध्यानोपासकांच्यात एकाग्रता जास्त असतो हा दावाही फोल ठरला आहे. मुळात एकाग्रता म्हणजे नेमके काय याचा अर्थ बोध होत नाही. एका शोधनिबंधात याविषयी माहिती आलेली आहे. या संशोधकाच्या मते

इंद्रियाद्वारेच आपण एखाद्या गोष्टीकडे लक्ष देऊ शकतो. परंतु असे करताना एकाच वेळी एकाच ठिकाणी एकाग्र चित्त होण्याचा संभव फारच कमी असतो. कारण आपण नेहमीच एका वेळी अनेक गोष्टी (मल्टी प्रोसेसिंग) हाताळत असतो. मुळात आपली एकाग्रता आपल्या मानसिक जडण - घडणीवर जास्त करून अवलंबून असते. शेक्सपियरच्या मॅकबेथ नाटकातील मॅकबेथला 'आपण राजा होणार' ही वाणी कुठल्याही शारीरिक हालचालीविना पटली होती. म्हणूनच त्याच्या यानंतरच्या सर्व शारीरिक व मानसिक हालचाली, प्रतिक्रिया त्याच दिशेने होत होत्या. स्पर्धात्मक परीक्षेला बसलेला एखादा विद्यार्थी परीक्षा संपेपर्यंत शारीरिक व मानसिकरित्या तादात्म्य पावतो. त्यासाठी मानसिक तयारी असते. व त्याची मानसिक जडण - घडण त्याला मदत करते. अशा प्रकारे आपली मानसिक जडण घडण महत्वाची ठरत असून ध्यान करणारी व्यक्ती डोळे मिटते की डोळे उघडे ठेवते याला काही अर्थ उरत नाही.

ध्यान करण्यात व न करण्यात ध्यान सोडल्यास इतर कुठल्याही प्रकारे तुलना करण्यासारखे काहीही नसते, असा निष्कर्ष काढता येईल. पाश्चात्य देशातून आपल्या येथे ध्यान शिकण्यासाठीच आलेले व त्याच देशातील इतर यांची तुलना केल्यास फार वेगळे चित्र दिसणार नाही. या उलट ध्यान धारणा करणाऱ्या परदेशातील व्यक्ती चिंताग्रस्त असतात असेच आढळले. इतरापेक्षा ध्यानधारणेसाठी उत्सुक असणारे जास्त समस्याग्रस्त असतात. इतरापेक्षा दुप्पट प्रमाणात ही मंडळी मादक पदार्थांचे सेवन करतात, असे दिसून आले आहे.

**ध्यानधारणेचे दावे**

गंभीर समस्यांची हाताळणी ध्यानोपासक एखादी गंभीर समस्या कशी हाताळतात याचाही काही संशोधकांनी अभ्यास केला आहे. यासाठी जास्त अनुभवी ध्यानधारक व अननुभवी ध्यानोपासक यांच्यातील अनुभवांची तुलना करणे योग्य ठरेल असे संशोधकांना वाटत होते. परंतु यातही गोची होती. कारण जरी ध्यानाची सुरुवात करणाऱ्यांची संख्या भरपूर मोठी असली तरी मध्येच

कुठेतरी सोडून जाणाऱ्यांची संख्याही तितकीच मोठी असते. फारच कमी लोक शेवटपर्यंत टिकून राहतात. व ध्यानाचा सराव करतात. त्यामुळा ध्यानधारकांचा फार मोठा गट ध्यानानुभवापासून वंचितच राहतो. ध्यानाच्या परिणामाचा स्पर्षही त्यातील अनेकाना झालेला नसतो. मनोवैज्ञानिकांच्या मते ध्यानोपासनेतील अनियमितता ही मानसिक अनारोग्याचे लक्षण होय.. अशा व्यक्ती अंतर्मुख, ध्यानापासून फार कमी अपेक्षा ठेवणारी, अत्यंत टोकाची प्रतिक्रिया व्यक्त करणारी, प्रत्येक घटनेच्या कारणाचे बाह्य जगात शोध घेणारी असू शकते. अजून एका अभ्यासानुसार कादंबरी, चित्रपट वा दिवास्वप्न यामध्ये रमणाऱ्यासारखी मानसिकता या अर्धवटपणे ध्यान करणाऱ्यांची असते.सायकोसिस वा विषण्णता (डिप्रेशन) यांची लक्षणं असलेले ध्यानोपासना पूर्ण करण्याच्या मनस्थितीत नसतात. त्यांच्यावर ध्यान पूर्ण करण्याची जबरदस्ती केल्यास आत्महत्या वा विमनस्क वर्तणुकीत पर्यावसान होण्याची शक्यता असते. या तुलनेने स्थिरचित्त प्रकृती असलेलेच ध्यान पूर्ण करू शकतात. यावरून एखादी गंभीर समस्या हाताळताना ध्यानधारणेचा उपयोग कितपत होतो याबद्दल ठामपणे काही सांगता येत नाही असे संशोधकांना वाटते. कारण ध्यानधारकांची प्रतिक्रिया व इतर स्थिरचित्त असलेल्या सामान्यांची प्रतिक्रिया सारखीच असण्याचा संभव जास्त.

**DHEA त वाढ (?)**

*नियमित ध्यानाने निरामय आरोग्य व मानसिक स्वास्थ्य लाभते, याला विदेशी अभ्यासकांनीही मान्यता दिली आहे. डोकेदुखी, पाठदुखी, अंगदुखी, शरीराच्या कोणत्याही अकारण भागात होणाऱ्या वेदना अशा किरकोळ दुखण्यांपासून पासून ते उच्च रक्तदाब, हृदयविकार, मधुमेह अशा गंभीर विकारांवरसुद्धा नियमित ध्यान करणे लाभकारक ठरते. काही दिवसापूर्वी 'New American Scientists Journal' मधील लेखाचा काही भाग वाचनात आला. त्यावरून एका प्रयोगाची माहिती मिळाली. आपल्या शरीरात DHEA नावाचे संप्रेरक तयार होत असते, जे शरीराची झीज रोखणे किंवा*

*तारुण्य राखण्याचे काम करत असते. या प्रयोगात साठ लोकांचे DHEA तपासले. नंतर यापैकी तीस लोकांकडून तीन महिनेपर्यंत रोज दोन वेळा अर्धा अर्धा तास ध्यान करवून घेतले. यानंतर पुन्हा DHEA तपासणी केली असता असे आढळले की ध्यान न करणाऱ्या लोकांची DHEA लेव्हल तीच राहिली परंतु ध्यान करणाऱ्यांच्या DHEA पातळीत २२ ते २७ टक्के वाढ झाली आहे अन हे लोक पूर्वीपेक्षा जास्त आनंदी, उत्साही झाले आहेत.*

DHEA (dehydroepiandrosterone)

हे एक नैसर्गिकरित्या शरीरातील अँड्रेनॉल ग्रंथीत कोलेस्टोरॉलचा वापर करून तयार होणारे संप्रेरक आहे. पुरुषातील टेस्टोस्टेरोन व स्त्रियामधील एस्ट्रोजेन प्रमाणे रासायनिकरित्या हेसुद्धा संप्रेरक म्हणून कार्य करते. पुरुष व स्त्री या दोघांच्याही तारुण्यकाळात याचा मोठ्या प्रमाणात स्राव होतो व वयोमानाप्रमाणे ते हळू हळू कमी होत जाते. त्यामुळे वृद्धत्वाच्या काळातील बहुतेक व्याधींसाठी DHEA कमी होण्याला जबाबदार धरले जात असावे. DHEA चे पुरस्कर्ते वृद्धत्वातसुद्धा तरुण राहण्यासाठी यात वाढ करण्याचा आग्रह धरतात. व बाजारात या पूरक औषधाची रेलचेल आहे. परंतु वृद्धत्वातील व्याधींना कारणीभूत ठरणाऱ्या कित्येक घटकामध्ये DHEA तील कमतरता महत्वाचे नाही असे वैज्ञानिकांचा दावा आहे. DHEA तील जास्त पुरवठा वृद्धत्वाकडून तारुण्याकडे नेतो याला कुठलाही वैज्ञानिक आधार नाही. (स्केप्टिक व विकिपिडिया )

गेली अनेक वर्षे DHEA कडे सर्वरोगावर अक्सीर इलाज म्हणून बघितले जाते. हृदयासंबंधीच्या तकरारी, कर्करोग, मधुमेह, पार्किन्सन - अल्झेमेर सारखे रोग, नैराश्य, ऑस्टिओपोरोसिस, लठ्ठपणा इ.इ. या सर्व रोगावरील रामबाण उपाय म्हणून DHEAच्या कंपन्या हे ओषध विकून मोठ्या प्रमाणात पैसे कमावत आहेत. परंतु हे एका प्रकारचे snake oil आहे असेच तज्ञांचे मत आहे. (क्वॅक् वाच)

जीवनात यशस्वी होण्याच्या मंत्रसिद्धीवरील पुस्तक लिहिणारे वा इतर कुठलेही औषधोपचार न करता नैसर्गिक उपचारावर भरवसा ठेवणारेच फक्त अशा DHEA वर विश्वास ठेऊ शकतात. ध्यानधारणेतून DHEA त वाढ होते व त्यातून सर्व व्याधीवरील उपायांची गुरुकिल्ली सापडू शकते हे स्वप्नरंजन आहे असेच म्हणावे लागेल.

**डीप मेडिटेशन स्टेट**

*ध्यानाची खोल अवस्था (Deep Meditation State ) ही डेल्टा अवस्था असते. म्हणजेच शरीर व मन पूर्ण विश्रांती अवस्थेत असते. चयापचय क्रिया जवळजवळ शून्य असते. म्हणून जितका वेळ ही अवस्था टिकून राहील तितका वेळ शरीराला अन मनाला गहन विश्रांती मिळते.*

*पूर्ण विश्रांती देणारी झोप ही किमयागार आहे. अशा झोपेमध्ये शरीराची झीज भरून काढली जाते. सर्व पेशींना रिसेट केले जाते. शरीरातील सर्व अनियमितता जसे की हृदयाचे स्पंदन, रक्ताभिसरण, जखमा भरून येणे, वेदना शमन हे नियमित व नियंत्रित केले जाते. म्हणून कोणत्याही दुखण्यामध्ये झोपेचे औषध दिले जाते.*

वरील विधानात काही तथ्य असल्यास ध्यानाची ही खोल अवस्था (Deep Meditation State) मेंदूमधील कुठल्या न्यूरॉन्समुळे हे शक्य होणार यावर संशोधन करणे योग्य ठरेल. व या संशोधनातून मेंदूत बदल घडवू शकणारी (Mind Altering Medicine) औषधं बाजारात येऊ शकतील. या औषधामुळे अशा प्रकारच्या डेल्टा अवस्थेत आपण गेल्यास वर उल्लेख केलेले सर्व विकार नाहिसे होतील. परंतु हे स्वप्नरंजन ठरण्याचीच शक्यता जास्त आहे. कारण मेंदूच्या कुठल्याही भागात किंचित बदल केले तरी त्यातून इतर ठिकाणी होणाऱ्या दुष्परिणामांचा अंदाज लवकर येत नाही. त्यामुळे फार सावधपणे अशा प्रकारच्या औषधांकडे बघितले जाते. जैव-तंत्रज्ञानाच्या सहाय्याने हे शक्य होईल याबद्दल संशोधकांच्या मनात अनेक शंका - कुशंका आहेत.

केवळ ध्यानधारणेतूनच हे सर्व साध्य करण्याचे ठरविल्यास या डीप मेडिटेशन स्थितीला पोचण्यास किती काळ ध्यानधारणेचा सराव करावा लागेल याचाही अंदाज घेता येत नाही. कदाचित 5,10, 15 ,20... वर्षे, किंवा त्याहूनही जास्त. या सर्व कारणामुळे ध्यानधारणेतील फोलपणा लक्षात येऊ शकेल.

**ध्यानोपासक जास्त सुखी**

ध्यानोपासक जास्त सुखी असतात असेही सांगितले जात असते. ध्यानधारणेपासून खरोखरच सुख मिळत असेल का? मानसशास्त्रज्ञांच्या मते ध्यान हे सुख मिळवण्याचे तंत्र नसून एक प्रकारची भान निर्माण करणारी प्रक्रिया असते. सुख हे मानण्यावर अवलंबून असते. त्यात पैसा, प्रतिष्ठा, वंश, लिंग, प्रदेश, इत्यादींचा काहीही संबंध नसतो. अतीव दु:खाच्या प्रसंगातून माणूस गुजरताना बाह्य परिस्थितीपेक्षा त्याच्या मनातील आंतरिक शक्तीच त्याला उभारी देत असते. व्यक्तीच्या शारीरिक - मानसिक जडण घडणीतच सुखाचा शोध घेता येतो. ध्यानधारणा वेगळे काहीतरी करू शकते अशी समजूत करून घेणे भाबडेपणाचे ठरेल.

**उपचार पद्धती**

ध्यानधारणा ही उपचार पद्धती म्हणून योग्य आहे का? असा प्रश्नही अनेक वेळा विचारला जात असतो. काही मानसोपचारतज्ञ ध्यानाचा उपयोग आपल्या उपचार पद्धतीत करून घेत असतात. परंतु त्याच्याही काही मर्यादा आहेत. गंभीर मानसिक आजारावर ध्यानधारणेमुळे आजार कमी होण्याऐवजी आजार बळावण्याची शक्यता जास्त असते. त्याचे विपरीत परिणाम होऊ शकतात. दाबून ठेवलेले आणि संघर्षात्मक विचार व भावना यांना तोंड देण्यासाठी यशस्वी न झालेल्यानी ध्यानाच्या मागे लागल्यास या गोष्टी उफाळून येण्याची शक्यताच जास्त असते. व त्यातून शारीरिक - मानसिक यातनाच जास्त होतात. मानसशास्त्रीयदृष्ट्या स्थिरचित्त प्रकृतीच्या लोकानाच

ध्यानधारणेचे सकारात्मक परिणाम दिसतात. परंतु हे कितपत, कुठल्या व्यक्तीत, व केव्हा दिसतात हे अजूनही गूढ आहे.



# 'ध' चा 'मा'

सर्व ध्यानप्रेमींची व ध्यानपुरस्कर्त्यांची क्षमा मागून या लेखातील विमा ऐवजी ध्यान हा शब्द घालून लेखात काही सूक्त बदल केल्यास काय होईल, हे मांडण्याचा प्रयत्न. लेखिका व समस्त वाचक हा उपद्व्याप sportively घेतील अशी अपेक्षा. (वाचकांच्या सोईसाठी जे बदल केले आहेत ते तांबड्या अक्षरात लिहिले आहेत.)

**ध्यान नव्हे, मन:शांती**

"मनाची उभारी आणि ताणतणाव याचा परस्परसंबंध वेगळा सांगायलाच नको. सर्व आघाडीवर सगळं व्यवस्थित असेल तर डोकं किती शांत रहातं. त्यातून आजच्या धकाधकीच्या जीवनात ... हा शब्दप्रयोग आलाच पाहिजे बरं का, नाहीतर फाऊल समजला जातो... वेगवेगळ्या प्रकारचे ताणतणाव असतात. आपण ते सगळे टाळू शकत नाही. काहींचं फारतर व्यवस्थापन करता येतं. या ताणतणावांमुळे होणारे रक्तदाब, मधुमेह, त्वचारोग असे वेगवेगळे विकार मनुष्याचा कुरतडून कुरतडून जीव घेतात. यातले काही तणाव आपण जरूर दूर करू शकतो........

एकदा का ध्यान करायला शिकले की कसलीही चिंता नाही." पूजा हेमाला समजावून सांगत होती. "अगं हेमे, ध्यानधारणा तसं सोपं नाही. पण आपण मध्यमवर्गीय लोकांसाठी ध्यानमार्गदर्शक बनायचं. उगाच श्रीमंतांच्या मागे जायचं नाही किंवा गरीबांवरही वेळ खर्च करायचा नाही. या मध्यमवर्गीय लोकांना सगळं तोलूनमापून करायला आवडतं. आपणही नाही का अशाच घरांमधे रहात? आपल्याला कसली भीती वाटते, तीच भीती आपल्यासारख्या इतरांनाही वाटते. त्याच भीतीचा थोडा आणखी मोठा बागुलबुवा करायचा ..... त्यासाठी काही कळीचे शब्द आहेत. आजकाल लोकं चमत्कार वगैरे शब्दांना भुलत नाहीत. सगळ्यांना शाळेत विज्ञान शिकवलं जातंच. तसं आजकाल एक गोष्ट फक्त एकच गोष्ट करते असं सांगून लोक भुलत नाहीत. ध्यानधारणा हा फक्त मन:शांतीसाठी आहे, असं म्हटलं की अर्ध काम

होतंच. मनःशांती हा आजचा मोठा कीवर्ड आहे गं. हे आजूबाजूचे फॅन्सी जिम पहातेस ना? मध्यमवर्गीय, श्रीमंत, अतिश्रीमंत जिथे जाऊन वजनं कमी करतात, तिथेही आजकाल योगा आणि कपालभाती वगैरे विकतात. मनःशांतीसाठी लोकं फार कष्ट घेतात आजकाल. आज विकली जाणारी वस्तू म्हणजे मनःशांती (व अनुभव)."

गेले काही महिने हेमाला काहीतरी वेगळं करायचं होतं. आपल्यात आणखी काही नवीन कौशल्य आहे का ते आजमावायचं होतं. आणि पूजाशी हा विषय काढल्यावर तिने लगेच "तू रॉकेट सिंग बन. तो 'सेल्समन ऑफ द इयर' झाला, तू 'यशस्वी ध्यानमार्गदर्शक होऊ शकतेस. मी आहे ना तुला हे सगळं शिकवायला!" आज त्यांच्या ट्रेनिंगचा पहिलाच दिवस होता. ध्यान का, कशासाठी याच्याशी हेमाचा काहीही संबंध नव्हता. "पण म्हणून काय बिघडलं?", पूजाने ट्रेनिंग सुरूच ठेवलं. "तू काय विकत घेतलं आहेस, का विकत घेतलं आहेस याला महत्त्व नाही. आता तू गोल्ड फेशियल घेतलंस काय आणि घरच्याघरी साय तोंडाला चोपडून दुपारी लवंडलीस काय, तू आणि तुझी बेस्ट फ्रेंड, म्हणजे मी, वगळता तिसऱ्या कोणालाही फरक समजत नाही. ध्यानाचंही तेच आहे. तू कुठला ध्यानप्रकार करत आहेस , त्याचा तुला काय फायदा होतो हे महत्त्वाचं नाही. तू ते कसं मांडते आहेस याला महत्त्व आहे. जमाना जाहिरातीचा आहे, dear!"

"ध्यान करणाऱ्या लोकांचा खरंच काय, किती आणि कसा फायदा होतो किंवा होईल याची काही गणितं तरी दाखव गं. कोणी विचारलं तर अगदीच तोंडघशी नको पडायला!!" हेमाच्या शंका कमी होण्याची काहीही लक्षणं दिसत नव्हती. हे पाहून पूजाला आणखी उत्साह चढला. "हे पहा हेमा, गणितं काय करायची आहेत? मला सांग, तू आणि तुझा नवरा रोज ध्यान करता ना? त्यातून तुझं डोकं शांत रहातं ना! मग झालं तर. ध्यान हा
फक्त ध्यान नाही, ध्यान ही डोक्याची शांतताही आहे. आत्ता पहा तू, मध्यमवयीन आहेस. या वयात अयोग्य जीवनपद्धतीमुळे किती काय-काय होतं

हे तुला माहित्ये ना! समजा उद्या तुला किंवा नवऱ्याला आला एखादा हार्टअटॅक, आणि त्यातून नोकरी गेली तर? म्हणजे, तुझं असं व्हावं असं नाही, पण कोणाच्याही बाबतीत हे होऊ शकतं ना? असं झालं तर पोरांच्या शिक्षणाचं काय? तुमच्या म्हातारवयाच्या देखभालीचं काय? आणि ही सगळी काळजी आत्ता काही झालेलं नसतानाच नको का करायला? परवाच तुला सांगते, माझ्या एका मैत्रिणीच्या नवऱ्याला आला ना हार्टअटॅक. त्यातून तो खासगी कंपनीत नोकरीला...... तसा तो म्हणे फार जाडा आहे आणि म्हणे सिग्रेट, दारू, खाण्यावर ताबा नाही ... सगळंच. हे मी तुला म्हणून सांगत्ये गो. पण समजा असं काही आपल्यालाही झालं तर?"

हेमाचा चेहेरा थोडा चिंताक्रांत झाला. नुकती दहावी-बारावी झालेली पोरं तिच्या डोळ्यासमोर आली. "बघ, तुलाही वाटली ना काळजी पोरांची!

"अगं पण पोरांची काळजी आ..." हेमाची वाक्य तोंडातच राहिली. "हे बघ, मी तुला ट्रेनिंग दिलेलं आहे. तू ध्यानाचे मार्गदर्शन तरी करून बघ. केल्याशिवाय तुला कळणार कसं तुझ्यात हे कौशल्य आहे का नाही ते! आपण थोडीच ध्यानाचे विज्ञान शिकायला-शिकवायला बसलो आहोत? आपल्याला मतलब कशाशी आहे, डोक्याला असणाऱ्या शांततेशी. तुला नवीन काहीतरी करून मनःशांती मिळेल...... तेवढी मनःशांती मिळाली की काम झालं. ..... मनःशांती मिळाली हे काय कमी वाटतं का काय तुला? या मनःशांतीअभावी आज किती लोकांना तरूण वयात रक्तदाब, हृदयरोग आणि मधुमेह होतात तुला माहित आहे ना! तुम आम खाओ, गुठलियां क्यू गिनती हो?"

हेमाचा चेहेरा थोडा खुलला. "लोकं मानतील का गं हे?" तिने शेवटची शंका विचारून घेतली. पूजा तयारीचीच असावी, "अगं, हीच वाक्य तिथेही वापरायची. मोठमोठे वैज्ञानिकांनी शोध केलेली आहेतच असं सांगायचं. विज्ञानाच नाव काढलं की बहुतेक लोकं शंका घेत नाहीत ना!"

परवा स्टॉपवर बसची वाट पहात बसले होते तेव्हा हा संवाद कानावर आला. हेमा आणि पूजा कोण हे मला माहित नाही. स्टॉपवरच्या अन्य प्रवाशांची आणखी किती माहिती काढायची?

(मूळ लेखातील आर्थिक विषयाचे संदर्भ गाळलेले आहेत याची कृपया नोंद घ्यावी.)



# गर्भधारणेचे बाजारीकरण

## जननक्षमतेचा व्यापार

बाजारीकरण म्हटल्यावर आर्थिक घडामोडी, खरेदी - विक्री, कंपन्या-कंपन्यामधील जीवघेणी स्पर्धा, उत्पादनांतील व नफ्यातील चढ - उतार, जाहिरातबाजी, शॉपिंग मॉल्स - शोरूम्स, इत्यादी गोष्टी आपल्या डोळ्यासमोर उभ्या राहतात. कामगार, शेतकरी, इत्यादींचे शोषण, भेसळ, साठेबाजी, करचुकवेगिरी, भ्रष्टाचार इत्यादी अपप्रवृत्तीसुद्धा बाजारीकरणात गृहित धरल्या जातात व त्याकडे दुर्लक्षही केले जात असते. परंतु बाजाराचा हा ब्रह्मराक्षस आता आपल्या शारीरिक अवयवांच्या व्यापारीकरणाच्या प्रयत्नात आहे. मूत्रपिंडांचा काळाबाजार तर भरभराटीला आहे. युरोप अमेरिकेतील औषधी कंपन्यांच्या नवीन उत्पादनांच्या चाचणीसाठी गिनी पिग्स म्हणून आपल्या येथील गरीब रुग्णांचा मोठ्या प्रमाणात वापर केला जात आहे. व या गैर व्यवहारात मोठमोठ्या नावाजलेल्या वैद्यकीय तज्ञांचा सहभाग आहे, असे ऐकीवात आहे. आता त्याची नजर शुक्राणू, बीजांड, हार्मोन्स, गर्भ इत्यादी पुनरुत्पादनाशी संबंधित असलेल्या जैविक गोष्टीवर पडत आहे. वंध्यत्वावर मात करण्याची लालूच दाखवत लाखो - करोडोंची आर्थिक उलाढाल या पुनरुत्पादन क्षेत्रात - व विशेषकरून गर्भधारणेच्या व्यवसायात - होत आहे.

प्रेम, वात्सल्य, ममता, अशा गोष्टींची खरेदी - विक्री होऊ शकत नाही असे अनेकांना वाटते. तसाच काहिसा प्रकार संतती प्राप्तीसंबंधीसुद्धा आहे. कारण पुनरुत्पादन उत्क्रांतीचे बलस्थान आहे व ती एक नैसर्गिक प्रक्रिया आहे. कृत्रिम गर्भधारणा निसर्गाच्या विरुद्ध असून त्यात भाग घेणाऱ्यांना कमी लेखणारी आहे. खरे पाहता, कृत्रिम गर्भधारणेचा अवलंब असाधारण परिस्थितीत एखादा अपवाद म्हणून व्हावयास हवा होता; परंतु ती आता समाजमान्य नेहमीची पद्धत म्हणून रूढ होत आहे.

'मुलं कशी जन्माला येतात?' याचे उत्तर सर्वांना माहित असले तरी चारचौघात त्याची वाच्यता करण्याची रीत (आतापर्यंत तरी) नव्हती. हा

व्यवहार अत्यंत खाजगी स्वरूपातला, एकांतातला असा होता. शुक्राणू, बीजांड, गर्भनिर्मिती, गर्भधारणा या गोष्टी पुनरुत्पादन प्रक्रियेचे महत्वाचे घटक असून त्यातील प्रत्येकाची वैशिष्ट्यपूर्ण अशी भूमिका असते. परंतु आता त्यांची चारचौघात, चव्हाट्यावर चर्चा केली जात आहे. बिनदिक्कतपणे त्यांचे आर्थिक व्यवहारात रूपांतर होत आहे. मागणी तसा पुरवठा या भांडवली तत्वांची 'री' ओढत पुरेपूर फायदा करून घेतला जात आहे. परंतु यात नेहमीप्रमाणे स्त्रियांचेच शोषण होत आहे हे अजून जनसामान्यांना उमजलेले नाही.

प्रजननाचा हा व्यापार इतर उत्पादनांच्या तुलनेत फार वेगळया स्वरूपाचा आहे. जमीन-जुमला, घर-दार इत्यादीसारख्या व्यवहारात मालकी कुणाची याबद्दल व्यवहार संपल्यानंतर संदिग्धता नसते. सात-बाराच्या उताऱ्यावरून त्याची शहानिशा करून घेण्याची सोय असते. परंतु अपत्य प्राप्तीच्या व्यवहारात अपत्यावरील मालकी हक्क कुणाचा याबद्दल अनेक हेवे दावे आहेत. शुक्राणू एकाकडून, बीजांड दुसऱ्याकडून, गर्भप्रक्रिया क्लिनिक्समध्ये, गर्भवाढ एका तिऱ्हाइताच्या पोटात असा व्यवहार असल्यामुळे मूल कुणाचे ही गोष्ट कायम गुलदस्त्यात राहते. या गोष्टी शेवटपर्यंत अंधारात, अस्पष्ट व संदिग्ध राहतात.

**अपत्याचा हव्यास**

नैसर्गिकरित्या अपत्य होऊ शकत नाही व आपला वंश पुढे नेण्यासाठी आपल्या स्वत:चे(च) मूल हवे या हव्यासापोटी ही बाजारव्यवस्था मूळ धरू लागली. आपल्याला मूल व्हावे म्हणून देवधर्म, नवस - उपवास, गंडे - दोरे व इतर अनेक प्रकारचे चित्र विचित्र अघोरी उपाय अपत्यहीन जोडपे करत असते. काही वर्षापूर्वी गुजरातच्या सीमेवरील एका गावात पार्वती माँ नावाची बाई केवळ पोटावर हात सावरून गर्भधारणेचे चमत्कार करत होती. व महाराष्ट्रातील खेड्यापाड्यातून मिळेल त्या वाहनांनी झुंडीच्या झुंडी तेथे जात होत्या. अजूनही काही अनेक जोडप्या अशा बाई - बाबांच्या नादी लागून

हजारो रुपयांचा चुराडा करून घेत आहेत. हे सर्व उपाय संपल्यानंतर खात्रीचा उपाय म्हणून शेवटी आधुनिक तंत्रज्ञानाला शरण जातात. विज्ञान - तंत्रज्ञान अशांसाठी आपली दारे उघडी ठेवत मूल होणारच याची खात्री देते.

मुळातच मूल न होण्याची कारणे अनेक आहेत. त्यातील काही, सामाजिक, काही भावनिक तर काही शारीरिक असतात. उशीरा लग्न करणे - होणे, दीर्घ काळ कुटुंब नियोजन करणे, मादक पदार्थांचे सेवन, अती मद्यपान, इत्यादीमुळेसुद्धा मूल होत नाही. शुक्राणूंची कमतरता, त्यांचा मंद वेग, बीजांडातील दोष, कमकुवत वा सदोष गर्भाशय, मासिक पाळीतील अनियमितता, हार्मोन्सचे असंतुलन, फॅलोपियन ट्यूबमधील दोष इत्यादी अनेक कारणं यामागे असू शकतात.

लग्न झाल्या झाल्या आपल्याला मूल व्हावे ही सामान्यपणे सर्व दांपत्यांची रास्त अपेक्षा असते. मूल लवकर न झाल्यास जोडप्यांना कुत्सित बोलणी ऐकून घ्यावे लागतात. विशेष करून स्त्रीला याचा फार त्रास होऊ शकतो. स्वत:ची आई, सासू, नणंद, इतर नातेवाईक, मैत्रिणी कुत्सित नजरेने तिच्याकडे पाहू लागतात. या संबंधात तिला आपण फार मोठा गुन्हा केला आहे असे वाटू लागते. पुरुष प्रधान समाजात मूल न होण्यामध्ये पुरुषाचा दोष नाही असेच गृहित धरले जाते व स्त्रीला अपराध्याच्या पिंजऱ्यात उभे केले जाते. मग मात्र दांपत्याची ससेहोलपट चालू होते. बाबा, बुवा, ताई, महाराजांपासून सुरुवात होत अघोरी उपचारापर्यंत सर्व उपाय केले जातात. हे सर्व उपाय थकल्यानंतर गरीब कुटुंब असल्यास दैवाला दोष देतात किंवा देवाची अवकृपा म्हणून गप्प बसतात. श्रीमंत मात्र यांत्रिक पुनरुत्पादनाच्या बाजारपेठेला शरण जातात.

**यांत्रिक पुनरुत्पादन**

यामध्ये वंध्यत्व दूर करणारे फर्टिलिटी क्लिनिक्स व वंध्यत्वावर तंत्रज्ञान शोधणाऱ्या व औषधं तयार करणाऱ्या कंपन्या आपापली पोळी भाजून घेत आहेत. याच बरोबर भारतात आयुर्वेदाचे पुरस्कर्तेसुद्धा आपलेही हात धुवून घेत आहेत. मुळातच कृत्रिम गर्भधारणेच्या बाजाराशी सुमारे 90-95 टक्के

जनसंख्येचा संबंध येत नाही. उरलेल्यामधील गरीबांची संख्या वगळल्यास एक टक्क्याहून कमी असलेल्या श्रीमंतांसाठीच ही बाजारपेठ आहे. जनसंख्येचा एवढा मोठा हिस्सा गर्भधारणेच्या बाजारापासून दूर असला तरी, पैशाची उलाढाल मात्र मोठ्या प्रमाणात होत आहे. इतर नित्योपयोगी उत्पादनाच्या बाजारात जास्तीत जास्त लोकांचा सहभाग असूनही या बाजाराची पातळी त्यांना अजून गाठता आली नाही.

यांत्रिक पुनरूत्पादनाची सुरवात 1978 मध्ये 'टेस्ट ट्यूब' बेबीच्या शोधानंतर झाली. यात प्रामुख्याने कृत्रिम गर्भधारणा (इन व्हिट्रो फर्टिलायझेशन IVF) या संकल्पनेचा आधार घेतला. आता हे कृत्रिम पुनरूत्पादन वेगवेगळया स्वरूपात ग्राहक जोडप्यांना आकर्षित करत आहे. वंध्यत्वावर मात करणारी औषधं, परक्याचे शुक्राणू, परक्याचे बीजांड, शुक्राणू व बीजांडाचे फॅलोपियन ट्यूबमध्ये कृत्रिम संयोग, टेस्ट ट्यूबमध्ये गर्भनिर्मिती, परक्या बाईच्या (सरोगेट मातेच्या) गर्भाशयात गर्भवाढ, बीजांडाचे प्रशीतन (रेफ्रिजरेशन), गर्भाची अदलाबदल अशा अनेक पध्दतीत गर्भधारणेचा व्यवहार चालतो. गर्भधारण व्यवहारात आता अपत्यपूर्तीची केवळ अपेक्षा नसते, तर जन्माला येऊ घातलेले बाळ सुदृढ, जनुकरोगमुक्त व सर्वगुणसंपन्न असावे अशी पण अपेक्षा केली जाते व बाजारपेठ ही अपेक्षा पण पूर्ण करण्याचा तयारीत आहे.

**त्रासदायक प्रकिया**

मूल होण्याची भूक शमविण्यासाठी वंध्यत्व दूर करणारे क्लिनिक्स व त्यातील निष्णात डॉक्टर्स व नर्सेसची फौज शहरा-शहरात जय्यत तयारीत आहेत. नैसर्गिकरित्या मूल होत नाही याची खात्री करून घेतल्यानंतर जोडपे गर्भचाचणीसाठी तयार होते. पुरुषांची चाचणी तुलनेने फार सोपी असते. रक्त व वीर्य यांच्या चाचणीनंतर पुरुषाच्या लैगिंकतेचा संपूर्ण आराखडा डॉक्टरसमोर उभा राहतो. स्त्रीची चाचणी मात्र जास्त त्रासदायक व तिच्या आत्मसन्मानाची कदर न करणारी असते. समागमानंतर शुक्राणू तिच्या योनीत प्रवेश करतात की नाही हे सिम्स हुन्हेर चाचणीत कळते. रूबेन्स चाचणीत फॅलोपियन

ट्यूबमधील दोष लक्षात येतात. हिस्टेरोस्कोपीत गर्भाशयातील उणीवा कळतात. दांपत्याला अती क्षुल्लक समजणाऱ्या या चाचण्या अतिशय क्लेशकारक व मनस्ताप देणाऱ्या आहेत. एवढेच नव्हे तर चाचणीतून कळलेल्या दोषांचे निवारण करणाऱ्या सर्व उपाय-उपचारांना स्त्रीलाच सामोरे जावे लागते. त्यामुळे तिला जीव नकोनकोसा वाटू लागतो. कशाला या फंदात पडलो? अशी पश्चात्तापाची वेळ येते; परंतु यासाठीची फी डॉक्टरने अगोदरच वसूल केलेली असल्यामुळे अर्धवट सोडताही येत नाही. काही दोष आढळयास जननेंद्रियाची शस्त्रक्रिया, त्यांनतर गर्भधारणेसाठी औषधं, इंजेक्शन्स अशा वैद्यकीय चक्रातून तिला जावे लागते. गर्भाशयाबाहेर बीजांडांची वाढ करण्याचे ठरवल्यास हार्मोन्स नियत्रिंत करण्यासाठी औषधे घ्यावी लागतात. या औषधांचे दुष्परिणाम होऊ शकतात. रक्तस्त्राव होण्याची शक्यता असते. गर्भशयात गर्भ व्यवस्थितपणे स्थिर होईपर्यंत तिला या प्रकियेमधून अनेक वेळा जावे लागते. चाचणीचे सर्व ताण स्त्रीलाच सहन करावे लागतात. अपत्याच्या अदम्य इच्छेपायी ( व सासू सासऱ्यांना, आई-बापाला, नवऱ्याला खूश ठेवण्यासाठी!) स्वत:चा जीव धोक्यात घालत मुकाट्याने या सर्व गोष्टी ती सहन करते. (कित्येक वेळा स्त्रीचा दोष नसतानासुध्दा तिला सर्व चाचणी व गर्भोपचारांचा सामना करावा लागतो; कारण तिचा पुरूष या प्रसंगी योग्य साथ देत नसतो. एका अभ्यासात क्लिनिकमध्ये चाचणी करून घेणाऱ्या दापंत्यापैकी वीस टक्के दांपत्य नैसर्गिकरित्या गर्भधारण करण्यास योग्य असतात असे आढळले आहे.)

फर्टिलीटी क्लिनिक्स व डॉक्टर्स यशाच्या खात्रीबद्दल नेहमीच (चुकीची!) विधानं करत असतात. मूल जन्माला येते की नाही यापेक्षा गर्भ वाढतो आहे की नाही हेच यशाचे निकष ठरत असते. हार्मोन्समधील बदलसुद्धा गर्भवाढीच्या यशाच्या आकडेवारीत टाकले जातात. त्यामुळे हे आकडे नेहमीच फुगवून सांगितलेले असतात. जाहिरातीचा मारा करून वंध्यत्व असलेल्या जोडप्यांना आपल्या जाळयात ओढण्याचा हा एक आक्रमक

पवित्रा असतो. 'चमत्कार' म्हणूनच सामान्य लोक या गोष्टीकडे पाहतात आणि डॉक्टर्सना देवत्व बहाल करतात. दत्तक घेऊन किंवा निपुत्रिक राहूनसुध्दा हे दांपत्य सुखाने जगू शकते; परंतु बाजारीकरणाचा सातत्याने होणारा मारा त्यांना स्वस्थ बसू देत नाही. खरे पाहता या कृत्रिम पुनरूत्पादनाच्या यशाचा दर 18-20 टक्क्यांपेक्षा जास्त नाही. तरीसुध्दा निपुत्रिक जोडपी यांच्या आहारी जातात. 'आम्ही याव्यतिरिक्त काय करू शकतो?' असेच हतबल होऊन ते विचारतात. अपत्य प्राप्ती हवी की नको याचा निर्णय निपुत्रिक जोडप्यांनी घ्यायली हवा; परंतु आजकाल हा निर्णय बाजार लादत आहे.

**आर्थिक उलाढाल**

गर्भधारणेच्या व्यापार व्यवहारात पैशाची फार मोठ्या प्रमाणात उलाढाल होत आहे. अवयवांची खरेदी-विक्री करण्यास कायद्याने बंदी आहे. परंतु शुक्राणू, बीजांड, गर्भ हे शारीरिक अवयवांच्या सदरात मोडत नसून हे सर्व 'शरीराचे उत्पादन' आहेत अशी पळवाट शोधून त्यांची विक्री होत आहे. शुक्राणूंच्या तुलनेने बीजांडांची किंमतही जास्त व त्याला मागणीही जास्त. या संबंधातील आकडेवारी आपल्या देशात उपलब्ध नसली तरी, अमेरीकेसारख्या विकसित राष्ट्राच्या आकड्यावरून या धंद्याचे स्वरूप कळू शकेल. या दरावरून नजर टाकल्यास हे दर त्या देशातील श्रीमंतांनासुध्दा न परवडणारे आहेत हे लक्षात येईल. इ.स. २०१० मधील आकडे)

| | | |
|---|---|---|
| शुक्राणू ..... | 30,000 | रूपये |
| बीजांड ..... | 4,50,000 | रूपये |
| कृत्रिम गर्भधारणा (प्रत्येक खेपेस) .... | 12,40,000 | रूपये |
| भाड्याचे गर्भाशय .... | 6,00,000 | रूपये |
| पूर्वजनुक चाचणी .... | 3,50,000 | रूपये |
| दत्तक:नात्यांतल्यांसाठी .... | 2,50,000 | रूपये |
| दत्तक:अमेरिकेतल्या अमेरिकेत ..... | 14,50,000 | रूपये |
| दत्तक:इतर देशातून ..... | 24,50,000 | रूपये |

भारतासारख्या विकसनशील राष्ट्रातील राहणीमानाप्रमाणे हे दर दहा टक्के असे धरले तरी हा खर्च भारतीयांच्या आवाक्याबाहेरचा आहे. तरीसुध्दा फर्टिलिटी क्लिनिक्सची जाहिरात व डॉक्टर्सच्या आग्रहांना बळी पडून या मृगजळांच्या मागे निपुत्रिक दांपत्ये धावत आहेत. अमेरीकेतील या आकडेवारीमुळेच भारतातील गर्भधारणेच्या उद्योजक ठेकेदारांच्या तोंडाला पाणी सुटले आहे. भाड्याने गर्भाशय देणाऱ्या स्त्रीसाठी (सरोगेट मदर) अमेरिकेत साठ लाख रूपये खर्च होत असल्यास, भारतात केवळ दहा ते बारा लाख रूपये दर ठेऊनसुध्दा प्रचंड नफा कमवता याईल हा हिशोब त्यामागे आहे. परदेशातील जोडप्यांना भारतात बोलावून त्यांच्या राहण्याचा खर्च, पूर्वचाचणी, कृत्रिम गर्भधारणा, नंतरच्या गर्भारपणातील भाड्याने गर्भाशय देणाऱ्या स्त्रीची (सरोगेट मातेची) काळजी, प्रसूती इत्यादी सर्व गोष्टी अती कमी पैशात उरकता येतात, हे त्यांच्या लक्षात आले आहे. बाकीच्या चाचणी-गर्भधारणा इत्यादीसाठी फार वेळ लागत नसला, तरी गर्भ वाढवण्यासाठी नऊ महिन्यांचा कालावधी लागतोच. त्यासाठी स्त्रिया पुरवण्याची व्यवस्था केल्यास धंदा तेजीत चालेल हे लक्षात आल्यानंतर भारतात सरोगेट मातांची फौज ठिकठिकाणी उभी केली जात आहे.

**सरोगेट मातांचे खेडे**

गुजरातमधील आणंद हे खेडे 'अमुल' दुग्ध उत्पादनासाठी प्रसिध्द आहे. दूध सहकारी संघाच्या वितरण व्यवस्थेमध्ये आणंद व आसपासच्या खेड्यातील शेतकऱ्यांनी क्रांती केली आहे; परंतु आज हे खेडे युरोप, अमेरिकेत भाड्याचे गर्भाशय पुरवणाऱ्या 'सरोगेट माता' चे खेडे म्हणून नावाजले जात आहे. या गावातील अनेक तरूण/प्रौढ स्त्रिया दोन-चार लाख रूपयांसाठी गर्भव्यापारात भागीदार होत आहेत. फर्टिलीटी क्लिनिक्सचे दलाल बायकांना भुरळ पाडून या धंद्यात खोऱ्याने पैसे ओढत आहेत. गंमत म्हणजे हा सर्व व्यवहार कायदेशीर आहे. नीतीचा प्रश्नसुध्दा ह्या बायकांनी आपल्यापुरता सोडवला आहे. त्यांच्या मते आर्थिक मदत मिळत असल्यास गर्भाशय भाड्याने देण्यात

काही गैर नाही. या अतिरिक्त पैशातून मुलांना चांगले शिक्षण, मुलींचे चांगल्या घराण्यात लग्न, आजारी नवऱ्याचे औषधोपचार होत असल्यास त्यात काय चूक अशी मानसिकता मूळ धरू पाहत आहे. शिवाय नवऱ्याच्या संमतीनेच त्याची बायको ही गोष्ट करत आहे. अशा व्यवहारात आणंद हे एकमेव खेडे आहे असे म्हणण्याला अर्थ नाही. इतर राज्यातील अनेक छोट्या मोठ्या शहरात हे व्यवहार चालत असावेत. फक्त त्यांचा गवगवा झाला नसेल. परदेशासाठी संगणक सेवा पुरवणाऱ्या कॉल सेंटर्सप्रमाणे सरोगेट मदर्स पुरवणारे किंवा गर्भधारणा सेवा पुरवणारे केंद्र नजीकच्या काळात देशभर सुरु होण्याची शक्यता नाकारता येत नाही. काही काळात भारत देश हा सरोगेट मदर्सचा देश म्हणूनही प्रसिद्धीला येईल.

**वैद्यकीय पर्यटन**

मुळातच इतर विकसित देशातील जननक्षमतेचे प्रमाण गेल्या वीस वर्षात कमी कमी होत चालले आहे. 1975 मध्ये सरासरी प्रमाण 2.24 होते, 2011 मध्ये ते प्रती जोडप्यामागे 1.6 झाले आहे. त्यामुळे ज्यांना मूल हवे अशी जोडपी भारतात येतात व या देशात काही काळ राहून चाचणी इत्यादी सोपस्कार संपवून मातेच्या गर्भाशयात गर्भ ठेवून ते परत जातात व नंतर येऊन अपत्य घेऊन जातात. सरोगेट मातांच्या पुरवठ्याला आता व्यावसायिक स्वरूप प्राप्त होत (झाले) आहे. पंधरा ते वीस लाख रुपयात अपत्य प्राप्ती होत असल्यामुळे या परदेशी जोडप्यांचे साठ - सत्तर हजार डॉलर्स (30 लाख रुपये) वाचू शकतात. वैद्यकीय पर्यटन हे गोंडस नाव देऊन याचा खुले आम बाजार मांडला जात आहे.

(खरे पाहता भारतात एक कोटीपेक्षा जास्त अनाथांची संख्या असूनसुद्धा अनाथ मुला - मुलींना दत्तक घेण्याऐवजी ही जोडपी कृत्रिम गर्भधारणेचा अवलंब करत आहेत. कदाचित परदेशातील लोकांसाठीच्या दत्तक विधान संबंधाचे कायदे अतिशय क्लिष्ट व गुंतागुंतीचे व वेळखाऊ असल्यामुळे कुणीही या भानगडीत पडत नसावेत. कायद्याने अशा गोष्टीस मुभा दिल्यास

Human trafficking ला आळा घालणे कठिण होत असल्यामुळे कायदे क्लिष्ट असावेत.)

आपल्या देशातही छुपेपणाने सरोगसीचे लोण पोहोचले आहे. आपल्या येथील (श्रीमंत) निपुत्रिकसुद्धा बाजारीकरणामुळे कृत्रिम गर्भधारणेचा आधार घेत आहेत. सरोगेट माता हवी म्हणून जाहिरात देत आहेत. ही प्रक्रिया संपूर्णपणे तंत्रज्ञानावर आधारित असूनसुद्धा सरोगेट माता विशिष्ट जातीचीच हवी, गोरीपान हवी अशा अटी जाहिरातीत नमूद केलेल्या असतात. अशा कारणासाठीसुद्धा लोक जात विसरत नाहीत.

**सरोगेट मातांचे शोषण**

गर्भधारणा बाजाराचे पुरस्कर्ते कितीही या बाजाराची (व उपचाराची) भलावण करत असले तरी सरोगेट मातांचे नक्कीच शोषण होत आहे. गर्भ/बीजांडाचे तथाकथित 'दान' केल्यानंतर हार्मोन्ससाठी त्यांना रोज इंजेक्शन्स घ्यावे लागतात. त्यामुळे रक्तस्राव, जंतुसंसर्गाचा तत्कालिक धोका होऊ शकतोच. शिवाय पुढील आयुष्यात स्तनाचा वा बीजांडकोषाचा कॅन्सर होण्याची शक्यता असते. गर्भ वाढवताना गर्भाबरोबरच जैविक व भावनिक सबंधांना तडा जात असतो. कारण गर्भाबरोबर जनुकीय संबंधाचा यात अभाव आहे. गर्भाशय भाड्याने घ्यायच्या आधी सरोगेट माताची चाचणी घेतली जाते. जोडप्यांच्या अटींची (जात, धर्म, रंग, आरोग्य, वय इत्यादी) पूर्तता होते की नाही याकडे लक्ष दिले जाते. अपत्याची 'गुणवत्ता' जपण्यासाठी या सरोगेट मातेला अल्ट्रासाउंड वा गर्भजल परिक्षा (amniocentesis)सारख्या प्रसूतीपूर्व चाचण्या द्याव्या लागतात. प्रसूतीनंतर 'अपत्यावर आपला हक्क नाही' असे करारपत्र लिहून द्यावे लागते. गर्भकाळात काही कमी जास्त आढळल्यास गर्भपात करून घेण्याची तयारी ठेवावी लागते. शेवटच्या क्षणी काही अडचणी आल्यास अपत्यांचा ताबा घेण्यास जोडपे नकार देऊ शकते. मुळातच जन्माला आलेले बाळ कुणाचेच नसल्यामुळे 'अनाथां'च्या संख्येत भर पडते.

बीजांडाच्या कृत्रिम उत्पादन पद्धतीमुळे एकच बीजांडाऐवजी अनेक वेळा दोन - तीन बीजांडे तयार होऊ शकतात. त्यामुळे जुळे - तिळे असे जन्म घेण्याची शक्यता नाकारता येत नाही. गर्भावस्थेत कितीही काळजी घेतली तरीही जुळया-तिळयाच्या प्रसूतीतही तिच्या जिवाला धोका असतो. आजकाल प्रसूतीचा धोका कायम असतो.

फर्टिलिटी क्लिनिक्स सरोगेट मातांना एखाद्या निर्जीव यंत्रासारखी वागणूक देत असतात. एखादी सामान्य स्त्री जेव्हा गर्भारशी राहते तेव्हा तिच्या मेंदूत काही बदल होतात व ती होऊ घातलेल्या बाळाची काळजी घेण्यास सज्ज होत असते. प्रसूतीनंतर मूल परक्याचे होणार आहे या कल्पनेनेच ती अस्वस्थ होऊ शकते. व मानसिक संतुलन बिघडवून घेवू शकते. पैशासाठी ती हे ओझे बाळगत असले तरी भावनाविवश अवस्था ती टाळू शकत नाही.

या स्त्रिया जैविक गुलामगिरीच्या शिकार झालेल्या असतात. जोडप्यांकडे भरपूर पैसा असतो व सरोगेट माता म्हणून पुढे येणारे गरीब कुटुंबातलेच असतात. 'बाळाचे उत्पादन' घेणाऱ्या जोडप्याचे समाधान झाल्यानंतरच तिचे पैसे चुकते गेले जातात. पैशाच्या हव्यासापायी ती 5 -6 वेळा सरोगेट माता झाल्यास तिच्या जिवाला धोका पोहोचू शकतो. जोडपे व क्लिनिक्सना याचे काही देणे घेणे नसते; सरोगेट मातेचे शरीर म्हणजे गर्भ वाढवणार भांड असेच वाटत असते.

गर्भधारणेबद्दल बाजारव्यवस्थेला खरोखरच आत्मीयता असल्यास अशा प्रकारच्या जुजबी तंत्रज्ञानापेक्षा वंध्यत्व दूर करण्यासाठी मूलभूत संशोधनाला उत्तेजन द्यायला हवे होते. त्यासाठी पैसा ओतायला हवा होता. वंध्यत्वाची कारणं शोधून तंत्रज्ञान विकसित करायला हवे होते. परंतु या औषधी कंपन्या व त्यांना साथ देणारी वैद्यकीय व्यवस्था संशोधनात पैसे गुंतवण्याऐवजी लगेच परतफेड करू शकणाऱ्या तंत्रज्ञानाला पाठिंबा देत आहेत. वायू प्रदूषणावर कायमची उपाययोजना शोधण्यापेक्षा नाकाला रुमाल बांधून गाडी

चालवण्यासारखाच हा प्रकार आहे. मूळ दुखणे शोधून त्यावर इलाज करणे गरजेचे आहे.

**कायदे कानून**

**कृत्रिम गर्भधारणा हा उपाय नव्हे**

मुळात निपुत्रिक असणे हा काही गुन्हा होऊ शकत नाही. निपुत्रिक जोडप्यांनी आपल्या मनातील अपराधीपणाची भावना दूर केल्यास समाधानी जीवन नक्कीच जगता येईल. अपत्य प्राप्तीसाठी एवढा आटापिटा करण्याची खरोखरच गरज आहे का याचाही विचार करावा लागेल. पूर्वीच्या काळी अविभक्त कुटुंबात निपुत्रिक जोडपी आपल्या भावा - बहिणींच्या मुलां-बाळांना आपलेच समजून समाधानी राहत होते. अलीकडील काळात विभक्त कुटुंबांची संख्या वाढत आहे. त्यामुळे आपलेच मूल हवे हा हट्ट न धरता नात्यातील एखाद्याच्या संगोपनाची जबाबदारी उचलून समाधानी जीवन जगणे अशक्यातली गोष्ट नाही.

आताच्या बदलत्या सामाजिक व कौटुंबिक परिस्थितीचा अभ्यास केल्यास स्वत:चा वंश पुढे चालवण्याचा अट्टाहास कशापायी असा प्रश्न पडू शकतो. एके काळी मुलं म्हणजे म्हातारपणाचे आधार अशी प्रतिमा होती. आजच्या परिस्थितीत ही संकल्पना कालबाह्य ठरत आहे. पालकांनासुद्धा आपली मुलं म्हातारपणी आपल्याजवळ असतील किंवा त्याच्याजवळ आपण असू याची खात्री देता येत नाही. मुलं दुसरीकडे, वृद्ध आई - वडील आणखी कुठेतरी अशी परिस्थिती असताना अपत्य प्राप्तीचे हे सबळ कारण होऊ शकत नाही. मुलाबाळाशिवाय घराला घरपण येत नाही या मर्यादेपर्यंत अपत्याची गरज भासू शकते. परंतु त्यासाठी एवढा आटापिटा करायचा का हा ज्याचा त्याचा प्रश्न आहे.

आपल्या देशापुरते बोलावयाचे असल्यास या धोकादायक तंत्रज्ञानाची अजिबात गरज नाही. हवे असल्यास लाखो अनाथ बालकांपैकी एखाद्याला/एखादीला दत्तक घेऊन आपले जीवन आनंददायी करता येईल.

फक्त आपल्याजवळ पैसा आहे म्हणून एखाद्या गरीब, नडलेल्या स्त्रीला सरोगेट माता होण्यास भाग पाडून तिला गुलामासारखी वागणूक देणे विवेकीपणाचे लक्षण नव्हे. घरात मूल वाढ असताना त्याच्या खोडकरपणातून, खेळकरपणातून बोबड्या बोलातून आनंद मिळविण्यासाठी घरात काही काळ तरी रांगते मूल हवे याबद्दल दुमत नाही; परंतु यासाठी कृत्रिम गर्भधारणा उपाय होऊ शकत नाही.

**प्रतिसाद**

माझ्या मते लेखात अभिनिवेशपणे सरोगसीच्या बाजूने मांडलेल्या मुद्द्यांचा उल्लेख नसल्यामुळे कदाचित लेख एकांगी वाटल्याची शक्यता आहे. लेखात वापरलेली चित्रं अंगावर येत असल्यामुळेही लेख भडक वाटला असेल. (googleच्या images साठी surrogacy असे टंकून क्लिक केल्यास गोऱ्या गोमट्या बाळांचे, हसत हसत बाळाचे पप्पी घेणाऱ्या सरोगेट मातांचे व जोडप्यांचे फोटो ढिगाने पाहायला मिळतील.त्याऐवजी वाचकांचे लेखाकडे लक्ष वेधण्यासाठी अशा प्रकारची चित्रं निवडली आहेत.) परंतु सरोगसीच्या बाजूने आजकाल मोठ्या प्रमाणात लेख येत आहेत. (व या लेखाच्या काही प्रतिसादातसुद्धा असा उल्लेख आहे.) *गरीबांना चार पैसे (जास्त!) मिळत असल्यास तुमच्या पोटात का दुखते?* हा सर्वसामान्य सूर त्यामागे आहे.

एक हायपेथेसिस केस म्हणून त्यासंबंधी चर्चा करता येईल. अमेरिकेतील वा इतर कुठल्याही विकसित देशातील जोडप्यांनाही न परवडण्याइतका खर्च यासाठी येत असल्यास निर्वेधपणे चाललेला हा धंदा एवढ्या ऊर्जितावस्थेपर्यंत पोहोचला नसता. यासाठी आपल्या शासनाने सरोगसीतून जन्मलेल्या बाळाला बाहेरच्या देशात नेण्यासाठी 1-2 कोटी रुपये एवढा जबरदस्त कर लादल्यास हा धंदा इतका तेजीत चालला नसता. किंवा शासनानेच पुढाकार घेऊन सरोगसीला उत्तेजन देण्याचे धोरण ठरवून त्यासाठी ठिकठिकाणी सरोगसी क्लिनिक्स उघडल्यास आपल्या देशातील हजारो लाखो

गरीब स्त्रिया पुढे आले असते. आणि demandपेक्षा supply जास्त झाल्यावर भाव कोसळले असते व बाजारही कोसळला असता.

परंतु लेखातील मुद्दा हा नाही. मुद्दा हा आहे की सरोगसीच्या काळातील स्त्रियांच्या शारीरिक व मानसिक आरोग्याचा, अर्धवटपणे राबवत असलेल्या तंत्रज्ञानाचा व त्यापासून होणाऱ्या दूरगामी दुष्परिणामांचा. वंध्यत्वावर मूलभूत संशोधन न करता केवळ काही जैविक तंत्रज्ञानांची मदत घेऊन त्यालाच एकमेव उपचार पद्धती म्हणून डांगोरा पिटणाऱ्यांचा.

आता राहता राहिला प्रश्न सरोगसीची बाजू टीव्ही चॅनेल्सवर मांडणाऱ्यांचा. सतीची पद्धत जेव्हा रूढ होती तेव्हा जर आजच्यासारखे टीव्ही चॅनेल्सची सोय असती तर *सती जाणे किती उदात्त आहे, शोषणरहित आहे, स्त्रियांच्या हिताची आहे* असे छातीठोकपणे सांगणाऱ्यांची संख्या कमी नसती **. पेड न्यूज फक्त मुद्रित वृत्तपत्रासाठीच नव्हे तर टीव्ही चॅनेल्सवरही शक्य आहे, हे आपण नाकारू शकत नाही.

(** अवांतर: सती जाणे हे किती उदात्त आहे व ती प्रक्रिया किती पवित्र आहे हे ठासविण्यासाठी 'स्वामी'कार रणजित देसाई यांनी *स्वामी* पुस्तकातील शंभरेक पानं खर्ची घातलेले वाचकांना कदाचित आठवत असेल!)



# आधुनिक शकुन – अपशकुन

प्रत्येक समाज वा संस्कृती पिढीजात काळापासून आलेल्या रूढी परंपरांचे शक्य होईल तितके पाळण्याच्या प्रयत्नात असतो. व अशा रूढी परंपरामध्ये श्रद्धा - अंधश्रद्धांचा वाटा फार मोठ्या प्रमाणात असतो. काही वेळा त्यांच्यातील फोलपणा स्पष्टपणे दिसत असूनसुद्धा त्यामुळे काही नुकसान तर होत नाही ना म्हणत त्या पाळल्या जातात. मांजर आडवे गेल्यास एक क्षण थांबून पुढे गेल्यामुळे अपशकुनाचा परिणाम होणार नाही याची खात्री असते. मानसिकता तशीच ठेवून सामान्यपणे त्या त्या काळातील जीवनशैलीप्रमाणे शकुन अपशकुनांचे आयकॉन्स बदलतात. बैलगाडींची पूजा करणारे आता मोटार गाड्यांची पूजा करतात. परंतु पूजा करण्याची मानसिकता नष्ट झाली नाही. भारतीय परंपरेने याबाबतीत तर कहर केला आहे व अजूनही आपण त्या जंजाळापासून मुक्त होऊ शकलो नाही. गंमत म्हणजे स्वत:ला अत्याधुनिक म्हणून घेणारे श्रीमंत व अतीविकसित राष्ट्रातील समाजसुद्धा याला अपवाद नाहीत. अत्याधुनिक जीवनशैलीनुसार या समाजातील शकुन अपशकुन विमान, डॉक्टर्स, सिगारेट्स इत्यादीत शोधल्या जातात. यातील काही नमुनेदार गोष्टींखाली दिल्याप्रमाणे आहेत.

**विमान:** विमान प्रवासात फुलाचा गुच्छ नेणे अशुभ समजले जाते. रिकाम्या असलेल्या आसनांचे सीट बेल्ट्स क्रॉस करून ठेवतात. तसे न ठेवल्यास भूत त्या सीटवर बसून प्रवास करतो. विमानाच्या इंजिनमध्ये बिघाड झाल्यास ग्रेमलिन नावाच्या भुतामुळे बिघाड होतो, असा समज आहे. त्यासाठी बीअरचे नैवेद्य दाखविले जाते.

**अम्ब्युलन्स:** घाई गर्दीच्या वेळी अम्ब्युलन्समधून लिफ्ट घेणे अशुभ समजले जाते. वाटेत अम्ब्युलन्स दिसल्यास गाडी जाईपर्यंत श्वास रोखून धरले जाते. तसे न केल्यास अम्ब्युलन्समधील रुग्णाचा मृत्यु अटळ आहे, असे समजतात.

**कॅलेंडर**: वर्ष, दिवस वा महिना संपायच्या आत कॅलेंडरचे पान बदलणे अशुभ समजले जाते. लीप वर्षाच्या 29 फेब्रुवारीला जन्मलेल्या मुलीचे लग्न लवकर होते. व ती आयुष्यभर निरोगी राहते.
**खुर्ची:** खुर्चीसारख्या निरुपद्रवी वस्तूभोवतीसुद्धा अंधश्रद्धा आहेत. खुर्ची खाली पडणे अशुभ समजले जाते. कुणीतरी उठून गेल्यानंतर खुर्ची पडल्यास ती व्यक्ती खोटे बोलते, असा समज आहे. दवाखान्यातील खुर्चीवर झाकून ठेवलेले कापड खाली जमीनीवर पडल्यास नवीन रुग्ण येणार. खुर्ची उलटे ठेवल्यास घरात भांडण होणार, अशा समजुती खुर्चीबाबत आहेत.
**सिगारेट:** एकाच काडीने तीन सिगारेट पेटवणे अशुभ समजले जाते. बाळाच्या पाळण्यात सिगरेट ठेवल्यास भूत पळून जातो म्हणे. सिगरेटचे रिकामे पाकीट पायाने तुडवणे शुभ समजले जाते.
**डॉक्टर्स:** डॉक्टर्सचा सल्ला शुक्रवारी घेतल्यास रुग्ण बरा होत नाही. दवाखान्यात प्रथम येणारा रुग्ण ठणठणीत बरा होतो. डॉक्टरचे बिल पूर्णपणे चुकते करणे दुर्दैवाला आमंत्रण दिल्यासारखे होईल. काळया रंगांच्या गोळयाने रुग्ण बरा होऊ शकत नाही. पांढऱ्या वा तांबड्या रंगांच्याच गोळयाने रुग्ण बरा होतो, असा समज आहे.
**हातरुमाल:** हातरुमाल खाली पडल्यास स्वत: उचलणे अशुभ समजले जाते. घडी केलेला रुमाल सतत बाळगणे संकटांना आमंत्रण देवू शकते. एखाद्याचा/ एखादीचा रुमाल उसने घेणे म्हणजे त्याचे/ तिचे दु:ख/अश्रू मागून घेतल्यासारखे समजतात. रुमालाला गाठ बांधून ठेवल्यास भूतबाधा होत नाही.
**सुई दोरा:** काळा दोरा ओवलेली सुई रस्त्यावर दिसणे अशुभ समजले जाते. गर्भिणीने अशी सुई बघितल्यास तिला मुलगी होणार. दिवसाची सुरुवात सुई या शब्दाने केल्यास दिवस वाईट जाणार. मित्राला सुई देणे हे मैत्री तोडल्याचे लक्षण आहे. शिवत असताना सुई मोडल्यास ते शुभशकुन असे समजले जाते.
**फोटो:** भिंतीवर टांगलेली फोटोची फ्रेम अचानक पडल्यास संकट कोसळणार. एखाद्या प्राण्याबरोबर फोटो काढून घेणे हे भुताच्या स्वरूपातील प्राण्याचा

फोटो काढल्यासारखे होईल. तिघांचाच फोटो काढल्यास मधल्या व्यक्तीवर संकट येणार. आवडत्या व्यक्तीचे फोठो स्टीअरिंग व्हीलजवळ ठेवल्यास गाडीला अपघात होत नाही.

**साबण:** एकमेकांना साबण देणे मैत्री तोडण्याचे लक्षण मानले जाते. आंघोळ करताना साबण निसटणे संकटाला आमंत्रण दिल्यासारखे असते.

**चमचे:** चमचा खाली पडल्यास घरात लहान मूल येणार. मोठा चमचा स्वयंपाकाच्या ओट्यावर किंवा डायनिंग टेबलवर पडल्यास 8-10 माणसं जेवायला येणार. चमचा उलटा पडल्यास मनासारखी गोष्ट होणार नाही.

*या यादीत आपणही भर घालू शकता.*



# बुद्धिमत्तेचा ऱ्हास होत आहे का?

पूर्व प्राथमिक वा पहिली - दुसरीतील मुलं (व मुलीसुद्धा!) जेव्हा 70 - 80 टक्के गुण मिळवतात तेव्हा पालकांना आपल्या घरात खुद्द आइन्स्टाइन जन्माला आला आहे असेच वाटत असते. परंतु जेव्हा हीच मुलं मोठी होऊन आपले गुण उधळू लागतात तेव्हा मात्र पालकांचे डोळे उघडतात. म्हणूनच यासाठी वस्तुनिष्ठपणे विचार करून आपल्या पाल्याच्या कुवतीचा अंदाज घेणे शहाणपणाचे ठरू शकेल. अनेक वेळा आपला अंदाज चुकत असला तरी सामान्यपणे आजच्या पिढीचा बुद्ध्यांक मागच्या पिढीच्यापेक्षा नक्कीच जास्त आहे, हे कबूल करावे लागेल. कदाचित आपल्याला खरे वाटणार नाही. परंतु आताची पिढी आपल्यापेक्षा नक्कीच जास्त शहाणी आहे. संगणक, मोबाइल, स्मार्ट फोन, आयपॅड, आयपॉड, टॅब्लेट पीसी, टीव्ही, केबल टीव्ही, स्मार्ट टीव्ही, HD टीव्ही, कार्टून्स, आकर्षक जाहिराती, वेगवान कार्सचे प्रकार, इत्यादीमुळे आजची मुलं जास्त स्मार्ट होत आहेत. त्यांच्या स्मार्टपणाचा अंदाज संगणकाच्या स्क्रीनवरील वैविध्यपूर्ण रचना, मोबाइल्सचे रिंगटोन्स, संगणक - मोबाइल प्रणालीतील गुण - दोष शोधण्याची कुशलता, संभाषण चातुर्य, हजरजबाबीपणा, बहुश्रुतता, धडाडी, आत्मविश्वास, धोका पत्करण्यासाठीचे धैर्य, इत्यादीतून सहजपणे लक्षात येतो. मुलं आपल्यापेक्षा सरस आहेत याचा प्रत्यय वेळोवेळी व अनेक प्रसंगी आपल्याला येत असतो. व्हिडिओ गेम्स खेळत असताना दुसरी -तिसरीतील मुलंसुद्धा आई - वडिलावर सहजपणे मात करू शकतात. मुला-मुलींनाही आपले आई - बाबा बावळट आहेत, असेच वाटत असते. आश्चर्याची गोष्ट म्हणजे त्यांच्या या वाटण्यात खरोखरच तथ्य आहे. बुद्धीमत्तेच्या मोजमापासाठी बुद्ध्यांक (IQ) हे मापदंड योग्य आहे हे गृहित धरल्यास 1950 नंतर बुद्ध्यांकात फार मोठ्या प्रमाणात वाढ झाली आहे हे लक्षात येईल. पुढची पिढी मागच्या पिढीपेक्षा जास्त हुशार आहे, असे जणू काही ही बुद्ध्यांकातील वाढ सुचवू इच्छिते.

परंतु असा निष्कर्ष काढण्यात घाई होत नाही ना? बुद्धिमत्ता ही काळाप्रमाणे बदलणारी, लवचिक अशी संकल्पना आहे. मुळात बुद्ध्यांकात वाढ होत आहे, याबद्दल मानसतज्ञात मतभेद आहेत. काही संशोधकांना बुद्धिमत्तेत वाढ झाली नसून कठिण समस्यांची उत्तरं शोधण्याच्या क्षमतेत वाढ झाली आहे, असे वाटते. इतरांच्या मते बुद्ध्यांक वास्तव परिस्थितीशी सामना करण्यासाठी आवश्यक असलेल्या चातुऱ्याचे मापन ठरत आहे. या वाढीला मर्यादा आहेत व त्यानंतर वाढ शक्य नाही असेही काही तज्ञांचे मत असल्यामुळे गोंधळात भर पडत आहे.

बुद्धिमत्ता ही मानसिक गुणवत्ता असून त्यामध्ये अनुभवातून शिकण्याची क्षमता, कठिण परिस्थितीतून बाहेर पडण्यासाठी वा जुळवून घेण्यासाठी लागणाऱ्या सामर्थ्याचे आकलन व अमूर्त संकल्पनांची समज या गोष्टी स्थूलमानाने आढळतात. बुद्धिमत्ता अनेक स्वरूपात व्यक्त होत असते. यात अनेक प्रकार आहेत: analytical, pattern, musical, physical, practical, intra personal, interpersonal. काहींना समस्यांचे विश्लेषण करण्यात प्राविण्यता असते. काही जणांना, विद्युत मंडल बघता क्षणीच वा इंजिनचे बॉनेट उघडल्या क्षणीच त्यातील गुंतागुंत लक्षात येते व त्यासाठी नेमके काय करावे हेही सुचते. लता मंगेशकर, पं जसराज, झाकीर हुसेन, सत्यजित राय, एम एफ हुसेन, इत्यादी कलाकारांच्या बुद्धिमत्तेची जातकुळी वेगळी असते. मॅराडोना, सचिन तेंडूलकर, सायना, आनंद इत्यादी क्रीडापटूंची बुद्धिमत्ता शारीरिक बुद्धिमत्ता या सदरात मोडते. काहींना नाते-संबंध, मैत्री जोडण्याची व ती टिकवून ठेवण्याची कला अवगत असते. इतर काही आपल्या संभाषण चातुर्यातून वा प्रसन्न व्यक्तिमत्वातून कुणालाही आत्मसात करू शकतात व आपला कार्यभाग उरकून घेतात. काही जण व्यवहारकुशल असतात. अशा प्रकारे बुद्धिमत्ता या शब्दात समस्यांचे विश्लेषण करून उत्तरं शोधण्याची कुशलता, शैक्षणिक परीक्षेतल्या यशासाठी लागणारी हुशारी, साहित्य संगीत इत्यादी ललित कलाप्रकारांसाठी लागणारी सर्जनशीलता,

आर्थिक, राजकीय व सामाजिक यशासाठी लागणारे व्यावहारिक चातुर्य, व क्रीडाक्षेत्रात नाम कमावण्यासाठी लागणारे कौशल्य अशा विविध गोष्टींचा समावेश करता येईल.

आपल्याला अभिप्रेत असलेला बुद्ध्यांक मात्र फक्त विश्लेषणात्मक बुद्धिमत्तेचे मापन करणारे निकष असून

बुद्ध्यांक = (मानसिक वय/शारिरीक वय) x 100

या पद्धतीने ते मोजले जाते. मानसिक वयाचा अंदाज घेण्यासाठी काही चाचणींची रचना केली असून त्या गुणानुसार बुद्ध्यांक निर्दिष्ट केले जाते.

न्यूझिलंड येथील **जेम्स फ्लिन्न** या राज्यशास्त्राचे प्राध्यापक याविषयी संशोधन करत आहेत. बुद्ध्यांक नेमके काय सुचवतात व काय सुचवत नाहीत याविषयी त्यांनी सखोल अभ्यास केला आहे. त्यांच्या शोधनिबंधात 14 देशातील तरुण पिढींच्या बुद्ध्यांकांची तुलना केली आहे. नेदर्लंड, बेल्जियम, यासारख्या युरोपियन राष्ट्रामध्ये सक्तीची सैनिकभरती असल्यामुळे तरुणांना बौद्धिक चाचणीला सामोरे जावे लागते. यावरून त्या त्या राष्ट्रातील सरासरी बुद्ध्यांकासंबंधीची माहिती फ्लिन्न यांना मिळाली. इतर काही देशातील बुद्ध्यांकाची माहिती मिळवून फ्लिन्न यानी आपला शोधनिबंध सादर केला. बुद्ध्यांकाचे शाब्दिक, संख्यात्मक व दृक् - अवकाशीय (visuo-spatial) अशा तीन प्रकारात विभागणी केली. शाब्दिक बुद्ध्यांक चाचणीत अचूक शब्दांची, वा वाक्यरचनेची, संख्यात्मक बुद्ध्यांक चाचणीत अंकगणित, बीजगणित यांच्यावरून अंक - संख्यांची व दृक् - अवकाशीय बुद्ध्यांक चाचणीत भूमितीय संरचना, आकृतीबंध यांची निवड करावी लागते. फ्लिन्न यांच्या मते दृक् - अवकाशीय प्रकारातील बुद्ध्यांकातच फक्त वाढ झाली असून इतर प्रकारात जास्त फरक जाणवत नाही.

याचे परिणाम काहीही असले तरी आधुनिक मानवाच्या बुद्धीचा प्याला काठोकाठ भरला आहे असे मानण्यास फ्लिन्न तयार नाहीत. आपले आजोबा, पणजोबा मतीमंद होते व आपण मात्र चतुर, चाणाक्ष आहोत असा अर्थ

काढता कामा नये. फार फार तर अमूर्त अशा समस्यांची उत्तरं शोधण्यासाठी लागणारी बौद्धिक प्रगल्भता व कुशलता आत्मसात केली आहे, असा निष्कर्ष आपण यातून काढू शकतो. अशा समस्यांकडे जास्त गांभीर्याने बघण्याकडे कल वाढत आहे, असाही अर्थ यातून ध्वनित होतो. आपल्या आजोबा - पणजोबांच्या काळातील समस्यांचे स्वरूप सर्वस्वी वेगळया होत्या. त्यांची बौद्धिक कुशलता त्या काळानुरूप होती. एके काळी औटकी, पावकी, अडीचकी व इतर पाढे तोंडपाठ करण्यातच हुशारी समजली जायची. कारण तोळा, मास, रत्तल, शेर, मण, पै, अधेली, आणेली, चवली इत्यादी व्यवहारातील मोजमापांसाठी या पाढ्यांचा सर्रास वापर होत असे. सर्व आकडेमोड तोंडी करावे लागत असे. कॅल्क्युलेटर्स, कॅश रिजिस्टर्स, संगणक अशी साधनं त्यांना उपलब्ध नव्हत्या. बेरीज, वजाबाकी, गुणाकार, भागाकारसारख्या अंकगणितीय कौशल्याची त्याकाळी गरज होती. इंग्रजीतील शब्दसंग्रह, वाक्यरचनेवरील प्रभुत्वासाठी तर्खडकरांच्या पुस्तकांना पर्याय नव्हता. आताच्या युगात बदललेल्या साधन -सुविधांमुळे या पद्धती कालबाह्य ठरल्या आहेत. त्यामुळे आताच्या पिढीला एकेकाळची ही कुशलता काय कामाची असे वाटणे साहजिकच आहे.

फ्लिन्न यांच्या मते आजचा समाज बुद्धिमत्तेच्या बाबतीत फारच हळवा होत चालला आहे. जीवनोपयोगी समस्यांकडे पाठ फिरवून अमूर्त - काल्पनिक समस्या सोडविण्यासाठी आपली बुद्धी खर्ची घालत आहे. रंजकतेला प्राधान्य दिले जात आहे. टीव्ही, स्मार्ट टीव्ही, संगणक, मोबाइल्स, वेगाने धावणाऱ्या SUVs इत्यादीमुळे दृक् - अवकाशीय कुशलतेत भर पडत आहे. ही वाढ एकाच पिढीत झालेली नसून अनेक पिढ्या उत्क्रांत होत आजच्या अवस्थेपर्यंत पोचली आहे.

आपल्या बुद्धिमत्तेत वाढ होत आहे, याबद्दल तज्ञांच्यामध्ये दुमत नाही. परंतु ही वाढ कशामुळे होत आहे याची कारणं मात्र वेगवेगळी आहेत. सकस आहार, निरोगी शरीर, लहान कुटुंब, शिक्षणाची संधी, तंत्रज्ञानातील सोयी -

सुविधा, इत्यादीमुळे बुद्धिमत्तेत वाढ झालेली जाणवते. दृक् - अवकाशीय उपक्रमाबरोबरच आपला समाज दिवसे - न - दिवस जास्त जटिल होत असून त्यातून उद्भवणाऱ्या कठिण समस्यांना उत्तरं शोधण्याच्या प्रयत्नामुळे बुद्धिमत्तेत वाढ होत आहे. उत्तर शोधताना अमूर्त अशा संकल्पना समजून घ्याव्या लागतात. अनुभवाची शिदोरी असावी लागते. समस्याला उत्तर मिळेपर्यंत फोकस्ड असावे लागते. मगच समस्यांचा ठावठिकाणा कळतो. व उत्तरं सापडत जातात. सुरुवातीला कुठलीही संकल्पना समजून घेण्यासाठी फार कष्ट घ्यावे लागतात व वेळही जास्त लागतो. आइन्स्टाइनचा सापेक्षतावाद, न्यूटनचे गती-नियम, एंट्रॉपीचा सिद्धांत, क्वांटम डायनॅमिक्स इत्यादी समजून घेण्यासाठी अर्धे अधिक आयुष्य खर्ची घालावे लागत असे. सेट थेअरी, इंटिग्रल कॅल्क्युलस, डिफरन्शिअल इक्वेशन्स, सारखे विषय पदवी परीक्षेसाठी शिकविले जात होते. आता मात्र हेच विषय 10वी - 12वीची मुलं काही महिन्याच्या अभ्यासानंतर आत्मसात करू शकतात. संकल्पना समजून घेण्यासाठी कमीत कमी वेळ लागत आहे. एकेकट्याने प्रयत्न करण्यापेक्षा परस्पर सहकारातून समस्येचे विभाजन करून सामूहिकरित्या प्रयत्न केल्यास समस्या लवकर सुटतात याची जाणीव होत आहे. त्यामुळे आता कुठलीही समस्या कठिण असे वाटेनासे झाले आहे.

परंतु काही संशोधक मात्र बुद्ध्यांकाच्या पलिकडे जावून वास्तव परिस्थितीचा सामना करू शकणाऱ्या बुद्धिमत्तेच्या शोधात आहेत. आजकाल बुद्धीबळासारख्या मेंदूला ताण देणाऱ्या बौद्धिक खेळप्रकारात कमी वयातील तरुण - तरुणी ग्रॅंड मास्टर्स होत आहेत. 1950 ते 1971 पर्यंतच्या ग्रॅंड मास्टर्सच्या वयात फार मोठा बदल झाला नव्हता. 91 नंतरच्या ग्रॅंड मास्टर्सचे सरासरी वयोमान मात्र भरपूर खाली उतरलेले जाणवते. कदाचित जीवघेण्या स्पर्धेमुळे वा आर्थिक लाभासाठी प्रयत्नांची पराकाष्ठा लहान वयापासूनच करत असल्यामुळे अगदी लहान वयातच अनेक जण ग्रॅंड मास्टर्स झाले आहेत. वैज्ञानिकांच्या बाबतीतसुद्धा हाच अनुभव जमेस आहे. वैज्ञानिकांच्यावरील

आर्थिक-सामाजिक, शैक्षणिक दबावामुळे **शोधनिबंधांच्या संख्येत**दरवर्षी लाखोनी भर पडत आहे. मात्र वास्तवतेशी सामना करू शकणाऱ्या **पेटंट्स राइट्सच्या संख्येत**फार मोठी वाढ झालेली जाणवत नाही.

वरील सर्व विधाने पटण्याजोगी असली तरी आजची मुलं हुशार आहेत याबद्दल शंका नाही. दृक् - श्राव्य माध्यमाच्या वाढत्या प्रभावामुळे मुलांच्या आकलन क्षमतेत वाढ होत आहे. दृक्-अवकाशीय प्रकारात त्यांचे प्रभुत्व जाणवत आहे. त्यामुळे बुद्ध्यांकात वाढ होत आहे हे मात्र नक्की. अमूर्त स्वरूपातील जटिल समस्या हाताळण्याची चलाखी मुलांमध्ये आहे . कठिण प्रसंगातून बाहेर पडण्यासाठी मार्ग शोधण्याची कला या पिढीने आत्मसात केली आहे. काही अपवाद वगळता ही चलाखी किंवा स्मार्टनेस्स आपल्या आजोबा, पणजोबा यांच्याकडे नव्हती, हे मान्य करायला हवे

ही बुद्धिमत्ता अशीच वाढत राहणार आहे का? आजचे शहाणे 2050 साली मठ्ठ समजले जातील का? कदाचित तसे नसावे. यासंबंधीची माहिती घेताना बुद्धिमत्तेतील वाढीचा व औद्योगिकरणाचा संबंध जोडता येईल का याचाही विचार केला जात आहे. संशोधकांनी ऑस्ट्रेलियातील शिक्षकांनाच हा प्रश्न विचारला. कारण शिक्षकच विद्यार्थ्यांच्या बुद्धिमत्तेचे जास्त परखडपणे व अचूकपणे विश्लेषण करू शकतात. ऑस्ट्रेलियातील शिक्षकांना विद्यार्थ्यांच्या बुद्धिमत्तेत वाढ होत आहे जाणवले नाही. हाच प्रश्न सिंगापूर व कोरिया या देशातील प्राथमिक शिक्षकांना विचारल्यावर अगदी वेगळीच प्रतिक्रिया ऐकावयास मिळाली. त्यांच्या मते विद्यार्थी फार प्रतिभावान आहेत.

यासंबंधातील डेन्मार्क येथील उदाहरणसुद्धा वाचनीय आहे. डेन्मार्क येथे सक्तीचे सैनिक शिक्षण असल्यामुळे 17 वर्षाच्या तरुणांना (व तरुणींनासुद्धा!) बुद्धिमत्तेच्या चाचणीला सामोरे जावे लागते.1957 पासूनच्या चाचण्यांचा अभ्यास केल्यास 1960 - 1970 च्या दशकापर्यंत शाब्दिक, सांख्यिक व दृक् -अवकाशीय चाचणीत समर्पक उत्तरं दिल्यामुळे बुद्ध्यांकात वाढ होत आहे, असे आढळून आले. भूमितीय रचना, संख्यांची मांडणी, संकल्पनेतील

नातेसंबंध, इत्यादी प्रकारच्या चाचणीत समर्पक उत्तरं दिली जात होती. परंतु नव्वदीच्या दशकानंतर इतर प्रकारापेक्षा दृक्-अवकाशीय प्रश्नांनाच योग्य उत्तर मिळू लागली. आश्चर्याची गोष्ट म्हणजे बुद्ध्यांकाचा ग्राफ खाली येऊ लागला. याचाच परिणाम म्हणून 1999 सालानंतर उच्च शिक्षण घेणाऱ्यात लक्षणीय प्रमाणात घट होऊ लागली. यावरून बुद्धिमत्तेच्या वाढीला काही मर्यादा असू शकतात, हे प्रकर्षाने जाणवू लागले. डेन्मार्कसारख्या अतीविकसित औद्योगिक राष्ट्रातील बुद्धिमत्तेचा ऱ्हास होत आहे हे पहिल्यांदा लक्षात आले. परंतु पूर्वेकडील राष्ट्रे गेली 50 वर्षे विकसित होत आहेत. त्यामुळे त्यांना परिस्थिती शहाणे बनवत आहे.

बुद्ध्यांक स्थिर असण्याचे वा ऱ्हास होण्याचे अजून एक कारण, उत्तेजनाचा अभाव हाही असू शकेल. ऑस्ट्रेलियन विद्यार्थ्यांच्या सर्वेक्षणात तिथल्या शिक्षकांना विद्यार्थ्यामध्ये शिक्षणाची आवड नाही हेच जणू सुचवायचे होते. विद्यार्थी हुशार वा मठ्ठ ही बुद्धिमत्तेची अवस्था नसून शिकण्यासाठी उत्तेजन मिळत असल्यास अवस्थेत बदल होऊ शकतो. शिकण्याची आवड निर्माण करणे शक्य आहे. अतीविकसित देशात नेमके याचीच कमतरता आहे. संशोधक मात्र या विचाराला आक्षेप घेत आहेत. कदाचित नेहमीप्रमाणे शिक्षक विद्यार्थ्यांना कमी लेखत असावेत. त्याचप्रमाणे कोरियातील शिक्षकांनासुद्धा विद्यार्थी जास्त श्रम घेत नाहीत असेच वाटत होते.

10वी, 12वी किंवा पदवी परीक्षांचे परिणाम काय सुचवतात, हाही बुद्धिमत्तेचा निकष होऊ शकतो. कालमानाप्रमाणे प्रश्नांचे स्वरूप सारखे बदलत असतात. विद्यार्थी बदलतात. त्यामुळे परीक्षांच्या परिणामावरून निष्कर्ष काढणे तितके सोपे नाही. याबाबतीतला अमेरिकेतील विद्यार्थ्यांच्या बुद्ध्यांकाचा ग्राफ स्थिर असून ब्रिटनमध्ये तो वाढत आहे. परंतु जास्त विद्यार्थ्यांना उच्च शिक्षण घेता यावे म्हणून परीक्षेतील प्रश्न सोपे केले असतील, ही शक्यता नाकारता येत नाही. त्यामुळे विद्यार्थी खरोखरच हुशार आहेत की नाही हा प्रश्न अनुत्तरितच राहतो. एके काळी गुणवत्ता यादीतील टक्केवारी 70 -

80 च्या पुढे नसायची. आता मात्र 98-99च्या आसपास असते. परंतु ही टक्केवारीसुद्धा बुद्धिमत्तेच्या वाढीचे मापन होऊ शकत नाही.

खरोखरच आपण बुद्धिमत्तेच्या मर्यादेपर्यंत पोचलो आहोत का? विद्यार्थ्यातील बुद्धिमत्ता वाढवण्यासाठीचे आपले प्रयत्न अपुरे पडत आहेत का? उत्तेजन देण्यात आपण कमी पडत आहोत का? यासारख्या प्रश्नांची उत्तरं आपल्याला अजून शोधावयाची आहेत. एक मात्र खरे की आर्थिक सुबत्ता व बुद्धिमत्ता यांचे प्रमाण नेहमीच व्यस्त असते. रोमन नागरिक सुख संपत्तीत लोळत असताना विचार करण्यासाठी म्हणून ग्रीक नागरिकांची मदत घेत होते (outsourcing!) अशीच परिस्थिती आज अमेरिकेसारख्या श्रीमंत देशांच्या बाबतीत घडत आहे. माहिती तंत्रज्ञानासारख्या बौद्धिक कसरतीच्या क्षेत्रात आपल्यासारख्या देशांचा वरचष्मा याच कारणासाठी असू शकेल!

**प्रतिसाद**

आपण उपस्थित केलेल्या शंकांचे समाधानकारक (व मुद्देसूद!) उत्तर देणे माझ्यासारख्यांकडून शक्य होत नाही याबद्दल दिलगिरी व्यक्त करतो.

माझा हा लेख काही वर्षापूर्वी वाचलेल्या सायंटिफिक अमेरिकनमधील एका लेखावर आधारित आहे. गेल्या काही वर्षात या विषयीच्या माहितीत भरपूर प्रमाणात भर पडली आहे, हे गूगल केल्यास नक्कीच जाणवेल.

पिढीतील वाढत्या अंतरामुळे शीर्षक व लेख कदाचित नकारात्मक वाटण्याची शक्यता आहे. *बुद्धिमत्तेचा ऱ्हास होत आहे का?* ऐवजी *आपण स्मार्ट होत आहोत का ?* हे शीर्षक कदाचित सकारात्मक वाटले असते. परंतु जित्याची खोड ....... सुटत नाही, हेही तितकेच खरे.

याच संदर्भात आजच एक कविता फॉर्वर्डमधून मेल बॉक्समध्ये आली होती.  वाचकांसाठी (व वाचून विसरून जाण्यासाठी!) ही कविता येथे देण्याचा मोह आवरत नाही.

**विसरलो**

हुशारी मिळवताना शहाणपण विसरलो I
समजत नाही,मी घडलो की बिघडलो? II
सुख शोधताना जीवनाचा बोध विसरलो I
सुखासाठी साधने वापरताना साधना विसरलो II
भौतिक वस्तूच्या सुखात नैतिकता विसरलो I
धन जमा करताना समाधान विसरलो II
तंत्रज्ञान शोधताना ते वापरण्याचे भान विसरलो I
परिक्षार्थी शिक्षणात, हाताचे कौशल्य विसरलो II
टी.व्ही. आल्यापासून बोलणं विसरलो I
जाहिरातीच्या माऱ्यामुळे चांगलं निवडणं विसरलो II
गाडी आल्यापासून चालणं विसरलो I
मोबाईल आल्यापासून भेटीगाठी विसरलो II
कॅलक्युलेटर आल्यापासून बेरीज विसरलो I
संगणकाच्या वापराने विचार करणं विसरलो II
संकरीत खाण्यामुळे पदार्थांची चव विसरलो I
फास्टफूडच्या जमान्यात तृप्तीची ढेकर विसरलो II
ए.सी. मध्ये बसून झाडाचा गारवा विसरलो I
परफ्युमच्या वापरामुळे फुलांचा सुगंध विसरलो II
चातुर्य मिळवताना चरित्र विसरलो I
जगाच्या भूगोलात गावाचा इतिहास विसरलो II
बटबटीत प्रदर्शनात सौंदर्याचे दर्शन विसरलो I
रिमिक्सच्या गोंगाटात सुगमसंगीत विसरलो II
मृगजळामागे धावताना कर्तव्यातला आनंद विसरलो I
स्वतःमध्ये मग्न राहून दुसऱ्याचा विचार विसरलो II
सतत धावताना क्षणभर थांबणं विसरलो I
जागेपणी सुख मिळवताना सुखानं झोपणं विसरलो II

Transition stage मधून आपण जात असल्यामुळे असल्या कविता कवींना सुचत असतील!

●●●

# गंमत जंमत!

स्वाती व प्राची (दोघीं, सुमारे चार वर्षाचे असावेत) रोज काहीना काही खेळ खेळत असतात. समोर दिसेल त्या वस्तूंचा वापर करत खेळाच्या प्रकारात विविधता आणत असतात. परंतु त्यांचे खेळ नेहमीच नावीन्यपूर्ण असतात. कधी खोटा खोटा स्वयंपाक, कधी शाळा, कधी प्रवासाचे ठिकाण, कधी आजी आजोबांची, शेजाऱ्यापाजाऱ्यांची हुबेहूब नक्कल, आगगाडी, विमान, बाग इ.इ कुठलाही विषय असो, दोघी मनापासून खेळतात. त्यांच्या खेळात काही वेळा प्रत्यक्ष कृतीपेक्षा बडबड जास्त असते. व ती बडबड इतर कुणी ऐकत असल्यास त्यातील एक अवाक्षरही कळत नसते. तसे पाहता त्यांच्या संवादात नेहमीचेच शब्द असतात. परंतु त्यातून काहीही अर्थबोध होत नाही. त्या दोघींना मात्र प्रत्येक वस्तूचे त्या खेळातील स्वरूप, घटनाक्रम, संवाद, संवादातील आशय यांची पक्की जाणीव असते व त्या खेळापुरते त्या शब्दांचा अर्थही ते बदलत नसतात. ऐकणाऱ्यांना तो ओळखीचा शब्द वाटत असला तरी त्या दोघी तो शब्द अत्यंत वेगळ्याच अर्थाने वापरत असतात.

आजचा खेळ दोन रिकाम्या काडीपेटींच्या भोवती गुंफलेला होता. दोघींनी प्रत्येकी एकेक पेटी घेतली होती. मात्र आजच्या खेळासाठी एक अट होतीः पेटीत काय आहे ते फक्त स्वतःच बघावे आणि दुसऱ्याच्या पेटीत काय आहे ते बघू नये. एवढेच नव्हे तर स्वतःच्या पेटीत काय आहे हेसुद्धा दुसऱ्याला सांगू नये, किंवा त्याची तुलनाही करू नये. परंतु खेळ पुढे सरकण्यासाठी फार फार तर पेटीच्या आतील वस्तूला आपण *भुंगा* म्हणायचे यावर तडजोड झाली व खेळ पुढे सरकू लागला.

काही कारणामुळे त्या दोघींना हा खेळ फार आवडला. अत्यंत अभिमानाने पेटीत दडलय काय याला उत्तर म्हणून 'भुंगा' असे दोघीही म्हणत असल्या तरी हा भुंगा दिसतो कसा, त्याचा रंग रूप, त्याचे किती पाय इत्यादी तपशील विचारल्यास दोघीही गप्प गप्प. काहीही बोलायला तयार नाही. फक्त काही तरी बोलून वेळ घालवत असतात. कदाचित त्या पेटीत काही नसेलही. किंवा

भुंग्याऐवजी एखादा भलताच किडाही असेल. परंतु त्या दोघी मात्र पेटींच्या आत भुंगाच आहे यावर जोर देत होत्या. त्यांच्या आजच्या खेळासाठी भुंगा हा शब्द एकदम फिट् होता. व त्यात बदल करण्याचे त्यांना दुसरे कुठलेही योग्य कारण दिसत नव्हते. परंतु मोठ्यांच्या दृष्टीने हा सर्व पोरखेळ होता.
भुंगा हा एक निरर्थक शब्द असेल की स्वाती – प्राचीलाच माहित असलेला अर्थ त्यातून ध्वनित होत असेल हा आता आमच्यासमोरचा प्रश्न आहे.

(संदर्भः Philosophical Investigations by Ludwig Wittgenstein)

लुड्विग विट्गेनस्टाइन या ऑस्ट्रियन तत्वज्ञानी उल्लेख केलेल्या Beetle in the Box या खेळाचे मराठीतील हे संक्षिप्त वर्णन आहे. विट्गेनस्टाइन या तत्वज्ञाला सगळया भाषा म्हणजे एका प्रकारचे खेळ आहेत असे वाटते. कारण खेळाप्रमाणे भाषेतही काही नियम, परंपरा व संकेत असतात. व जे कुणी ती भाषा वापरत असतात त्यांनाच त्याची पूर्ण कल्पना असते. म्हणून त्यांच्यामध्ये विनासायास संवाद होऊ शकतो.

परंतु विट्गेनस्टाइनला भुंगा या शब्दाचा संदर्भ काय असू शकेल हा प्रश्न पडला आहे. गंमत म्हणजे भुंगा या शब्दाचे अनेक interpretations त्याच्या पुस्तकात सापडतात. त्यामुळे पेटीत काय आहे याच्याशी त्याचे काहीही देणेघेणे नाही. फक्त त्या शब्दाशी त्याची बांधिलकी आहे. भुंगा या शब्दाचा काहीही अर्थ असो, त्याच्याशी आणि पेटीत काय आहे याच्याशी काहीही संबंध नाही, हे मात्र निश्चित. जरी यातून काही गोष्टी स्पष्ट होत असले तरी हा चर्चेचा विषय होऊ शकतो का हाही प्रश्न विचारला जाऊ शकतो.

खरे पाहता आपण स्वाती – प्राचीसारख्या लहान मुलासारखे विचित्र खेळ खेळत नसतो. परंतु हेसुद्धा आपण खात्रीपूर्वक सांगू शकत नाही. कारण कदाचित मानसिक समाधानासाठी आपण याहूनही चित्र - विचित्र खेळ खेळत असतो, हे सांगण्यास का म्हणून लाजायचे? आता हेच बघा ना; मी जर तुम्हाला माझे गुडघे दुखतात असे सांगितल्यास तुम्हाला नेमके काय कळते?

यात पेटी म्हणजे माझे अनुभव. स्वाती – प्राचीच्या खेळातील अटीप्रमाणे या पेटीत कोणीही डोकाऊन पाहू शकत नाही. फक्त मीच पाहू शकतो व माझ्या शब्दावर विश्वास ठेवण्यावाचून तुम्हाला गत्यंतर नाही. किंवा गुडघे दुखतात म्हणजे नेमके काय होते हेही मी कुणाला सांगू शकत नाही. तो फक्त माझा व माझाच अनुभव असतो. जी काही शब्दरचना गुडघ्याच्या वेदनेसाठी मी योजलेली आहे, व जे काही स्पष्टीकरण त्याच्या पुष्ट्यर्थ देत आहे ते सर्व या पेटीत आहे, येवढेच मी सांगू शकतो.अनुभव हा प्रकारच व्यक्ती सापेक्ष असतो त्यामुळे अशी एखादी पेटी प्रत्येक जण बाळगत असतो. फक्त इतर तुमच्या पेटीत डोकाऊ शकत नाही. किंवा तुमचा तो अनुभव अनुभवू शकत नाहीत. त्यामुळे आपण सर्व स्वाती – प्राचीच्या पातळीवर वावरत असतो असे म्हणण्यास भरपूर वाव आहे. आपण फक्त आपल्या अनुभवाशी निगडित असलेले शब्दच नेहमी वापरत असतो आणि या शब्दाचा (मला माहित असलेला) नेमका अर्थ सगळयांना माहित असणार या तोऱ्यात आपण वावरत असतो.

या भुंग्याच्या उदाहरणावरून (अनुभवाच्या पेटीच्या) आत काय दडले आहे किंवा आत काय चालले आहे त्याच्याशी व वेदनेसारख्या गोष्टींचे वर्णन करण्यासाठी वापरत असलेल्या शब्दसमुच्चयाशी काडीचाही संबंध नाही, असे म्हणता येईल. हे जरा अतीच होत आहे असेही वाटण्याची शक्यता आहे. कारण वेदना वा दुःख हे वैयक्तिक बाब असली तरी त्या शब्दातून इतरांना आपल्याला होत असलेल्या अनुभवाची झलक नक्कीच दाखवू शकतो. परंतु शेवटी ती झलकच असते, पूर्ण अनुभव नाही. जेव्हा आपण दोघेही दुःख या शब्दाचा वापर करत असतो तेव्हा माझे दुःख आणि तुमचे दुःख यात फार मोठा फरक असण्याची शक्यता आहे. फक्त या शब्दातून आपण एकाच परिस्थितीतून जात आहोत, आपल्या वर्तनात सारखेपणा आहे, किंवा आपण देत असलेले स्पष्टीकरण जवळ जवळ सारखेच आहेत एवढेच यावरून कळू शकते. फक्त काही तरी वेगळेच घडत आहे, याची कल्पना येते. भुंग्याच्या

चर्चेत उल्लेख केल्याप्रमाणे बाह्य वर्णनाचा आणि आतील अनुभवाचा एकमेकाशी संबंध नाही. त्यामुळे हा शब्द, त्या शब्दाची भाषा, आणि त्यातून ध्वनित होणारा अर्थ व प्रत्यक्ष अनुभव यात चारचौघात सांगण्यासारखे काहीही नाही, एवढे समजले तरी पुरे.

मन या नावाची चीजच या गोधळाला कारणीभूत असू शकते असे आपल्याला म्हणता येईल. परंतु मन म्हणजे नेमके काय – मेंदू, की मेंदूची प्रक्रिया की चेतापेशी की चेतापेशींची क्रिया/प्रतिक्रिया की 'आणखी' काही तरी!



# आत्महत्येचे गूढ

माणसं आत्महत्या का करतात ही एक जगभरच्या मानसतज्ञांना नेहमीच सतावणारी समस्या आहे. ज्या देशात टोकाचे दारिद्र्य, असह्य वेदना देणारे आजारपण, वा कर्जबाजारीपण ही कारणं आत्महत्येसाठी पुरेसे ठरत असले तरी विकसित देशात अशा प्रकारची कारणं नसतानासुद्धा माणसं आत्महत्या का करतात, हे एक न सुटलेले कोडे ठरत आहे. या विकसित देशासंबंधीच्या एका अभ्यासानुसार अशा देशातील ऍनोरेक्सियाने (anorexia) ग्रस्त असलेल्यांच्यापैकी 20 टक्के रुग्ण आत्महत्येचा मार्ग स्वीकारतात. ऍनोरेक्सियाचे रुग्ण काही कारणामुळे पोटभर खात नसल्यामुळे या रोगाचे बळी ठरतात. जगभरातील सुमारे शंभर कोटी जण भुकेने तडफडत जिवंत राहण्यासाठी काहीना काही तरी आधार शोधत असतात. जिवंत राहण्यासाठी आटोकाट प्रयत्न करत असतात. मात्र इतर काही संपन्न देशात भूक लागत नाही, भूक लागली तर खायचे नाही, वजन जास्त होत आहे म्हणून खायचे नाही वा जंक फुडच्या आहारी गेल्यामुळे त्यातून बाहेर पडण्यासाठी काहीही खायचे नाही, अशी माणसं आहेत. व ही कारणं ऍनोरेक्सियासाठी पुरेसे ठरतात. या दोन टोकाच्या कात्रीत सापडलेल्या मानसतज्ञांना आत्महत्या नेहमीच चकवा देणारी एक मोठी समस्या ठरत आहे.

शंभर वर्षापूर्वी एमिल डुर्खेम (Émile Durkheim) या समाजशास्त्रज्ञाने आणि सिग्मंड फ्रॉयड या मानसतज्ञाने आत्महत्यासंबंधी काही विचार मांडले होते. डुर्खेम हे समाजशास्त्राचे अभ्यासक असल्यामुळे आत्महत्येच्या कारणांना समाजातील विविध घटकामध्ये शोधत होते. त्यांच्या मते समाजाशी नीटपणे जुळवून न घेतल्यामुळे, समाजाच्या अरेरावीमुळे, बहिष्कृतावस्थेत राहिल्यामुळे काही जणांना जीवन संपवून टाकावे असे वाटले असावे. फ्रॉयड मात्र death instinct हे माणसात जन्मापासूनच असल्यामुळे तेच आत्महत्या करण्यास प्रवृत्त करत असावे, अशी मांडणी करत होता. अलीकडील आधुनिक अभ्यासकांच्या मते विषण्णता, नैराश्य, भावनिक उद्वेग, वा हताश

स्थिती ही कारणं माणसांना आत्महत्या करण्यास उद्युक्त करतात. परंतु हे विधान अत्यंत ढोबळ स्वरूपाचे असून हे अभ्यासक अजूनही आत्महत्येसंबंधीच्या मुळाशी जाऊन विचार करत नाहीत असे वाटते.

समान परिस्थितीतून जात असताना काही जण आत्महत्येत शेवट शोधतात व इतर मात्र परिस्थितीतून बाहेर पडण्यासाठी प्रयत्नाची पराकाष्ठा करत असतात. हे असे का?

आत्महत्येसंबंधीची आकडेवारी गोळा करण्यात थोडी फार प्रगती झालेली आहे. जगभरात सुमारे 1.8 टक्के मृत्यु आत्महत्येमुळे होतात. आत्महत्या करणाऱ्यात 15 ते 24 वर्षे वयातल्यांची संख्या जास्त असून वाहन अपघातातील मृत्युनंतर आत्महत्येचाच क्रमांक लागतो. आत्महत्येचा प्रयत्न करणाऱ्यात स्त्रियांचे प्रमाण जास्त आहे. परंतु आत्महत्या करण्यात यशस्वी होणाऱ्यात पुरुषांचे प्रमाण जास्त आहे.

प्रती वर्षी सुमारे 10 लाख जण आत्महत्या करतात. आत्महत्या करणाऱ्यात बहुतांश जण मनोरुग्ण असतात. ऍनॉरेक्सिया, टोकाचे नैराश्य, द्विधृवीय भग्नता (bipolar disorder), छिन्न मानसिकता (schizophrenia) व मुख्यत्वे करून व्यक्तिमत्व भग्नता (borderline personality disorder) या मानसिक आजारांचा त्यांच्यात समावेश होऊ शकतो. त्याचप्रमाणे इतर प्रकारचे क्रॉनिक रुग्णसुद्धा आत्महत्येच्या विचारात असतात. अवसादावस्था (depression) व टोकाचे नैराश्य आत्महत्या करण्यास प्रवृत्त करू शकतात. प्रती 40 सेकंदाला एक जण आत्महत्या करून मृत्युमुखी पडतो. कुठल्या प्रकारच्या रुग्णामध्ये हा धोका जास्त आहे हेच मानसतज्ञांना समजून घ्यायचे असते. परंतु उपलब्ध आकडेवारीतून ते स्पष्ट होत नाही. फक्त काही जणच आत्महत्येचा धोका पत्करतात व इतर हा मार्ग का निवडत नाहीत?

2005 साली अमेरिकन मानसतज्ञ, थॉमस जॉयनर याने याचा उत्तर शोधण्याचा प्रयत्न करत होता. त्याच्या वडिलानी आत्महत्या केली होती म्हणून त्याला याविषयी जास्त कुतूहल होते. आत्महत्या करणाऱ्यांचा वयोगट

व त्या गटातील समान गुणविशेष यांच्या अभ्यासावरून तो काही निष्कर्षाप्रत पोहोचला. त्याच्या मते आत्महत्या करणारे विषण्णता व नैराश्य असे दोन निकष पूर्ण करतात. त्यातून त्यांना त्वरितपणे मरून जावेसे वाटत असते व याबद्दल ते अत्यंत गंभीरपणे विचार करू लागतात. सामान्यपणे एकाकी, एकलकोंडे आयुष्य जगणारे, दुसऱ्यांना आपले ओझे तर होत नाही ना किंवा आपल्या जवळचे कुणीही नाही या भावनेने त्रस्त झालेले आत्महत्येचा मार्ग स्वीकारतात.

दुसरे म्हणजे स्वतःवर मृत्यु ओढून घेण्यात ते यशस्वी होतात. हे विधान जरी अती सामान्य वाटत असले तरी काही जण आत्महत्या करतात व काही करत नाहीत या प्रश्नाचे गुपित या विधानात आहे असे जॉयनरला वाटते. कारण आत्महत्येचा विचार मनात आला तरी आत्महत्या करण्यात अयशस्वी झालेल्यांची आकडेवारीच मुळात उपलब्ध नाही. कितीही गंभीरपणे विचार करून मरावेसे वाटत असले तरी प्रत्यक्ष कृती तेवढी सोपी नसते. त्याचबरोबर माणसातील self preservation ही एक जबरदस्त सहज प्रवृत्ती असल्यामुळे प्रत्यक्ष कृतीत थोडीशी अडचण आली तरी माणूस त्या कृतीतून माघार घेतो व आपण त्या गावचे नाही असे सोंग करतो. self preservation चे इन्स्टिंक्ट आत्महत्येचा प्रयत्न हाणून पाडते. त्यामुळे आत्महत्येची प्रत्यक्ष कृती सामान्यपणे फार अवघड प्रक्रिया असते.

self preservationच्या इन्स्टिंक्टला मात करून कृती करण्यासाठी दोन मार्ग उपलब्ध आहेत. एक म्हणजे त्यातील सर्व बारीक सारीक तपशीलाकडे लक्ष ठेऊन काम तडीपार नेणे. सामान्यपणे पहिला प्रयत्न अयशस्वी होतो. अडचणी येतात. काही वेळा दुखापत होऊ शकते वा घेतलेल्या विषारी पदार्थाचा डोज पुरेसा नसतो. अनेक प्रयत्नानंतरच हा दुर्दैवी अपघात यशस्वी होतो. प्रती 20 अयशस्वी प्रयत्नामागे एक यशस्वी आत्महत्या असते असे जाणकारांचे अंदाज आहे.

आत्महत्येच्या प्रयत्नात मृत्युची भीती वा त्या क्षणी होत असलेल्या वेदनांची जाणीव नसणे हाही भाग असू शकतो. मृत्युला जवळून पाहणारे पोलीस वा सैनिक आत्महत्या करून जीवन संपवण्यास कधीच घाबरत नाहीत. कदाचित आत्महत्या करणाऱ्यांच्यात त्यांची संख्या जास्त असावी. त्याचप्रमाणे डॉक्टर्संना त्याच्या वैद्यकीय व्यवसायात मृत्युचे दर्शन दिननित्य घडत असल्यामुळे त्यांनाही त्याचे काहीही वाटत नसावे. जनसामान्यापेक्षा डॉक्टर्समध्ये आत्महत्येचे प्रमाण जास्त आहे हे नाकारता येत नाही. जॉयनरच्या मते त्यांच्यातील कणखरपणाच त्यांना आत्महत्या करण्यास भाग पाडत असावे. त्याचप्रमाणे ऍनोरेक्सियाच्या रुग्णातसुद्धा अशाच प्रकारचा कणखरपणा आढळतो. या दोन्ही नीरिक्षणामध्ये काही संबंध असेल का यावरही त्यानी अभ्यास केला.

2006 सालच्या एका अभ्यास शिबिरात जिल होल्म डेनोमा आणि व ट्रेसी विट्टे हे दोन विद्यार्थी जॉयनरचे भाषण ऐकत होते. विट्टेच्या नीरिक्षणानुसार ऍनोरेक्सिया रुग्णांच्या वाढत्या आत्महत्येची दोन कारण असू शकतील. इतर मनोरुग्ण व ऍनोरेक्सियात्रस्त यांच्यातील आत्महत्येला सामोरे जाण्याचे प्रमाण कमी जास्तपणे सारखे असले तरी ऍनोरेक्सियात्रस्तांची शारीरिक स्थिती अगदीच कमजोर असल्यामुळे त्यांच्या आत्महत्येचे प्रयत्न यशस्वी ठरत असावेत. किंवा ऍनोरेक्सियामुळे होणाऱ्या वेदना आत्महत्येच्या प्रयत्नातील वेदनेपेक्षा जास्त भयंकर असल्यामुळे वेदनेतून सुटका होण्यासाठी आत्महत्येच्या प्रयत्नात थोडीसुद्धा चूक राहू नये याची काळजी घेतली जात असावी.

जॉयनरच्या मते दुसरे स्पष्टीकरण जास्त योग्य होते. याची चाचणी घेण्याचे त्या दोन विद्यार्थ्यांनी ठरविले. Randomly निवडलेल्या काही आत्महत्येची प्रकरणं त्यानी तपासली व त्यातून नेमके काय होत असावे याचा अंदाज घेतला. आत्महत्येत यश व ऍनोरेक्सियात्रस्तांची शारीरिक आरोग्य यांचा तसा काही संबंध नव्हता. आत्महत्येत यशस्वी व्हावे यासाठी यातील तिघे चालत्या

रेल्वेखाली जीव गमावलेले असतात. एकाने जास्त प्रमाणात झोपेच्या गोळ्या घेऊन जगाचा निरोप घेतला होता. एकीने बंद खोलीत गॅसला आग लावून जीवनाची इतिश्री केली होती. अजून एकाने फिनेलसदृश कीटनाशक पिऊन प्राण सोडले होते. या 9 केसेसचा अभ्यास पुरेसा नसला तरी आत्महत्येसाठी केलेल्या प्रयत्नांची कल्पना येऊ शकते.

ॲनोरेक्सियाबद्दलचे हे निष्कर्ष जॉयनरच्या गृहितकाला पूरक आहेत असे वाटू लागते. ॲनोरेक्सियाचे रुग्ण सामान्यपणे लोकांच्यात मिसळणे टाळतात. कारण लोकांच्यात मिसळल्यामुळे काही खाण्यापिण्याचा आग्रह झाल्यास त्याला नाकारणे वा तुसडेपणाने वागणे बरे दिसत नाही. याच कारणामुळे ते कुठल्याही चित्रपटांला (जेथे पॉपकॉर्न खाण्याची तीव्र इच्छा होण्याची शक्यता असते) वा मित्रांच्या घरी जाणे टाळत असावेत. हा एकलकोंडेपणाच त्यांना आत्महत्या करण्यास उद्युक्त करत असावा. एका प्रकारचे वादळच त्यांच्या मनात भोंबावत असते. त्याचबरोबर हे रुग्ण त्यांच्या नातेवाईकांना मित्रमैत्रीणींना ओझे वाटू लागतात. मुलांच्यावरील ॲनोरेक्सियाचे उपचार प्रसंगी पालकांच्या जीवावर बेततात. कारण दिवसाचे 24 तास पाळत ठेवणे गरजेचे ठरते.

महत्वाचे म्हणजे ॲनोरेक्सियामुळे अतीव वेदनेची सवय होऊ लागते. जेवण न करणे, भुकेकंगाल राहणे, उपवास करणे यामुळे पोटदुखी, डोकेदुखीचे प्रमाण यांच्यात जास्त असते. ऑक्सिओपोरोसिससुद्धा या रुग्णात सर्रासपणे आढळतो. ढिसूळ हाडामुळे फ्रॅक्चर होण्याची शक्यता जास्त असते.छातीत दुखणे वा हृदयाघात या गोष्टीही होऊ शकतात.

जॉयनर आणि विट्टेच्या अभ्यासामुळे या आजाराच्या रुग्णांची खोलात जाऊन चाचणी घेत आत्महत्येकडे ज्यांचा कल आहे हे शोधता येईल. यासाठी त्यांच्या मनाचा ठाव घेऊ शकणारी चाचणी हवी. त्याच प्रमाणे आत्महत्येला उत्तेजन करणाऱ्या गोष्टीपासून – धोकादायक हत्यारं, विषारी औषधं इत्यादींची सहज उपलब्धता – जितके दूर ठेवता येईल तेवढे प्रयत्न करणे आवश्यक आहे.

1965 नंतरच्या दशकात आत्महत्येचे प्रमाण 60 टक्क्यानी वाढला आहे, असे तज्ज्ञांचे मत आहे. जरी सर्व गोष्टी जॉयनरच्या गृहितकाकडे बोट दाखवत असले तरी

त्याच्या मते आत्महत्येच्या संबंधी अजूनही फार मोठ्या प्रमाणात संशोधन होण्याची गरज आहे. ही फक्त सुरुवात आहे व अजूनही पद्धतशीरपणे अभ्यास होण्याची आवश्यकता आहे.

आत्महत्या का करतात, ज्यांच्यामध्ये हा धोका जास्त आहे व यातून बाहेर पडण्यासाठी काही नवीन मार्ग असू शकतील का याचाही विचार होणे गरजेचे आहे. दीर्घ काळचे मानसोपचार थोड्या फार प्रमाणात भयगंड दूर करून आत्महत्येपासून परावृत्त करणे शक्य होईल परंतु जोपर्यंत लोकामध्ये वेदनेची जाणीव होत नाही, जोपर्यंत त्यांना एकलकोंडेपणाने त्रस्त असतात वा इतरानां त्यांचे ओझे वाटत असते तोपर्यंत आत्महत्येची फक्त चर्चा होत राहील, हाती काही लागणार नाही.



# नेटिझन्स इतक्या उर्मटपणाने का वागतात?

संगणक (यात संगणकाशी संबंधित मोबाइल फोन, इंटरनेट, लॅपटॉप, वाय फाय, नेटबँकिंग, मोबाइल बँकिंग व इतर सर्व माहिती तंत्रज्ञान सुविधांचा समावेश आहे.) माणसांना चांगली माणसं बनण्यासाठी मदत करतात, हे संगणक क्षेत्रातील एका तज्ञाचे विधान आहे. परंतु निदान ब्लॉगोस्फेरमधील अनुभवावरून तरी नेटवरील माणसं उदात्त, शहाणे, संवेदनशील झाले आहेत, याबद्दल शंका घ्यावीशी वाटते. आपण कल्पनाही करू शकणार नाही एवढ्या मोठ्या प्रमाणात संगणक आपल्या आयुष्याला व्यापलेले आहे. संगणक निरक्षरता हद्दपार होत आहे. नेट आता प्रत्येकाच्या आयुष्याचा अविभाज्य भाग बनत आहे. तरीसुद्धा नेटवर वावरणाऱ्यांसाठी काही नीती - नियम, आचारसंहिता वा स्वनियंत्रण असे काहीही नसल्यासारखे नेटिझन्सचे वर्तन असते.

नेटवरील माहिती संकलन व होत असलेले विनिमय यांचे विश्लेषण केल्यास 16.8 कोटी डीव्हीडी भरतील एवढ्या माहितीचे देवाण घेवाण एका दिवसात होत आहे. प्रती दिवशी 29400 कोटी ई मेल्स पाठवल्या जात असतात. रोज 20 लाख ब्लॉगपोस्टवर मजकूर चिटकवला जात असतो. या ब्लॉगपोस्टवरील मजकुरांची मुद्रित प्रत काढल्यास 60- 64 पानाच्या साप्ताहिकाला पुढील 770 वर्षे पुरेल एवढा मजकूर उपलब्ध होऊ शकेल. 17.2 कोटी नेटिझन्स फेसबुकला भेट देतात. यासाठी 470 कोटी मिनिटं खर्ची घातल्या जातात. रोज 25 कोटी फोटो अपलोड होतात. या अपलोड झालेल्या फोटोंचे प्रिंट्स काढून एकावर एक ठेवल्यास 80 एफेल टॉवर्स इतकी उंची होईल. नेटवरून रोज 2.2 कोटी तास जुने चित्रपट व सिरियल्स बघण्यासाठी खर्ची घातला जातो. रोज 864000 तासाचे व्हिडिओ यूट्यूबवर अपलोड केल्या जातात. एकट्यानेच रोज, 24 तास, हे सर्व बघायचे ठरविल्यास 98 वर्षाचा काळ सहजपणे निघून जाईल. रोज 1.87 कोटी तास संगीत ऐकले

जाते. प्रती दिवशी 1288 अप्लिकेशन्स अपलोड होतात व 3.5 कोटी अप्लिकेशन्स डाउनलोड होतात.

इतक्या मोठ्या प्रमाणात ब्लॉगोस्फेर व इतर गोष्टी आपल्या जीवनाचा ताबा घेत असल्यामुळे आपण सर्व संगणक, इंटरनेट व इतर माहिती तंत्रज्ञानाच्या सोई - सुविधांची गुलामी करत आहोत की काय असे वाटू लागले आहे. सिटीझन्सचे रूपांतर नेटीझन्समध्ये झपाट्याने होत आहे. यानंतरच्या पुढच्या पिढीच्या दिवसाची विभागणी झोप व ऑनलाइन अशीच करावी लागणार आहे. झोपेतून उठल्या उठल्या मोबाइल कानाशी व लॅपटॉप समोर अशा अवस्थेतून ही पिढी जाणार आहे. गंमत अशी आहे की कुणीही उठावे व लाइक/डिसलाइक वर क्लिक करत रहावे अशी स्थिती आता आहे. विकिपिडियातील पानांचाही यातून सुटका नाही. हातात माउसचे बटन आहे, व नेट कनेक्ट आहे एवढ्याच भांडवलावर या गोष्टी सर्रासपणे होत आहेत. त्याचप्रमाणे सोशल नेटवर्कसुद्धा नेटिझन्सच्या मनमानीपणातून सुटलेले नाही

ब्लॉग, फोरम, वा फेसबुक (वा तत्सम ट्वीटर, इन्स्टाग्राम, टिक् टॉक) वरील प्रतिसाद/प्रतिक्रिया वाचत असताना चर्चेसाठीच्या धाग्याबद्दल (उगीचच्या उगीच) उलट - सुलट, टोकाचे व काही वेळा कुत्सित मत प्रदर्शन करत असल्याचे प्रमाण वाढत आहे. मराठी नेटवर जरी हे काही प्रमाणात कमी वाटत असले तरी इंग्रजीतील - विशेषकरून राजकीय, आर्थिक व सामाजिक विषयावरील - धाग्यांच्या संदर्भात नेटिझन्सचा भावनोद्रेक प्रकर्षाने जाणवतो. आपण केलेली विधाने, आपण लिहिलेले लेख लोकांनी जसेच्या तसे स्वीकारावे, त्याचे संदर्भ, अधिक माहिती विचारू नये असा एक नवा प्रवाह दिसतो. विशेषतः जेथे भावनांना हात घातला जातो (ज्योतिष, वैद्यक, अस्मिता, इतिहास) तेथे हा प्रवाह अधिक दिसतो. क्षुल्लक विधानावरून तावातावाने भांडत असल्याचे चित्र बघायला मिळते. काही वेळा शिवराळ भाषा वापरली जाते. काहींना साधे लिहितानाही शिव्याची पेरणी करण्याचा सोस असतो. त्यांना साधे लिहिता येत नाही. साधे व सरळ लिहिल्यास

आपल्याकडे कोणाचे लक्ष जाणार नाही, असा त्यांचा समज असतो. व अशा जल्पकांच्या (ट्रॉल्स- (trolls) संख्येत मोठ्या प्रमाणात भर पडत आहे

परंतु मानसतज्ञांच्या दृष्टीने नेटिझन्सची ही वर्तणूक सवयीत बदलल्यास सामाजिक व संबंधित व्यक्तीच्या मानसिक आरोग्यास इजा पोचू शकते. म्हणूनच वेळीच जागे होऊन अशा गोष्टीवर अंकुश ठेवण्यासाठी काही निर्बंध घालण्याचे आग्रह ते धरू लागले आहेत.

मुळात अशा नेटिझन्सच्या बहुतेक प्रतिक्रिया केवळ आक्रमक या सदरात मोडतात. त्यातून काहीही अर्थबोध होत नाही. आपले म्हणणे कुणीच ऐकत (वाचत) नाही म्हणून ते वैतागलेले असतात. मानसतज्ञांच्या मते आपल्या प्रतिक्रिया वा प्रतिसाद यात इतकी भावनिक गुंतवणूक करणेसुद्धा हानिकारक ठरणार आहे. गंमत अशी आहे की जेव्हा नेटिझन्स थंड डोक्याने विचार करू लागतात तेव्हा हे सर्व चुकीचे होते हेही त्यांना कळत असते.

**तरीसुद्धा ही मंडळी असे का वागतात?**

अनेक घटक एकाच ठिकाणी जमत असल्यामुळे उर्मटपणा, उद्धटपणा, आक्रमकता इत्यादींचा विस्फोट होत असावा असे तज्ञाना वाटत आहे. मुळात प्रतिसाद देणारे व धागाकर्ते बिनचेहऱ्याचे, मुखवटे चढवलेले व एकमेकांना ओळखत नसल्यामुळे चिखलफेक करण्यात कुणालाही संकोच वाटत नाही. संताप व्यक्त करणारे कुठे तरी दूर असण्याची शक्यता असल्यामुळे आपले कुणीही वाकडे करणार नाही, आपल्याला शारीरिक इजा होणार नाही, याची त्यांना खात्री असते. समोरासमोर असल्यास अशा प्रकारची टीका टिप्पणी ते कधीच करणार नाहीत. याशिवाय प्रत्यक्ष बोलण्यापेक्षा काही तरी लिहिणे अगदी सोपे असते. मुळात ब्लॉग, फोरम, ई - मेल अकौंट, लॉगइन, पासवर्ड इत्यादीसाठी आर्थिक वा तांत्रिक अशी कुठलीही अडचण नसल्यामुळे जाता जाता पिंक मारणाऱ्यांची संख्या वाढत आहे.

प्रतिसाद लिहिणाऱ्यांकडे भरपूर वेळ असणे हेसुद्धा एक कारण असावे. व एका प्रकारे ते त्यांचे स्वगत भाषणच असते. या स्वगत भाषणात कुठलीही

टोकाची भूमिका घेतली तरी त्यांना जबाबदार धरता येत नाही. माणसं प्रत्यक्ष संवाद साधत असताना एकमेकांच्या देहबोलीनुसार आक्रमकता कमी जास्त करतात. कुठे थांबावे, कुठे रेटावे, याची कल्पना दोघांनाही असते. राग आला तरी ते व्यक्त करण्यात थोडीशी सुसंकृतता त्यात असते. त्यामुळे रागाच्या भरात दोन शब्द जास्त उच्चारले तरी काही वेळातच राग शांत होऊन संवाद मूळपदावर येऊ शकतो.

याचबरोबर आपण काही तरी भव्य दिव्य करत आहोत अशा पावित्र्याने नेटवरील प्रतिक्रिया लिहिली जात असते. मुळात हा पवित्रा तद्दन खोटा, अविचारी व अविवेकी असतो. दुसरे म्हणजे सुरक्षित ठिकाणी बसून काहीही खरडायला फार मोठे बुद्धीकौशल्यही लागत नाही. उपदेशाचे डोज पाजणे, सल्ला देत राहणे, प्रसंगाची चिरफाड करणे, मूळ मुद्दा सोडून कुठल्यातरी क्षुल्लक गोष्टीवर भाष्य करणे यातच ते स्वत:ला धन्य समजतात. त्यामुळे धाग्यावरील चर्चा भरकटत जाते व हाती काही लागत नाही.

अजून एका तज्ञांच्या मते नेटिझन्सच्या या उर्मटवृत्तीला काही अंशी इलेक्ट्रॉनिक माध्यम जबाबदार आहे. टीव्हीसारख्या माध्यमावरील चर्चेत भाग घेणाऱ्यासांठी आपण कसे बोलावे, कसे वागावे याबद्दल कुठलिही आचारसंहिता नाही. चर्चेपूर्वी कुणी तरी जबाबदार व्यक्ती काही ब्रीफिंग देत असेल की नाही याची कल्पना नाही. चर्चेच्या दरम्यान टोमणे मारणे, एकमेकाचे उखाळे पाखाळे काढणे, नको त्या गोष्टी उकरून काढणे, विषयाशी धरून न बोलणे इत्यादी गोष्टी न्यूज व इतर चॅनेल्सवर बघून सवय झालेले नेटिझन्स जेव्हा संधी मिळते तेव्हा झोडपून काढण्याच्या पावित्र्यात असतात. माध्यमं जर जबाबदारीने, संयमितपणे चर्चेचे संयोजन करत असते तर कदाचित नेटिझन्स एवढे आक्रमक झाले नसते.

एक मात्र खरे की इतर कुठल्याही माध्यमापेक्षा इंटरनेटचा वापर यानंतर मोठ्या प्रमाणात होणार आहे, हे मात्र नक्की. त्यामुळे नेटिझन्सच्या विधानांना गंभीरपणे घेण्याकडे कल वाढत जाणार. अशा वेळी काहीतरी पोरकट विधान

करून स्वत:चे हसे करून घेण्यात हशील नाही, हे आता नेटिझन्सना कुणी तरी सांगण्याची गरज आहे. नेटवरील चर्चा सुरळितपणे चालावी ही संयोजकांची जबाबदारी असते. चर्चेतून काही तरी निष्पन्न होणे अपेक्षित असते. काही नवीन माहिती, माहितीत भर, नवीन मुद्दे, यामुळे चर्चा रंगू शकते. येथे मात्र त्याचीच उणीव भासत आहे. दुसऱ्या नेटिझन्सचे काहीही ऐकायचे नाही हाच अजेंडा पुढे ठेऊन सर्व जण आक्रमकपणे चर्चेत भाग घेत असतात. आक्रमकतेने एखादा चांगला मुद्दा मांडण्याचा प्रयत्न केल्यास वाचकांचे लक्ष मुद्याकडे न जाता आक्रमकतेकडेच जास्त जाते. त्यामुळे जे काही पटवून द्यायचे असते ते बाजूला राहते. व चर्चा भलत्याच ठिकाणी वाहवत जाते.

नेटिझन्सनी टीव्हीसारख्या माध्यमाचा कित्ता गिरवला पाहिजे अशी काही अट नाही. संयमितपणे व विचारपूर्वक केलेले भाष्य चर्चा पुढे नेण्यास मदत करत असते. त्यामुळे ब्लॉग्स व फोरमच्या चालकानी वेळीच दखल घेऊन अशा उर्मट नेटिझन्सना दूर ठेवण्यासाठी काही तंत्रज्ञान विकसित करण्याची वा नियमाची चौकट तयार करण्याची गरज भासत आहे



# रॅट रेसचा विळखा

तुम्हाला आपण फार असहाय आहोत, अगतिक आहोत असे वाटते का? कुणीही आपली दखल घेत नाही अशी भावना अधूनमधून येत असते का? या जगात आपला निभाव लागणार नाही हा विचार येत असतो का? अस्तित्वासाठीची स्पर्धा, स्पर्धेतून स्वार्थ, भीती, व इतरांचा दुस्वास इत्यादीमुळे आपण मानसिक स्वास्थ्य हरवून बसलो आहोत असे वाटत असते का?

असे काही वाटून घेणारे तुम्ही एकटेच नाही. हे जे वाटणे आहे ते मानसिक अनारोग्याचे लक्षण आहे असेही वाटून घेण्याचे कारण नाही. आताची बदलत असलेली परिस्थितीच या मानसिकतेचे, असमाधानीवृत्तीचे प्रमुख कारण असावे असे काही तज्ञांचे मत आहे. जागतिकीकरणाच्या रेट्यातील नवउदार भांडवलशाही (neo-liberal capitalism) व त्यातून होत असलेले बाजारीकरण तुम्हा – आम्हाला हद्दपार करण्याच्या बेतात आहे. या गोंधळलेल्या परिस्थितीतून मार्ग शोधणे – किंवा निदान त्याबद्दल विचार करणे – यात गैर काही नाही. स्वतःची आयडेंटिटी जोपासण्याचे प्रयत्न करणे यातही काही चूक नाही.

मुळात आपण सामाजिक प्राणी आहोत. पिढ्यान पिढ्या जोपासलेल्या अनेक गोष्टीतून व जीवनमूल्यामधून आपल्याला एक आयडेंटिटी प्राप्त झालेली असते. समाज आपल्या आयडेंटिटीला आकार देत असतो. आपण normal आहोत की abnormal हे समाज ठरवत असतो. तरीसुद्धा समाजाबरोबर जावे की त्याच्याशी फटकून वागावे या निवडीचे स्वातंत्र्य आपल्याला असते.

यापूर्वीच्या समाजातील बदल फारच संथगतीचे होत गेल्यामुळे काही अपवाद वगळता मागच्या पिढीतल्यांना स्वतःच्या आयडेंटिटी-बद्दल फारसे विचार करण्याची गरज पडली नसेल. परंतु गेल्या 30 - 40 वर्षात समाज स्थितीत फार मोठा बदल झाल्यामुळे आपण नेमके कुठे आहोत हेच कळेनासे झाले आहे.

आजच्या समाजाच्या सर्व व्यवहारावर बाजारीकरणाची गडद सावली आहे. बाजारीकरणाच्या आक्रमकतेमुळे एकामागून एक असे सर्व क्षेत्र भांडवली व्यवस्थेत बंदिस्त होत आहेत. बाजारीकरणातच सामाजिक, आर्थिक व राजकीय समस्यांची उत्तरं दडलेली आहेत असे त्याच्या पुरस्कर्त्यांची खात्री आहे. राज्यकर्ते जितके नियंत्रण कमी करू शकतील, जितके कर कमी करू शकतील, तितक्या प्रमाणात समाजविकास होत राहील असे त्यांना वाटत आहे. सार्वजनिक सेवांचे खाजगीकरण व्हावे, सार्वजनिक हितासाठीच्या कामांना कात्री लावावी, उद्योगव्यवस्थेला पूर्णपणे नियंत्रण मुक्त करावे, रोकडसुलभता असावी, भांडवलाच्या अंतरराष्ट्रीय हस्तांतरणाला नियमांच्या चौकटीतून मुक्त करावे ही मानसिकता व त्याकडे वाटचाल प्रबळ होत आहे. मार्गारेट थॅचर व रोनाल्ड रीगन यांच्या काळापासून हे लोण पसरत असून कुठल्याना कुठल्या स्वरूपात ती जगभर पाय पसरत आहे. या बाजारीकरणाला अपवाद असलेला एकही देश या पृथ्वीवर नसावे अशी आताची स्थिती आहे.

खरे पाहता बाजारीकरणाचा डोलारा प्राचीन ग्रीक संस्कृतीच्या मूल्ये जन्मजात असतात या तत्वावर व मानवजात स्वार्थी व अप्पलपोटी असणार या क्रिश्चियन गृहितकावर उभा आहे. व आतापर्यंतची समाजव्यवस्था या गोष्टींचे नियंत्रण करत असल्यामुळे त्यापासून होणाऱ्या दुष्परिणामांची झळ सामान्यापर्यंत पोचली नव्हती. आता मात्र या (अव)गुणांचे उदो उदो होत आहे. नियंत्रणाऐवजी प्रोत्साहन मिळत आहे. स्वयंप्रेरित अनिर्बंध स्पर्धेतूनच व भांडवली नफेखोरीतूनच नवीन शोध, इनोव्हेशन्स, आर्थिक वाढ, होत होत शेवटी मानवाचे कल्याण होणार असा आत्मविश्वास व्यक्त केला जात आहे.

`लोक आपल्या अवस्थेला स्वतःच कारणीभूत आहेत. गरीबीत रहायचं की नाही हे त्यांनीच ठरवायचं आहे. वर यायचं असेल तर त्यांनी शासनाच्या आधाराची अपेक्षा करता कामा नये.'

बाजारीकरणात अमाप भांडवलाबरोबर मेरिटचेही फार मोठ्या प्रमाणात कौतुक

केले जात असते. बौद्धिक क्षमता, परिश्रमातील सातत्य, व इनोव्हेटिव्ह माइंड ज्याच्यांकडे आहे त्यानाच कुठल्याही स्पर्धेतील यशाची किल्ली मिळू शकते, याबद्दल कुणाचेही दुमत नसते. त्याचप्रमाणे या गोष्टी असणाऱ्यांना वाटेल ती किंमत देऊन विकत घेता येते याचीसुद्धा सोय येथे होत असते. याचा परिणाम जीवघेण्या स्पर्धेत होत आहे व बहुतेकांना या रॅट रेस मध्ये सहभागी व्हायचे आहे. त्यामुळे ज्यांना संधी मिळते वा जे संधीच्या शोधात आहेत त्यांचेच हे जग आहे. आणि इतरांना येथे स्थान नाही.

परंतु वास्तव फार वेगळे आहे. ही रॅट रेस सर्वांना समान संधी देऊ शकत नाही. काही (मोजके चाणाक्ष) स्मार्ट अगोदरच या शर्यतीच्या विनिंग लाइनजवळ उभे आहेत. व शिट्टी वाजवली की तेच सर्वांच्या अगोदर पोचतात व शर्यत जिंकतात. बाजारावरील नियंत्रण दूर करण्याच्या प्रक्रियेला सुरुवात झाली तेंव्हापासूनच समान संधी नाकारली गेली हे विसरता येत नाही. उत्कर्षाच्या शिडीच्या खालच्या पायरीपाशीच बहुतेक जण घुटमळत आहेत, एकमेकाचे पाय ओढत आहेत. व यातूनही काहींना वरच्या पायरीवर जाणे शक्य झाले तरी त्यांना वर येऊ न देण्यासाठी काही अडथळे उभे करणारे ठिकठिकाणी आहेत. रशियातील कम्युनिस्ट राजवट संपल्यानंतरसुद्धा त्या देशातील सर्वांना समान संधी उपलब्ध नव्हती. कारण काही मूठभर लोकांच्या हातात अमाप संपत्ती एकवटली होती व त्यांचे केजीबीशी लागेबांधे होते. व हेच मूठभर लोक बाजारीकरणाचे गोडवे गात होते. खरे पाहता उदारीकरणाच्या सिद्धांतानुसार विलक्षण बुद्धीमत्ता, सर्जनशीलता किंवा अविश्रांत परिश्रम असलेल्यांच्याकडेच संपत्ती हवी. परंतु यापैकी कुठलेही गुणविशेष या श्रीमंतांच्या जवळ नव्हते.

बुद्धीमत्ता वा परिश्रमांची फळंसुद्धा फार काळ टिकत नाहीत. पहिल्या पिढीतील उद्योजकांनी स्वतःच्या हिकमतीवर व इनोवेशनच्या जोरावर उद्योगधंदे उभारून संपत्ती गोळा केली असली तरी नंतरच्या कालखंडात स्पर्धेची झळ लागणार नाही याची शाश्वती देता येत नाही. इनोवेशन्स सतत

होत असतात. त्यामुळे नवीन उद्योग धंदे उदयास येत काही उद्योग धंद्याना कालबाह्य ठरवतात. त्यामुळे बापाच्या पैशाच्या जोरावर उद्योजकांची पुढली पिढी टिकून राहील याची खात्री देता येत नाही. कुठल्याही कालखंडात नाविन्यतेला, त्याच्या उपयुक्ततेला अग्रक्रम दिला जातो. अमेरिका वा ब्रिटन सारख्या प्रगत भांडवली देशातसुद्धा याचा प्रत्यय येत असतो.

नवउदार भांडवलशाहीच्या पुरस्कर्त्यांनी आणि त्यांनी पाळलेल्या तथाकथित विचारवंत व विशेषज्ञांनी मेरिटच्या जोरावर समाजहित साधण्यासाठी, सर्वांना समान पातळीवर आणण्यासाठी व समान संधीसाठी प्रयत्न करावेत. केवळ पैशाच्या जोरावर आपापल्या मुलाबाळांना अत्याधुनिक शिक्षण देवून आपण किती इनोवेटिव्ह आहोत असे शेखी मिरवण्यात हशील नाही. परंतु हे विधान त्यांना अजिबात पटण्यासारखे नाही. म्हणूनच सर्व उद्योगधंद्यांना भाडोत्रीपणाचे स्वरूप येत आहे.

या गोष्टींना एक वेळ दुर्लक्ष केले तरी बाजारीकरणाच्या अपयशाला व्यक्तीच्या नाकर्तेपणाला जबाबदार धरले जाते. श्रीमंतांचे सगळे बरोबर व गरीबांचेच काही तरी चुकते, आर्थिक व नैतिक दृष्ट्या त्यांच्यातच उणीवा असल्या मुळे प्रगती रखडत आहे, असे दोषारोप गरीबावर केले जातात. त्यांच्या दृष्टीने गरीब जनता या आधुनिक समाजाला लागलेली कीड आहे, ते सर्व बांडगुळं आहेत, ही मानसिकता जोपासली जात आहे.

बाजारीकरण माणसांना स्वायत्तता व स्वातंत्र्य देत त्यातून मानवजातीचे कल्याण होत राहणार, अशी स्वप्नं दाखवत होत होती. परंतु त्या अपेक्षा फोल ठरत आहेत. त्याऐवजी माणसांना कस्पटासमान लेखण्यातच धन्यता मानले जात आहे. त्यामुळे संवेदनशील माणूस बाजूला फेकला जात आहे. एकाकी ठरत आहे. कामाच्या ठिकाणी असेसमेंट, मॉनिटरिंग, मेजरिंग इत्यादींचा अतिरेक होत असून नियोजनाची सर्व सूत्रे लांब असलेल्या कुठल्यातरी अनामधेयाकडून हलत असल्यामुळे रॅट रेसमध्ये यशस्वी होत असलेल्यांना सर्व सोई-सुविधा, सवलती, उत्तेजनार्थ बक्षीस, पदोन्नती व मागे राहिलेल्यांना

शिक्षा, दंड, पदावनती किंवा प्रसंगी पदच्युती यांना सामोरे जावे लागत आहे. या प्रकारच्या धोरणामुळे कामाच्या ठिकाणी भीतीयुक्त वातावरणाची किंवा मॅनिप्युलेट करत पुढे पुढे राहण्यासाठीच्या वृत्तीची वाढ होत आहे. स्वायत्तता, उद्योजकता, नाविन्यतेचा शोध घेण्याची आकांक्षा, निष्ठा या गोष्टी हळू हळू नष्ट होत असून त्याऐवजी औदासीन्य, भीती, मत्सर, स्वार्थीपणा इत्यादी प्रकारच्या भावना रुजत आहेत. व्यवस्थापनाच्या शिस्तीच्या बडग्यामुळे वरिष्ठांना खुश ठेवणे, त्यांना आवडतील तसेच अहवाल, खोटे खोटे आकडेवारी सादर करणे यावर भर दिला जात आहे. अशा वेळी रशियाच्या भ्रष्ट राजवटीत सेंट्रल ब्युरोच्या अंदाजाप्रमाणे आकडे कमी जास्त केलेल्यांची आठवण येते.

हेच पाशवी बळ बेरोजगारांनासुद्धा छळत आहे. बेरोजगारीच्या तापदायक व्यथेबरोबरच यांना या वेगवेगळ्या पातळीवरील छक्के पंजे समजून घेण्यातही वेळ व श्रम खर्ची घालावे लागत आहे.

मुळात नवउदारभांडवलवादातच comparison, evaluation व quantification अंतर्भूत आहेत. त्यामुळे कागदावर जरी आपल्याला हवे ते निर्णय घेण्याचे स्वातंत्र्य असले तरी प्रत्यक्षात आपल्याकडे काहीही नाही. परिस्थिती आपल्याला निर्वीर्य व निःशक्त बनवत आहे. सर्व राजकीय पक्ष या प्रक्रियेत सामील झालेले आहेत. त्यामुळे बेरोजगारांना राजकीय पाठबळही मिळेनासे झाले आहे. स्वातंत्र्य आणि स्वायत्तता ऑटोनामीच्या मुखवट्याखाली दबलेले असून बिनचेहऱ्याच्या मनमानी करणाऱ्या नोकरशाहीच्या हातात समाज नियंत्रणाची सूत्रे दिलेली आहेत.

हा बदल व ही विदारक परिस्थितीच वैयक्तिक जीवनात अनेक मनोविकारांना जन्म देत आहे, असे तज्ञांचे मत आहे. स्वतःची हेटाळणी, विषण्णता, व्यक्तिमत्व विकृती, बेशिस्त जीवनशैली इत्यादींना ती जन्म देत आहे. व्यक्तिमत्व विकृतीत चिंता व समाजाविषयी भीती असल्यामुळे इतरांकडे सदोष दृष्टीने बघितले जाते. कारण इतर सर्वजण त्याच्याशी स्पर्धा करणारे किंवा त्याचे मूल्यांकन करणारे आहेत अशी भीती त्यांच्या मनात

असते. त्याच्या दृष्टीने या इतरांना समाजात मान्यता असल्यामुळे आपण किस झाडकी पत्ती हा न्यूनगंड रुजत आहे.

एकलकोंडेपणा आणि विषण्णता यांना हैराण करत आहेत. कामाच्या ठिकाणी त्यांचे स्वत्व पिळवटून टाकले जात आहे. जे शेवटच्या पायरीवर आहेत त्यांना अपराधीपणाने ग्रासले आहे. स्वतःबद्दल सांगण्यासारखे काहीही शिल्लक नसते. यश मिळाले की फुगवून जायचे व न मिळाल्यास स्वतःलाच दोष द्यायचे. गंमत म्हणजे या यशापयशात त्यांचा दूरान्वयानेही काडीचा संबंध नसतो.

जर या जगात तुम्हाला, आपण बाजूला सारले जात आहोत, आपले स्वत्व हरवत आहे, या जगात अयशस्वी ठरत आहोत असे टोचत असल्यास अजूनही तुमच्यात संवेदनशीलता शिल्लक आहे म्हणण्यास वाव आहे. खरे पाहता इतरांनी दुर्लक्ष केलेल्या काही मूल्यांना तुम्ही मानता यातच तुमचा मोठेपणा आहे. त्याचा तुम्हाला अभिमान वाटायला हवा. त्यामुळे आपण गर्वाने ताठमानेने जगण्यालाच जगणे म्हणतात असे जगाला ओरडून सांगू शकतो.



# वैचारिक क्षमतेवर पसरलेली श्रद्धेची गडद छाया

माणूस हा एक विचित्र प्राणी आहे. या प्राण्याला नाविन्याची फार हौस आहे. त्याच्यात सर्जनशीलतेची क्षमता आहे. गुंतागुंतीच्या समस्यांना योग्य उत्तरं शोधण्याची हतोटी आहे. त्यानी केलेल्या तंत्रज्ञानातील अफाट प्रगतीमुळे मानवी जीवन सुसह्य होत चालले आहे. स्वत:च्या आरोग्य स्थितीवर संशोधन करत तो आता जास्तीत जास्त वर्षे जगण्याचा प्रयत्न करत आहे. दुर्धर समजलेल्या रोगांवर औषधोपचार शोधल्यामुळे निरोगी आयुष्य जगणे त्याला आता शक्य होत आहे. परंतु एवढे करूनसुद्धा अजूनही तो अविचारांना, चुकीच्या विचारांना बळी पडतोच आहे.

अनेक प्रसंगी त्याच्या विचारातील, त्यानी घेतलेल्या निर्णयातील विसंगती प्रकर्षाने जाणवू लागतात. या विसंगतींचे मूळ शोधल्यास त्याच्या विचारप्रक्रियेला श्रद्धेची पार्श्वभूमी लाभलेली असल्यामुळे साहजिकच त्याच्या विचारात व घेतलेल्या निर्णयात कमालीची तफावत जाणवते. किंबहुना त्यानी जोपासलेल्या श्रद्धाच त्याचे निर्णय घेतात की काय असे वाटू लागते. जो दृष्टीकोन पुरावा नसतानासुद्धा खरा आहे असा वाटत असतो त्यालाच सामान्यपणे आपण श्रद्धा म्हणतो. माणूस जोपासत असलेल्या श्रद्धा विविध मार्गाने आलेल्या असतात. काहीवेळा तो स्वत:हूनच आकर्षित झालेला असतो. काही श्रद्धा वाड-वडिलांपासून, काही मोठ्या लोकांच्या दबावामुळे, काही लहानांच्या प्रेमाखातर, काही शैक्षणिक, सामाजिक व सांस्कृतिक वातावरणामुळे त्याच्या मनात घर करून बसलेल्या असतात. स्वत:चाच दृष्टीकोन खरा आहे असा समज करून घेत असल्यास, त्यानी घेतलेल्या निर्णयावर जोपासत असलेल्या त्याच्या श्रद्धा फार मोठ्या प्रमाणात परिणाम करू शकतात.

आपण रोज अनेक लहान - मोठे निर्णय घेत असतो, विविध प्रकारचे निर्णय घेत असतो. निर्णय घेत नसल्यास वा निर्णय घेणे टाळत असल्यास आपले जिणे खडतर झाले असते. निर्णय घेताना आपल्या हातून कळत न कळत चुकाही होत असतात. अनेक वेळा कुठेतरी चुकत आहोत हेसुद्धा कळत नाही. नंतर केव्हा तरी चूक उमगल्यास वेळ निघून गेलेली असती. या (घोड) चुका आपले श्रम, वेळ व पैसा वाया घालवत असतात. चुकीच्या निर्णयामुळे आपले आरोग्य धोक्यात येऊ शकते. प्रसंगी जीवावर बेतू शकते. देव - धर्म, तांत्रिक - मांत्रिक, बाबा - बुवा, फलजोतिषी, यांच्या क्षमतेवर आपली श्रद्धा असल्यास आपल्या काका - मामांचे भूत आपल्या मानगुटीवर बसले नाही ना , या विचाराने आपण अस्वस्थ होऊ लागतो. कुंडलीतील मंगळामुळे मन:शांती ढासळू लागते. बुवा - बाबांच्या नादी लागल्यामुळे घरातले वातावरण हळूहळू बिघडू लागते. जडी - बुटी, अंगार - धूप इत्यादींच्या उपचारामुळे आपण आपला जीव धोक्यात घालवतो. नवस - सायास, उपास-तपास, जत्रा - उरुस इत्यादीमुळे जीव हैराण होतो. श्रद्धेच्यापायी सारासार विचार करण्याची कुवतच हरवून बसतो.

आपण चुकीचा विचार का करतो, हा प्रश्न मनात आल्यास आपण खरोखरच मूर्ख तर नाही ना, असे वाटू लागते. सामान्यपणे तसे काही नसते. आपण मोठमोठ्या हुद्यावर असतो. अत्यंत जोखमीची कामं हाताळतो. आपल्या काही निर्णयामुळे हजारो हातांना रोजगार मिळतो, आपल्यामुळे गुंतागुंतीची यंत्रणा वा व्यवस्था विनातक्रार काम करत असते. अनेकांचे जीव वाचतात. तरीसुद्धा काही प्रसंगी आपल्यातील बहुतेकांच्या - डॉक्टर्स, इंजिनियर्स, उद्योगपती, नोकरदार यांच्यासकट शिकलेले सवरलेले व अशिक्षितांच्यासुद्धा - विचार करण्यात, विचार करण्याच्या पद्धतीत काही उणीवा राहिलेल्या जाणवतात. व या उणीवांचे मूळ आपण जोपासत असलेल्या श्रद्धापर्यंत पोचते. श्रद्धेमुळे माहितीचे विकृतीकरण होते. मुळातच आपली पुरावे शोधण्याची व हाती आलेल्या पुराव्यांचे विश्लेषण करण्याची

वाढलेल्या केसामध्ये उवा वा तत्सम रोग फैलावणारी क्रिमीकीटकं घर करून राहत होत्या. सामान्य लोकांना अशा रोगावरील औषधं मिळत नसल्यामुळे (वा ही औषधं न परवडणारे असल्यामुळे) आणि साबणाचा शोधही न झालेला असल्यामुळे डोक्यावरील सर्व केस काढून मुंडण करून घेणे ते पसंत करत होते. सर्वश्रेष्ठ नाइल संस्कृतीतील आरोग्यरक्षणाच्या या उपचारास गुलाम, शेतकरी, गुन्हेगार व मागासलेल्यांना मुकावे लागत होते. त्यामुळे त्यांना दाढी-मिशा व डोक्यावरील वाढलेल्या केसांचे प्रदर्शन करण्यास भाग पाडले जात होते. त्यातूनच त्यांची ओळख संस्कृतीरक्षकांना होत असावी.

केसविरहित अवस्था गाठण्यासाठी इजिप्शियन्स एका प्रकारचे केशनाशक क्रीम वापरत होते. व या क्रीमच्या वापरानंतरही उरलेल्या केसांचे खुंट काढून टाकण्यासाठी एका प्रकारच्या सछिद्र दगडानी अंग घसाघसा घासून केस काढून टाकण्याचे प्रयत्न करत होते.. पुनर्जन्मानंतर वापरण्यास म्हणून मृतांच्या थडग्यात इतर अनेक वस्तुंबरोबर वक्राकार वस्तरासुद्धा संशोधकांना सापडले आहेत.

वाळवंटातील तळपत्या सूर्यकिरणापासून बोडक्या डोक्याचे रक्षण करून घेण्यासाठी इजिप्तचे उच्चभ्रू केसांचा टोप वापरत असत.

कारण मुंडण करून घेतलेल्या अवस्थेत आपला चेहरा दाखविणे हा लोकांना अडचणीत आणणारा किंवा अपमानकारक वाटणारा होता.

त्याचप्रमाणे केसांची खुंट वाढलेल्या चेहऱ्याने फिरणे हे वैयक्तिक आरोग्याकडे दुर्लक्ष करणारे समजले जात होते. तीन तीन दिवस अंगावरचे कपडे न बदलता फिरल्यासारखी ती अवस्था असे त्यांना वाटत असावे. त्यामुळे स्वतःचा न्हावी असणे श्रीमंतीचे लक्षण मानले जात होते. त्या काळी डॉक्टर, महसूल अधिकारी, सैन्याधिकारीसारखे न्हाव्यांना मानाने वागवले जात होते. परंतु दाढी-मिशा वाढवून स्वतःच्या पौरुषत्वाचे प्रदर्शन करणाऱ्या

इजिप्शियनांनासुद्धा भरपूर मान-मरातब मिळत होता. परंतु डोक्यावरील केसाच्या टोपाप्रमाणे चेहऱ्यावर नकली दाढी

वापरण्याकडे त्यांचा कल होता. म्हणूनच फरोह राजघराण्यातील स्त्रियांसकट सर्वांनदाढी असलेले पेंटिंग्स/चित्रलिपी आपल्याला बघायला मिळतात.

इजिप्शियनांचे आरोग्यविषयक कल्पनांचे लोण ग्रीक व रोमपर्यंत पोचले. कदाचित त्यास अलेक्झांडर दि ग्रेटला जबाबदार धरायला हवे. त्यानी तर





त्याच्या सर्व सैनिकांना रोज
गुळगुळीत दाढी करून कवायतीला हजर राहण्याचे फर्मान सोडले होते. त्यामुळे प्रत्यक्ष समोरासमोरील युद्धाच्या

वेळी वैऱ्यांचे नेमके कुठले अवयव पकडावे हा प्रश्न पडला. कारण यापूर्वी वैऱ्याची दाढी घट्ट पकडून त्यास जेरबंद करणे सोपे होते. अलेक्झांडरचे रोज दाढी करून येण्याच्या ऑर्डरमुळे सैनिका-व्यतिरिक्त इतरही

गुळगुळीत दाढी करून लागले. दाढी करण्यास समाजमान्यता मिळू लागली. एवढेच नव्हे तर ती एक फॅशन झाली. त्याची रचनाही बदलली. पितळी वस्तऱ्याऐवजी ताम्र व लोखंडांची वस्तरे वापरण्यात येऊ लागले. बघता बघता इजिप्शियनांचा वक्राकार वस्तरा सरळरेषेचा झाला. व आजही तो सरळरेषेचाच आहे.

चेहऱ्यावर गुळगुळितपणा येण्यासाठी दोन-तीन वेळा वस्तरा चालविल्यानंतर शिल्लक राहिलेल्या दाढीचे खुंट उपटून काढण्यासाठी pumice दगडानी चेहरा घासून घेत होते. त्याचबरोबर विशिष्ट तेल वापरून मालिश करत व त्यावर (perfume) सुगंधी द्रव्याचे फव्वारे सोडत होते.

वस्तऱ्याला धार करण्यासाठी तेलात बुडवलेले कोळीष्टकाचे तंतू व विनेगारपासून तयार केलेल्या मलमचा वापर केला जात होता.

गुळगुळीत दाढी करण्याची सक्ती अलेक्झांडरच्या आदेशावरून झालेली असली व नंतर फॅशन म्हणून आकर्षित झालेली असली तरी काही काळातच एक सामान्य कार्यक्रम म्हणून ती रूढ होऊ लागली. न्हाव्याच्या दुकानाला भेट देणे हा एक नित्याचा कार्यक्रम झाला. तेथे केवळ दाढी सारख्या श्मश्रूकामासाठीच लोक येत नव्हते तर, गप्पा मारण्यासाठी तेथे गोळा होत असत. गावातल्या बातम्यांचे देवाण-घेवाण करत असत. परंतु श्रीमंत मात्र अशा सार्वजनिक ठिकाणी न येता जास्त पैसे देऊन न्हाव्यालाच घरी बोलवत असत. अनेक श्रीमंतांचे खासगी नाभिक असत. जितका जास्त श्रीमंत तितके शरीरावरील केस कमी (अगदी जननेंद्रियाजवळपासच्यासुद्धा)

मध्ययुगीन काळात मात्र या दाढीच्या उत्सवीपणाला ओहोटी लागली. ती लोकप्रिय असली तरी त्यामागे एक वेगळे कारण होते. 1050च्या सुमारास ईस्टर्न ऑर्थोडॉक्स पासून कॅथोलिक चर्च वेगळे झाल्यानंतर पाश्चिमात्य चर्चप्रमुख आपल्या पाद्र्यांना ज्यू व मुस्लिमांच्यापेक्षा वेगळे दिसण्यासाठी दाढी करून घेण्यास उत्तेजन देऊ लागले. चर्चप्रमुखांनी तर 1096मध्ये आर्चबिशपच्या आदेशानुसार धार्मिक कायद्यामध्येच दाढीवर निर्बंध घालण्याचे कलम टाकून मोकळे झाले. त्यात फक्त पवित्र भूमीसाठी लढणाऱ्या क्रुसेडर्सनाच दाढी राखण्याची मुभा दिली गेली.

या काळी केस विमोचन क्रिया भलतीच महिलाप्रिय झाली. पहिल्या एलिझाबेथ राणीने अक्रोड तेल, व्हिनेगार व अमोनियाचे मिश्रण पापण्याच्यांवर लावून चिमट्याने आपल्या पापण्यांचे केसं काढून टाकत होती. आणि तिचेच अनुकरण उच्चभ्रू घरातील स्त्रिया करू लागल्या. अशा प्रकारे पापण्यांचे केस कमी केल्यास कपाळाची रुंदी वाढून सौंदर्यात भर पडते, हा हिशोब त्यामागे होता. परंतु गळ्याखालील भाग मात्र नैसर्गिक अवस्थेतच ठेवला जात होता.

वस्तऱ्याने चुकून एखाद्या नाजूक भागाला इजा झाल्यास न्हाव्याचे गर्दनच छाटली जाण्याची भीती होती.

अठराव्या शतकाच्या शेवटपर्यंत तरी वस्तऱ्यांच्या रचनेत काही बदल झालेला नव्हता. वस्तऱ्याला नीट धार नसायची. वस्तऱ्याला झाकून ठेवण्याची सोय नसायची. फार फार तर दिवसभराचे काम संपल्यानंतर न्हावी वस्तऱ्याला कापडात गुंडाळून ठेवायचे. गंमत म्हणजे हे साधन हाताळण्यासाठी कौशल्य हवे अशीच समजूत होती. त्यामुळे बहुतेकाना न्हाव्याच्या दुकानाला भेट देण्यशिवाय गत्यंतर नसे. हातातली कामं संपले की दाढी करून घेऊ या असे पुरुषांना म्हणायची सोय नव्हती. व ते शक्यही नव्हते. रुग्णावर शस्त्रक्रिया करण्यासाठी डॉक्टर्स न्हाव्याचीच मदत घेत असत.

१९व्या शतकाच्या सुरुवातीला हे चित्र बदलू लागले. जीन जॅक पेरे, (JeanJacques Perret) हा फ्रेंच हरहुन्नरी नाभिक, नेहमीच स्वतःच्या कल्पना साम्राज्यात बुडालेला असे. आपापल्या स्नानगृहामधील आरश्यासमोर उभे राहून लोक स्वतःच दाढी करून घेत आहेत असे स्वप्न तो पहात होता. याच कल्पनेचा पाठलाग करत त्यानी वस्तऱ्याला लाकडी मूठ व हात कापू नये म्हणून लाकडी कवच असलेला जगातला पहिला सुरक्षित वस्तरा तयार केला. त्याचा वस्तरा सरळ रचनेचा होता. अशाच प्रकारच्या अनेक रचना त्याकाळी वापरल्या जात होत्या. शेफील्डच्या सरळ वस्तऱ्याला फिरते झाकण होते व याच झाकणाचा मूठ म्हणूनही वापर करता येत होते. 1880च्या सुमारास काम्प्फे (Kampfe) बंधूनी जगातील पहिला सुरक्षित वस्तऱ्याचे स्वामित्व व विक्रीचे हक्क मिळविले. त्यांच्या वस्तऱ्याची धारदार बाजू ताऱ्याच्या जाळीने सुरक्षित केलेली होती व दाढी करतानाची तयार झालेल्या साबणाचा फेस गोळा करून ठेवण्याची सोय त्यात होती.

काम्प्फे बंधूंच्या वस्तऱ्यात अनेक दोष होते. दर वेळी तिला चामड्याच्या पट्ट्यावर घासून धार करावी लागत होती. खरे पाहता वस्तऱ्याला धार करत बसण्यापेक्षा नवीन धारदार तुकड्यानी ते बदलता का येऊ नये, हा प्रश्न

विचारावासा वाटणे साहजिकच आहे.  याच कल्पनेचा पाठपुरावा किंग सी जिलेट या फिरत्या विक्रेता प्रतिनिधीनी 1895च्या सुमारास प्रत्यक्षात आणली.




जिलेट हा  विक्री प्रतिनिधी असल्यामुळे विक्रीसाठी दुकानांच्या मालकांकडे जाताना गबाळ्यासारखे दिसणे त्याला आवडत नसे. त्यामुळे टाप-टीप कपड्याबरोबरच डोक्यावरील नीटनेटके केस व दाढी केलेल्या चेहऱ्याने जावे असे त्याला वाटत होते. न्हाव्याकडून दाढी करून घेण्यासाठी त्याच्या दुकानासमोर रांगेत तिष्टत उभे रहाण्याचा त्याला कंटाळवाणा वाटत होता. यावर काही तरी उपाय शोधले पाहिजे असे त्याला नेहमीच वाटायचे.

एके दिवशी न्हाव्याच्या दुकानासमोरील भल्या मोठ्या रांगेत उभे असताना आपणच आपली दाढी का करून घेऊ नये या विचारानी त्याला पछाडले. यासाठी नेमके काय करावे हे सुचेनासे झाले. दाढी करण्यासाठी एक कच्चा आराखडा त्यानी स्वतःच तयार केला. त्यात त्यानी ब्लेड या संकल्पनेच्या भोवती रचना केली. ब्लेडला चिमट्यासारख्या होल्डरनी पकडता येईल; ब्लेड रेझरसारखे धारदार असून ते चेहऱ्यावर फिरेल; धार संपल्यानंतर ते फेकून नवीन ब्लेड घालण्याची सोय त्यात असेल; या मूलभूत गोष्टीभोवतीचे ते डिझाइन होते. ब्लेड स्वस्त असल्यास त्याचा खप होईल हा हिशोबही त्यामागे होता. भरपूर प्रयत्न करून होल्डरची अंतिम रचनेतून त्यानी त्याचे प्रारूप तयार केले. परंतु धारदार ब्लेडसाठी त्याची घोडदौड अडून बसली. इतक्या कमी जाडीचा लोखंडी पत्रा बाजारातही नव्हता वा कुणी उत्पादनही करत नव्हते.  त्याची ही कल्पना प्रत्यक्षात उतरणार नाही असे वाटत असतानाच एमआयटी इंजिनियरिंग कॉलेजमध्ये शिकत असलेल्या विलियम निकर्सन या तरुणाची गाठ पडली. तोही या डिझाइनवर 3-4 वर्षे

काम करत होता. नंतर तो तेथेच प्रोफेसर झाल्यानंतर त्यानी ब्लेडचे अंतिम डिझाइन तयार करून दिले. ते डिझाइन घेऊन जिलेट स्टील उत्पादकांकडे गेला. इतक्या कमी जाडीच्या ब्लेडचे उत्पादन शक्य नाही म्हणून त्याला वेड्यात काढले. परंतु जिलेट नाउमेद न होता शेवटी एका उत्पादकाकडून हवे तसे दोन्ही बाजूला धार असलेली ब्लेड त्यानी तयार करून घेतली. उत्पादनाची प्रक्रिया अंतिम केली व स्वतःची कंपनी काढून त्यानी रेझर सेटच्या उत्पादनाला सुरुवात केली.

सुरुवातीची काही वर्ष सोडल्यास त्याच्या या उत्पादनाला भरभरून उत्तेजन मिळाले. 1906 या एकाच वर्षी त्यानी सुमारे तीन लाख रेझर सेटचे उत्पादन केले. वस्तऱ्याची जागा रेझर सेटनी घेतली. पहिल्या महायुद्धाच्या कालखंडात त्याच्या या उत्पादनाला प्रचंड मागणी मिळाली. प्रत्येक सैनिकाच्या किटमध्ये रेझरचा सेट असणे सक्तीचे झाले. जिलेटचे हे उत्पादन प्रत्येक (पुरुष) अमेरिकनाच्या तोंडी होते. किंग जिलेटने उत्पादन क्षेत्रात एक नवा इतिहास घडविला.

विसाव्या शतकाच्या आरंभापासून सामाजिक व्यवस्थेत बदल घडू लागले. फॅशनचे वारे वाहू लागले. स्त्रियांना आपले पाय व हात उघडे दाखविण्यात कमीपणा वाटेनासे झाले. फॅशन मॅगेझिनमध्ये पोहण्याच्या पोषाखातील तरुणींचे फोटो चमकू लागले. हात व काखे वर करून स्विमिंग पूलमध्ये उड्या मारण्याचे फोटो झळकू लागले. तोपर्यंत स्त्रियां बगलेतील केस काढण्यासाठी केवळ घरगुती मलमचा वापर करत होत्या. 1915च्या सुमारास मिलडी डेकोलेटीने (Milady Decolletée) स्त्रियांसाठी खास असे रेझर सेट तयार केले. व त्यालासुद्धा प्रचंड मागणी येऊ लागली.

जरी 1920च्या सुमारास बॅटरीवर चालणाऱ्या रेझरचा शोध लागलेला असला तरी जिलेट कंपनीला त्यांच्या मूळ डिझाइनमध्ये काही बदल करण्याची गरज भासली नाही. 1960पर्यंत जिलेटचे मूळ डिझाइनच जगभर वापरात होते. व त्यात बदल करण्यासारखी एकही चूक सापडलेली नव्हती.

1960च्या सुमारास कंपनीतील इंजिनियर्सनी कार्बन ब्लेडऐवजी स्टेनलेस स्टीलचे ब्लेड बाजारात आणले. कारण कार्बन ब्लेडची धार कमी होत असल्यामुळे एक दोन दाढीत ब्लेड टाकाऊ ठरत होती. स्टीलचे ब्लेड जंग पकडत नव्हते. आम्लरहित होते. व इतर कामासाठीसुद्धा वापरण्यायोग्य होते. याचीच पुढची पायरी धार कमी झाल्यानंतर नवीन ब्लेड घालण्यापेक्षा 'वापरा आणि फेकून द्या' टाइप डिस्पोजेबल रेझर सेटला मिळालेले उत्तेजन.

1971मध्ये या कंपनीने दाढीच्या सेटमध्ये एका प्रकारची क्रांतीच घडवून आणली. प्लॅस्टिक होल्डर व स्टील ब्लेडची जोडणी असलेल्या Trac II ट्विन ब्लेडला मार्केटमध्ये आणले. या ट्विन ब्लेडमुळे दाढी करणे आणखी सोपे झाले. त्वचेची जळजळ कमी झाली. नंतरच्या काळात दोनऐवजी तीन, नंतर पाच, त्यानंतर अगदी सात ब्लेडपर्यंत या मल्टीब्लेड्सने मजल मारली.

विसाव्या शतकाच्या आरंभी अमेरिकेतील घरोघरी वीज पोचलेली असल्यामुळे विजेवर चालणाऱ्या सोयी-सुविधांची लयलूट होती. हातानी कामं करण्यापेक्षा (विजेवरील) यंत्रांच्या सहाय्याने कामं करण्याकडे कल वाढू लागला. विजेवर चालणारे टूथ ब्रश, बूट चकचकित करणारी पॉलिशिंग यंत्र, सोफा स्वच्छ करण्यासाठी व्हॅक्यूम क्लीनर्स अशा कित्येक साधनांची भर पडली. त्यामुळे 1920च्या दशकातील इलेक्ट्रिक रेझरलाही पुनर्जीवन मिळाले. जॅकोब स्चिक या निवृत्त सैन्यधिकाऱ्याने फिरणारे एक शॅफ्ट, हातात धरता येणारे मोटर व त्याला जोडलेले कटर इत्यादींच्या सहाय्याने दाढीचे उपकरण तयार केले. परंतु या दशकाच्या शेवटी शेवटी आलेल्या जागतिक महामंदीमुळे अमेरिका हवालदिल झालेली होती. त्यातही इलेक्ट्रिक रेझरच्या गुंतागुंतीच्या डिझाइनमुळे सुरुवातीला मागणी नव्हती. खरे पाहता त्याकाळचा हा सेट आजच्या आयपॉडच्या समान होता. तरीसुद्धा पहिल्या वर्षी स्चिक केवळ तीन हजार सेट्स विकू शकला. परंतु मंदी ओसरल्यानंतर मागणी वाढली. 1937मध्ये त्यानी दीड लाख सेट्सची विक्री केली. गंमत म्हणजे इलेक्ट्रिक रेझरने दाढी करताना तोंडाला साबणाचा फेस लावावा वागत

नाही. त्यामुळे ही एक बिनपाण्याची केलेली दाढी ("dry shave") असून त्याकाळचे सुमारे दोन कोटी डॉलर्सचा हा धंदा होता.

दुसऱ्या महायुद्धाच्या सुरुवातीला रेमिंग्टन कंपनीने पहिल्यांदाच महिलांसाठी खास अशी इलेक्ट्रिक रेझर सेट बाजारात आणली. युद्धामुळे नायलॉनचा तुटवडा होता. त्यामुळे तरुणींचे पाय झाकणारे स्टॉकिंग्स मिळत नव्हते. रेमिंग्टनचे रेझर सेट त्यामुळे कामी आले. हाताने पायावरील केस काढून टाकण्यात वेळ घालविण्यापेक्षा इलेक्ट्रिक रेझरने केस काढून टाकणे स्वस्त, आरामदायी व कमीत कमी वेळ लागत असल्यामुळे महिलांची पसंती या नवीन साधनाला होती.

1940पासून सुरु झालेल्या प्रगत तंत्रज्ञानामुळे केशकर्तनाच्या पद्धतीतही अनेक बदल झाले. वॅक्सिंग स्ट्रिप्स आले, लेसर तंत्रज्ञान आले. लेसर तंत्रज्ञानामुळे त्वचेला न जाणवता केस काढणे शक्य झाले. लेसरच्या दुष्परिणामापासून मुक्ती मिळविण्यासाठी इलेक्टॉलिसिस पद्धत रूढ झाली. हीट प्रोब वापरून केसांचे फॉलिकल्स (follicles) उपटून काढणे शक्य झाले.

आजकाल वेगवेगळया आकाराच्या रेझरचे हजारो नमूने बाजारात



मिळतात. आपल्या मागणीनुसार अगदी करंगळीएवढ्या आकाराचे नाकातील केस कापण्यासाठीच्या ट्रिमर्सपासून निर्वात शक्ती वापरणाऱ्या फ्लोबीस पर्यंत (vacuum-powered Flowbees) अनेक प्रकार बाजारात आहेत. मल्टी ब्लेड रेझरप्रमाणे मल्टिपल कटिंग हेड्स असलेले इलेक्ट्रिक शेव्हर्सही सामान्य ग्राहकापर्यंत पोचत आहेत. रिचार्जेबल बॅटरीचा वापर करून त्यातल्या मोटरीचा वेग कमी जास्त करता येतो. त्यामुळे शंभर वर्षापूर्वीचे स्चिकचे शॅफ्ट, कटर इत्यादी असलेले इलेक्ट्रिक रेझर सेट कालबाह्य झाले आहेत. आता

फक्त आपापल्या विशिष्ट मागणीप्रमाणे रेझरची निवड करून वापरणे अगदी सोपे झाले आहे.

आपल्या चेहऱ्यावर केस असावेत की नाही याबद्दलसुद्धा धर्मरूढींचा पगडा आहे. हिंदू धर्मातील बहुतेक जाती जमातीमध्ये एखाद्याचे मृत्यु झाल्यास मृतव्यक्तीचे जवळचे नातेवाइक डोक्यावरील केस काढून मुंडन करतात व चेहरा गुळगुळीत ढेवतात. तिरुपती देवस्थानाच्या ठिकाणी

मुंडन करून केशदान करून पुण्य कमावतात. मुस्लिम समाजामध्ये धार्मिक परंपरा म्हणून मिशा न ठेवता पक्त दाढी ठेवतात. कदाचित हा धर्म अरबस्तानामधून आल्यामुळे तेथील अरबांची नक्कल इतर टिकाणीसुद्धा केली जात असावी. वाळवंटी प्रदेशात राहणाऱ्या अरबांना मिशित वाळू शिरून जेवताना ती तोंडात जाण्याची शक्यता असल्यामुळे ते ओठावरील मिशा भादरून फक्त दाढी ठेवत असावेत.

केसाळ चेहऱ्याला कुरवाळणारे, दाढी-मिशांची निगा राखणारे. चेहरा गुळगुळीत ठेवणारे, पक्त दाढी ठेवणारे, फक्त मिशा टेवणारे असे अनेक प्रकार धर्माच्या देखरेखीखाली वा गरज म्हणून वा एखाद्या  राजा-महाराजाने फतवा काढला म्हणून या समाजाने बघितले आहेत. माणसाच्या चेहऱ्यावर  केस असावे कितपत असावे या गोष्टी फॅशनप्रमाणे बदलतही गेले आहेत. अनेक वेळा कुठल्या तरी सरदारांनी वा प्रतिष्ठित व्यक्तींनी मिशांना एखादा वेगळा आकार दिलेले असल्यास त्याचे अनुनय करणाऱ्यांची संख्या कमी नसेल. २०व्या शतकात तर गाजलेल्या चित्रपटातील अभिनेत्याप्रमाणे चेहऱ्यावरील केस कमी-जास्त वा गायब होत होते. चिकण्या हीरोप्रमाणे दिसण्यासाठी तरुणवर्ग जिवाचे रान करत होता. १९२०च्या सुमारास अगाथा क्रिस्तीच्या रहस्यकथातील हेर्क्युले पॉइरच्या (Hercule Poirot) मिशांची  स्टाइल भलतीच लोकप्रिय होती. अमूर्त पेटिंग्ससाठी नावाजलेल्या सिल्व्हेडॉर डालीच्या मिशांचा स्टाइल एकदम वेगळी होती. सर्वात लांब मिशा असलेल्या आपल्या येथील रामसिंग चौहानच्या गाठ मारलेल्या मिशीची लांबी 4.29

मीटर (14 फूट) होती. दर दहा दिवसांनी तो गाठ सोडवून त्याला  आंघोळ घालत  होता. शीख पंथात तर क पासून सुरु होणाऱ्या लक्षणामध्ये केश ला महत्वाचे स्थान दिले आहे. (मिशांचा इतिहास हा वेगळया लेखाचा विषय होऊ शकतो)

एक काळ असा होता की रूढी व परंपराग्रस्त समाजात व्यक्तिच्या आशा-आकांक्षाना कायम जखडून ठेवल्यासारखी परिस्थिती होती. एका सुप्रसिद्ध लेखकांनी म्हटल्याप्रमाणे ‘अगदी साध्या मिशीचे उदाहरण घेता येईल, ओठाच्या वरच्या भागावर उमटणाऱ्या मिशीचे आकार-प्रकार सोडूनच द्या, पण मिशीला चाट मारण्याची कृती आज सहजरीत्या करताना ती सर्वप्रथम छाटणाऱ्या महाभागाचे आपल्याला स्मरण तरी कधी होते का? नाही ना? पण ज्याने पुरुषार्थाचे लक्षण मानली गेलेली मिशी सर्वप्रथम छाटली असेल त्याचा पुरुषार्थ इतरांपेक्षा कमी होता का? आजच्या युवती आपल्या सौंदर्यस्वरूप केसांना विविध आकार, रंगच्छटा देतात, त्यांना ज्या स्त्रीने आपल्या केसांना सर्वात प्रथम कात्री लावून ते कापले तिचे स्मरण तरी होते का? सर्वात प्रथम मिशी छाटणाऱ्या ‘पुरुषार्थी’ पुरुषाचे आणि सर्वात प्रथम आपल्या लांब केसांना कात्रीने कापणाऱ्या धैर्यवती महिलेचे नाव इतिहासात नमूद नाही. पण म्हणून त्यांचे आपल्यावरील ऋण कमी का होईल? त्या अनामिकांचे स्मरण आज होताना दिसत नाही हे मात्र खरे. सामाजिक बदलांचे हे असेही असते.’ (कालसमीक्षा, अरुण टिकेकर)

लाख वर्षापूर्वी सुरुवात झालेल्या केस निर्मूलनाची (वा काही प्रमाणात दाढी-मिशा ठेवण्याची/ काढण्याची) माणसाची आस आज या स्टेजपर्यंत पोचली आहे. भविष्यात काय वाढून ठेवले आहे ते केवळ भविष्यालाच माहित.



# रावबाजी

*महाराष्ट्र टाइम्समध्ये एकेकाळी सदरलेखन करणाऱ्या श्री. बा. जोशी यांच्या 'उत्तम मध्यम' या पुस्तकातील 'विषण्ण आणि विलक्षण' हा लेख आवडल्यामुळे त्या लेखाचे काही संपादित अंश 'ऐसी'वरील वाचकांसाठी!*

*पेशवाई बुडविणारा म्हणून प्रसिद्ध पावलेल्या दुसऱ्या बाजीरावाच्या 'रावबाजी' जीवनशैलीचे हे किस्से नक्कीच आवडतील!*

रावबाजी उत्तर पेशवाईतील एक वादग्रस्त व्यक्तिमत्व आहे. त्यांनी पेशवाई बुडवली असाच इतिहासाचा कौल आहे. परंतु माणूस होता तरी कसा या कुतूहलाची अंशत: पूर्ती या ('शेवटचे बाजीराव यांच्याविषयी अखेरच्या काही आख्यायिका' ले. अनंत वामन बरवे, 1910) पुस्तिकेने होते. त्यांचा विक्षिप्त, तऱ्हेवाईक स्वभाव या आठवणीतून स्पष्टपणे उभा राहतो. इंग्रजांचा पेन्शनर म्हणून दूर उत्तर प्रदेशातील ब्रह्मावर्त येथे त्यांची रवानगी झाली. सुंभ जळला तरी पीळ जळत नाही म्हणतात याची प्रचीती तेथील त्यांच्या वर्णनावरून येते. हा पीळ स्वाभिमानाचा वा बाणेदारपणाचा नसून अहंकाराचा आणि गतवैभवाचा आहे. त्यामुळे त्यांच्या वागणुकीचे जे चित्र उभे राहते ते काहीसे केविलवाणे आहे. पुण्याहून निघताना अठ्ठावीस हत्तींवर संपत्ती लादून नेली होती म्हणे. दरमहा पेन्शन होते सहासष्ट हजार सहाशे सहासष्ट (66,666/-) रुपये। त्यापैकी पाऊण हिस्सा तैनातीच्या ताफ्याच्या पगारावर खर्च होई व पाव हिस्सा भोजनावर. सोवळयाओवळयाचे बंड त्या जमान्यात फार असे. परंतु रावबाजींनी ते इतके पराकोटीस नेले होते की, एकदा चातुर्मासातील सकाळी संध्या आटोपून ब्रह्मयज्ञ करीत असताना तनखा घेऊन इंग्रज एजंट आला असता, ब्रह्मकर्मात साहेबाचा शब्द ऐकल्याने बाधा आली असे मानून त्यांनी सर्व रुपयांची रास भागीरथीत बुडवली! हा प्रकार कलकत्त्यास इंग्रज सरकारास समजताच त्यांनी सदर साहेबास सातशे रुपये दंड ठोठावला, पुन्हा रक्कम पोचती केली आणि तनखा सुपूर्त करण्याची तजवीज रामचंद्र व्यंकटेश या वकीलावर सोपवली! हा तनखाही त्यांना कंपनीच्या मुखवट्याच्या नाण्यात

चालत नसे, तर सुरती रुपयांतच! सोन्या-रुप्याखेरीज इतर धातूस स्पर्श न करण्याचे त्यांचे व्रत होते. सोन्याच्या ताटात जेवीत. रुप्याच्या चौरंगावर सोन्याची थाळी, सभोवती अठ्ठावीस सोन्याच्या वाट्या व तितकेच सोन्याचे चमचे असा थाट असे.

त्यांच्या खाण्यापिण्याचा बराच तपशील आठवणी सांगणाऱ्याने पुरविला. बहुधा तो पाकशाळेतील बल्लवाचार्य अथवा वाढपी असावा. ताटात फक्त भात आणि वरण असे. बाकी चटण्या-कोशिंबिरीपासून सर्व पदार्थ वाट्यातून घेत. दहा भाज्या, दहा चटण्या, सर्व पदार्थांस तुपाच्या फोडण्या आणि खाशा पंक्तीला रोज पुरणपोळी असे. रावबाजी रुपयास शेरभर मिळणारा दिल्लीचा तादूळ आणि बऱ्हाणपुरी तुरीची डाळ पसंत करीत. त्यांना रोज मक्याची कणसं लागत आणि कलकत्त्याहून त्यांच्यासाठी खास शहाळी येत. रोज एका शाहाळ्यातील पाणी पिण्याचा त्यांचा परिपाठ असे. पंक्तीत बायकांमुलांना चांदीची ताटे असत व इतरांना सव्वाहात केळीची पाने! केशर रोज शेर शेर खर्च होई. पंक्तीच्या वेळी दुवक्ता वाजंत्री वाजत. रांगोळया, रंगीत पाट, केशरी गंध, अगरबत्त्या हा दरबारी थाट तर नेहमीचाच. रोज अच्छेर कापूर, अष्टगंध असा मालमसाला लागे. दोन एकादशा व चतुर्थीचे उपास करत. द्वादशीच्या पारण्यास व चतुर्थीच्या सायंकाळी व्रतमुक्तीच्या भोजनास ब्राह्मणांस मुक्तद्वार असे व तेव्हा दोन दोन हजारांपर्यंत पान होई. कोवळया उत्तम भाज्या व फळफळावळ असली म्हणजे रावसाहेब फार खूष होत. भोजनाच्या वेळेशिवाय मध्ये पाणीसुद्धा पीत नसत. दुपारच्या पंक्तीस रोज एखादे तरी पक्वान आलटूनपालटून असे. नानासाहेब, बाळासाहेब, रावसाहेब यांच्या शंभर शंभर पानांच्या पंक्ती बसत. शिवाय तीन बायकांच्या तिघी सुनांच्या व तिघी लेकींच्याही पंक्ती असत. मुलांचा स्वयंपाक वेगळा असून सुना, लेकी, बायका यांचा मात्र एकत्र होई. बाजीरावास भोजनानंतर रामटेकच्या दहा पानांचा विडा लागे. रोज अच्छेर उदबत्त्या.

दशहरा उत्सवात एका रात्री बारा वाजता रामचद्र तात्या वाकनीस यांना हकूम झाला की, उदईक ब्राह्मणभोजनास मोदक करावे. वाकनीसांनी रातोरात कानपुरास माणूस पाठवून तीन आण्यास एक या दराने नारळ आणवले व लागलीच रांधणाऱ्या बायकांस स्वयंपाकास लावून सकाळी आठच्या पंक्तीस मोदक वाढले. साहेबांनी त्यावर वाकनीसाला हजार रुपये पोशाखादाखल बक्षीस दिले!

रावबाजींचा नेसूचा धोतरजोडा येवल्याचे रेशीम व चंदेरीचे सूत यांचा विणलेला असे. मध्ये सूत काय ते वीतभर रुंदीचे, बाकी दोहो अंगास रेशमी काठ असा त्या धोतराचा वाण असे. आरंभी रंगीबेरंगी वस्त्रे वापरत. पुढे पुढे सर्व पोशाख पांढराच करू लागले होते. दसऱ्यास मात्र दरबारी साजशृंगार असे. बसायची आसने शालजोड्यांची असत. ही आठ आसने रोज धुवून ठेवावी लागत. थंडीच्या दिवसांत रजई, दुलई, शाली पांघरत नसत. बिछान्यालगत दोन शागीर्द बसत व पेटत्या शेगड्यांवर धोतरे शेकून घेऊन आळीपाळीने साहेबांवर पांघरीत! रेसिदेंतांच्या भेटीसाठी वेगळी जागा (आऊटहाऊस) होती. त्यात गाद्या, रुजामे अशी बिछायत असे. रावसाहेबांची बिछायत वेगळी असे. इंग्रज रेसिडेण्टासही बूट बाहेर काढून ठेवून गुडघे टेकून बिछायतीवर बसावे लागे. त्यासाठी तो मुद्दाम पोकळ विजार घालून येई. संभाषण दुभाष्यामार्फत होई. रात्री झोपण्यास उशीर झाला, तर दुसरे दिवशीचे नित्यनेमास विलंब होई व साहेब आगपाखड करत. त्यासाठी चाकरांनी युक्ती अशी केली होती की उठण्याची ठरलेली वेळ टळून गेली तरी तासाचे टोले राव उठल्यानंतरच देत! ब्रह्मयज्ञासाठी स्वारी भागिरथी तीरावर जाई तेव्हा बरोबर चार उंट असत. एकावर मोहरा, पुतळ्या, रुपये, दुसऱ्या दोन उटावर धाबळ्या. मुकटे, शाली, धोतरे वगैरे व चौथ्यावर शौचकूपाची सोय असे! शाही उंटांवर दहाचा आकडा डाग देऊन घातलेला असे.

दानधर्म करण्यात त्यांनी बरीच दौलत उधळली. चिंचवडच्या मोरयाचे पुजारी भेटीस आले, त्यांना लक्ष रुपये दक्षिणा दिली. शंकराचार्यांना पत्नास

हजार रुपये, गंगेवर ब्रह्मयज्ञाचे वेळीही दक्षिणा, वस्त्रे, तीळ-तांदूळ यांची खैरात करत. रोज खर्चाच्या याद्या पाहून दोन प्रहरी व रात्री सह्या करत. नानासाहेबाने इंग्रजांचे पाहून २७०० रुपयांची बगी घेतली. ‘जलचरांची वाहने कशाला पाहिजेत?’ असे म्हणून त्यांनी बगीचे तुकडे करवले, आणि सात हजार रुपये खर्चून मोत्याच्या झालरी लावलेला रथ करवून नानास दिला. दक्षिणेचा बराच तपशील निवेदकाने नमूद केला आहे. कथाकीर्तनाचे वेळी लवंगासुपाऱ्या मुठी भरभरून वाटत. ब्राह्मणांना केळीचे पान अडीच हात लांबीचे मांडत. त्यावर पदार्थ एवढ्या रेलचेलीने असत की, हात पोचत नसे; म्हणून दूरचे पदार्थ जवळ सारण्यासाठी दोन ब्राह्मण शागीर्द प्रत्येक पानाच्या दोन बाजूस बसवीत होते!!

दुष्काळ पडला तेव्हा स्वत:चा राहता वाडा पाडून नव्याने बांधण्याचे काम काढले व दीड वर्षपर्यंत गोरगरिबांस पोसले. पंचवीस लाख रुपये या दुष्काळी कामावर खर्च झाले म्हणून वाकनीसांनी कुरकुर करताच “रुपये नुसते खजिन्यात ठेवून काय करावयाचे आहेत, आज माणसांचे जीव वाचले, रुपये सार्थकी लागले.” असे उद्गार काढले. एकदा दोन लक्षांचा दरोडा पडला. पंधरा असामी पकडले गेले. तेव्हाही दया दाखवून त्यांना पदरी ठेवले. जडजवाहीर सांभाळण्यासाठी विंचुरकराच्या पागेतील ब्राह्मणांचा पहारा बसवला. जरीपटक्याचे निशाणही विंचुरकरांच्या हवाली असे. उत्सवप्रसंगी स्वारी निघे तेव्हा निशाणासह सर्व साजसरंजाम असे. गणेशचतुर्थीच्या उत्सवासाठी एकशेएकवीस तोळे वजनाची सोन्याची मूर्ती होती. ती भाद्रपद शुद्ध प्रतिपदेपासूनच पूजीत. चतुर्थीस मृत्तिकेचा मूर्ती मखरात व 121 मूर्ती बाहेर बसवीत. बाहेरचे गणपती पंचमीस बोळवीत व मखरातील मूर्तीचे अनंतचतुर्दशीस विसर्जन होई. पर्वणीस्नान चुकवत नसत. आसनमांडी घालून गंगेचे सबंध पात्र पोहून जात, अशाच अतिपोहण्यामुळे अखेर पक्षाघाताचा झटका आला. त्यावेळी अग्निहोत्र घेतले होते. स्वारीचा मुक्काम गंगेकाठी. कुटुंबकविला दूर वाड्यावर. अग्नीला आहुती द्यायच्या तर दंपतीने द्याव्या लागतात. तेव्हा दोन कोस लांबीची रेशमी दोरी करवली व तिचे एक टोक

तिकडे बाईसाहेबांनी धरावे व दुसरे इकडे यांनी अशी आठ दिवस तजवीज केली होती! इंग्रज सरकारने त्यांना तीन खून माफ केले होते. त्यांपैकी एक त्यांनी कारभारी तात्या दीक्षित यांच्या गुन्हेगारीचे वेळी खर्ची घालून त्यास वाचवले.

अशा या सुरस आणि चमत्कारिक गोष्टी जितक्या विलक्षण तितक्याच मन विषण्ण करणाऱ्या!



# हाय – फाय आध्यात्मिकतेचा अनुभव

आज काल उच्च व अत्युच्च मध्यम वर्गातील नव श्रीमंत ‘आम्ही अंधश्रद्ध नाही, आमचा परमेश्वरावर विश्वास नाही, देव-धर्मावर विश्वास नाही...’ हे ठासून सांगत असतानाच आपल्या ‘आत्मोन्नती’साठी (व सर्व प्राणिमात्रांच्या दीर्घ आयुरारोग्यासाठी) स्पिरिच्युअल (आध्यात्मिक) असणं किती गरजेचे हेही सांगण्यास विसरत नाही. यासाठी सत्संगाच्या पारायणांची रतीब टाकत असतात.  परंतु हे अध्यात्म म्हणजे नेमके काय असते,  याचा शोध घेत असताना पु.लंच्या अनुभवाची आठवण झाली. त्याचप्रमाणे शांता गोखले यांनी केलेल्या आध्यात्मिक अनुभवाच्या वर्णनाचीसुद्धा!

जरी या लेखकद्वयांचे अनुभव पूर्णपणे काल्पनिक असले तरी त्यातील काही अंश तरी वास्तवात होते, हे नाकारता येत नाही. कदाचित आजकाल  पु. ल. देशपांडे व शांता गोखले यांनी वर्णन केल्याप्रमाणे अध्यात्माचा प्रत्यक्ष अनुभव मिळत नसेलही.  परंतु अध्यात्माची वाट कशी होती वा असू शकते याची ही एक गंमतीशीर झलक.

(डिस्क्लेमरः यात कुणाच्याही भावना दुखविण्याचा उद्देश नसून पाच-दहा मिनिटाचा विरंगुळा देण्याचा हा एक छोटासा प्रयत्न. कुणाच्या भावना दुखल्यास आगावूच माफी मागत आहे.)

**असा मी असा मी** - पु. ल. देशपांडे

इकडे ब्रदर अरुणाचलम हातात एक मेणबत्ती घेऊन उभा राहिला. मंडळी उभी राहिली. सर्वांनी हात जोडले. मीही जोडले. सगळी माणसं व्यवस्थित उभी होती. आप्पा भिंगार्डे मात्र कीर्तन संपल्यावर “घालीन लोटांगणा”ला राहतात तसा यडपटासारखा पोट खाजवीत उभा होता. दृष्टी पारशिणीच्या पाठीवरून चेहऱ्याकडे वळली होती. मग ब्रदर अरुणाचलम म्हणाला, “गुरुदेव स्वामी संप्रभावानन्दमहाराज की”--, लोक ”जय” म्हणाले. पुन्हा तो म्हणाला, “गुरुदेव स्वामी संप्रभावानन्दमहाराज की--”, महाराज की म्हणाल्यावर

लोकांनी "जय"  म्हणण्यापूर्वी भिंगार्ड्यानं पुन्हा एकदा "हिऽऽक् छयाक्" केले. हा भिंगार्ड्या म्हणजे अत्यंत कंडम माणूस आहे!

तेवढ्यात प्रोफेसर कुंभकोणमनी आपली "प्रेय्यर" सुरू केली . तो मृदुंगवाला आणि झांजवाला एकदम अंगात आल्यासारखे आपापली वाद्यं बदडायला लागले. मनसोक्त आदळआपट केल्यावर एकदम थंड पडले आणि आपल्या आवडत्या म्हशीपासून पाचसहा वर्षे ताटातूट झालेला अत्यंत व्याकूळ अवस्थेतला रेडा जितका गोड आवाज काढेल तसल्या आवाजात प्रोफेसर कुंभकोणमनं गायला सुरुवात केली. "वातापि गाणापातीं भाजेऽऽअम्" गाता गाता मधूनच ते बनियनमधून ढेकूण चावल्यासारखं करीत होते. कुंभकोणमच्या असल्या गाण्यानंतर गुरुदेवच काय ब्रह्मदेवसुद्धा धावून आला असता. पण ते खाली बसल्यावर "नाउ ब्रदर सुकुमारसेन बंडोपाध्याय विल सिंग ए बैंगॉली प्रेय्यर" अशी घोषणा झाली आणि सुकुमार हे नाव धारण करणारा सुमारे सव्वादोनशे पौंडांचा देह नाकावरचा चष्मा सावरीत आणि धोतराचा सोगा पैरणीच्या खिशात घालीत उठला. त्यानं दोन्ही गालांत सुपाऱ्या ठेवून बोलल्यासारखी सुरुवात केली. मोठ्या हंडयावर मडकं उपडें ठेवल्यासारखा दिसणारा हा गृहस्थ, आपण पाळण्यातल्या पोराशी जसं "शोन्याला कॉ पॉजे ऑमच्या? कुनी मॉल्लो आमच्या शोन्याला? कोशोकोशो बाई लोलू आलं?" असं बोबडं बोलतो तसं थोडा वेळ बोलला. एकदम ऊर्ध्व लागल्यासारखे त्यानं डोळे फिरवले आणि गाणं म्हणायला सुरुवात केली. त्याचं ते भजन संपलं आणि हॉलमघलं झुंबर आणि इतर दिवे पेटले.

कुणीतरी जोरात शंख फुंकला. मला आधी वाटलं, भिंगार्ड्यानं जांभई दिली म्हणून. कारण तो हापिसात "होssईss " अशी जांभई देतो. पण ब्रदर अरुणाचलम शंख फुंकीत होता. शंख फुंकून झाला. पडदा बाजूला झाला आणि हातात एक मोरपिसांचा पंखा घेऊन सुवर्णा कपूर आली. तिच्यामागून सौभद्रातल्या त्रिदंडी संन्यास घेतलेल्या अर्जुनासारखा दिसणारा गृहस्थ आला. हेच ते गुरुदेव असावेत असं वाटेपर्यंत सगळ्यांनी " श्रीसद्गुरुस्वामी-" असा

घोष केला. मला वाटलं, भिंगार्ड्या पुन्हा “हीक् यॉंश्” करणार पण तो त्या सुवर्णा कपूरकडे ‘आ’ वासून पाहत होता. मग गुरुदेव आसनावर बसले. सौभद्रातल्या अर्जुनासारखे. सुवर्णा कपूर पंख्यानं वारा घालीत होती. सुभद्रेसारखी. फक्त ‘नाराऽऽयण-- नाराऽऽयण-- नाराऽऽयण!’ तेवढं नव्हतं. मग लोकांनी त्यांना हारबीर घातले. कायकिणी गोपाळरावांनी तर साष्टांग दंडवत घातला होता आणि हात जोडून दासमारुतीसारखा तो बसला. तेवढ्यात माझ्या शेजारची बाई आणि तिची ती स्वरूपसुंदर कन्या उठल्या आणि त्यांनी गुरुदेवांच्या पायावर डोकं ठेवलं. त्या बाई कुठल्याशा राणीसाहेब होत्या. राणीसाहेब, राजकन्या वगैरेंच्या शेजारी बसणारा कडमड्याच्या जोशी घराण्यातला मी पहिला महापुरुष निघालो याचा मला अभिमान वाटत होता.

.....

ब्रदर अरुणाचलम एका चिमट्यानं नोटा उचलून मखमली पेटीत टाकत होता. राणीसाहेबांनी चांगली शंभर रुपयांची नोट टाकली होती. लाजेकाजेस्तव मीही खिशात हात घातला आणि बघतो तर खिशात दहाची नोट निघाली! हा चमत्कार कसा झाला कळेना. हिनं तर येताना माझ्या हातावर पाचाची नोट टिकवली होती. ती तिकिटांत जवळजवळ संपून एक रुपया आणि काही चिल्लर उरली होती. मी “गुरुमाउलीss, काय हा चमत्कार!” म्हणून त्यांचे पाय धरणार, इतक्यात माझ्या डोक्यात लखख प्रकाश पडला. तो कोट गोठोस्करदादांचा होता. त्यांनी खिसे न चाचपताच कोट दिला. गोठोस्करदादा म्हणजे देवमाणूस......

काही वेळानं स्थिरस्थावर झाली. गुरुदेवांनी एकदम श्वास आत ओढला आणि म्हणाले, हू आर यूऽऽ?” मला वाटलं, मला विचारताहेत. मी “सर, माय नेम इज-“ वगैरे वाक्य जुळवायला लागलो इतक्यात ते तिसरीकडेच पाहत पुन्हा ओरडले, “हू आर यूsऽ- हू आर यूSS - हू ॲम आय? अँड हू इज हीSS” म्हणून त्यांनी बोट वर केलं. मी वर पाहिलं वर काहीच नव्हतं. पण गुरुदेव मात्र बोट वर करून सारखे “हू इज ही?” असं विचारत होते. सगळी

मंडळी शांतपणानं ते "हू आर यू आणि हू इज ही" ऐकत होती. आमच्या मॅकमिलनच्या प्रायमरमध्ये पूर्वी "ही इज ए बॉय - शी इज ए गर्ल - दे आर गर्ल्स" असला धडा असे. गुरुदेव त्याच चालीवर म्हणायचे, "हू आर यू?" आणि मग आपल्या त्या प्रशनाचं उत्तर द्यायचे, "ही इज द हू ऑफ द यू इन द आय ऑफ द ही इन विच यू आर द आय अँड आय इज द यू -- अँड दॅट यू इन यू अँड ही इन यू-"; माझी हाय आणि लो ब्लडप्रेशरं एकदम सुरू झाली. काही वेळानं मला नुसतंच 'यू यू यू यू' एवढंच ऐकू यायला लागलं. आणि येताना ओसरीवर माझ्याकडे पाहून तुच्छतेनं मान फिरवणारा तो कुत्रा आणि हे समोरचे लोक सारखेच दिसायला लागले. त्यातून तो उदबत्त्यांचा आणि राजकन्येच्या दिशेनं येणारा सुगंध आणि गुरुदेवांचे "द इटऽऽर्नल ब्लिस ऑफ द सोऽऽल विच एक्सप्लोअर्स द रेल्म्स बियाँड द रेल्म्स ऑफ द स्यूपरा-कॉन्शसनेस..." वगैरेमुळे काय झालं कोणाला ठाऊक, काही वेळानं मला कुणीतरी धक्के देतोय असं वाटलं. आणि नेहमीप्रमाणं मी "ए शंकऱ्या, पलीकडे जाऊन झोप. काय लोळतात पण कार्टी! " असं ओरडलो. बघतो तर कायकिणी गोपाळराव मला जागं करीत होते. सगळा हॉल रिकामा झाला होता.

"यू आर व्हेरी फॉर्च्युनेट हां धोंडोपंत-"; कायकिणी गोपाळराव सांगत होते

"आँ".

"अहो, असं समाधी लागायचं म्हणजे तुमचं पूर्वपुण्याई ग्रेट असलं पायजे – "

ही असली समाधी जन्माला आल्यापासून आजतागायत ताकभात उरकून हात धुऊन होईपर्यंत लागते हे त्याला कशाला सांगा! मी हॉलबाहेर आलो. बाकीच्या सगळ्या मखमली चपला, जरतारी चढाव, चकमकीत बूट वगैरे केव्हाच गेले होते. माझी फाटकी चप्पल केविलवाणेपणानं माझ्याकडे पाहत एकटीच पडली होती. तिला बिचारीला पोटासाठी तुडवायची वाट ठाऊक ही अध्यात्माची वाट अगदीच नवी होती.

**त्या वर्षी** - शांता गोखले

.....सुमित्राबेन आता दाराजवळ उभ्या राहून अत्यंत नम्रपणं स्वागत करतायत. लवकरच चुडीदार पायजम्यांवर रेशमी झब्बे घातलेल्या पुरुषांनी आणि मंद रंगांच्या उंची तलम साड्या आणि खोल गळ्यांचे ब्लाऊज घातलेल्या त्यांच्या बायकांनी दालन भरून जातं. काही जोडप्यांबरोबर सलवार-कमीजमधल्या मुली आणि जीन्समधले मुलगेही आहेत. सर्व जण बसल्यावर आतून चांदीच्या ट्रेवर क्रिस्टलच्या पेल्यांमधून दोन-तीन प्रकारची सरबतं आणली जातात. कलिंगडाचा वितळलेल्या माणकांसारखा रस, त्याच्या शेजारी चंद्रकिरण ओतल्यासारखा लिचीचा रस आणि पाचूंसारखं लखलखणारं खसचं सरबत. ... जमलेल्या मंडळीमध्ये पुसट कुजबूज चालल्येय ती एकाएकी बंद होते. आतल्या खोलीतून सुमित्राबेन शिवानंदस्वामींना बाहेर घेऊन येतात आणि त्यांना मंचावरच्या आसनावर स्थानापन्न होण्याची लवून विनंती करतात. स्वामी आसनावर बसतात. त्यांचा वेष सफेद रेशमी पायघोळ कफनी, कानांत मोत्यांची कुंडलं, गळ्यात द्राक्षांएवढ्या मोठ्या रुद्राक्षांची माळ आणि कपाळावर उभा शेंदरी टिळा असा आहे. ते बसल्यावर जमलेल्या सत्संगींना एका तीक्ष्ण दृष्टिक्षेपात ते अजमावतात. त्यांचे डोळे खोलीतल्या प्रत्येक व्यक्तीवर एका क्षणांशासाठी विसावतात. (एका) मध्यमवयीन बाईच्या शरीरातून कळ उठल्यासारखी ती ‘आह’ करते. मग स्वामी त्यांचे भेदक डोळे मिटतात आणि काही काळ ते तसेच ध्यानस्थ बसतात. सत्संगींच्या रोखलेल्या श्वासांच्या शांततेनं वातावरण जड होतं. स्वामी डोळे उघडतात तेव्हा सर्वांच्या तोंडून फुस्स असा एकत्रित श्वास सुटतो. स्वामी हलकी टाळी वाजवतात. त्यासरशी पुरुषाच्या आवाजांतला ध्वनिमुद्रित मंत्रघोष थांबतो. त्यानंतर आतून त्यांचे चार शिष्य येतात. त्यांतला एक सफेद परदेशी आहे. सर्वांनी धोतरं- बंड्या असा पोशाख केला आहे. फिरंग्याच्या दोन्ही बाहूंवर मोठी चित्रं गोंदलेली आहेत - उजव्या दंडावर शिव, डाव्यावर पार्वती. हे चार शिष्य आता स्वामींच्या मागच्या

बाजूला कापडावर रंगवलेलं एक चित्र उंच स्टँडवरून टांगतात. त्याच्या मध्यभागी एक लाल वर्तुळ आहे आणि भोवताली ध्वनिलहरींसारख्या काळया रेषा. स्वामी खोल, मुलायम आवाजात धिम्या लयीत मंत्र म्हणण्यास सुरुवात करतात :

सर्वे वेदा यत्पदमामनन्ति

तपांसी सर्वाणी च यद्वदंति

यदिच्छंतो ब्रह्मचर्य चरन्ति

तत्ते पदं संग्रहेण त्रवीम्योमित्येतत्

स्वामी डोळे उघडतात. ह्या मंत्राचा अर्थ आहे : सर्व वेद ज्या पदाची घोषणा करतात, सर्व तप ज्याच्याविषयी बोलतात, व ज्याची इच्छा करणारे ब्रह्मचर्याचे आचरण करतात, पद तुला संक्षेपाने सांगतो, की ते आहे...

इथे स्वामींचे चार शिष्य ओंकाराचा घोष सुरू करतात.

तो क्रमशः विरतो तसे स्वामी पुन्हा बोल लागतात :

“ ‘अ’, ‘उ’, व ‘म्’ आणि  (चंद्रकार)  मिळून ओंकार बनतो. ओंकारातला ‘अ’ हा विभाग जागृती ह्या अवस्थेचा, विश्व ह्या आत्मस्वरूपाचा आणि विष्णू ह्या देवतेचा निर्देशक आहे. ‘उ’ हा स्वप्न, तेजस् आणि महेश्वर ह्याचं प्रतीक आहे ‘म्’ सुषुप्ती, प्रज्ञ आणि ब्रह्मा ह्याचा निर्देशक आहे. ओंकाराच्या उच्चाराचं अंतिम फलित ब्रह्मप्राप्ती आहे. तिथवरचा प्रवास आपली ऐहिक कर्तव्यं सांभाळत करणं कठीण आहे.  *

पण ओंकाराच्या उच्चारणानं आत्मज्ञान प्राप्त करून घेणं हे काही प्रमाणात साध्य होऊ शकणारी गोष्ट आहे. ओंकाराचं उच्चारण डोळे मिटून करायचं असत. पण मन एकाग्र नसेल तर डोळे मिटूनसुद्धा आपण स्वत:मध्ये शिरू शकत नाही. म्हणून प्रथम माझ्या मागं लावलेल्या ह्या बिंदूवर आपली दृष्टी स्थिर करायची आहे. बिंदू ही शिवाची एक शक्ती आहे. बिंदू हा योग्याचा ज्ञानचक्षू आहे. त्यावर लक्ष केंद्रित करून जी एकाग्रता प्राप्त होईल तिच्या आधारानं आपण आपल्या आत प्रवेश करण्याचा प्रयत्न करणार आहोत.

ज्यांना पद्मासन घालता येणं शक्य असेल त्यांनी घालावं. ज्यांना नसेल त्यांनी साधी मांडी घातली तरी चालेल. मग आम्ही उच्चारणास सुरुवात करू. ह्या बिंदूवर लक्ष पूर्णपणं केंद्रित करावं. त्यात तुम्ही डोळे मिटून सामील व्हाव. जगातल्या सर्व प्राचीन तत्त्ववेत्त्यांनी आंधळेपण हे एका वेगळया प्रकारच्या दृष्टीचे साधन मानलं आहे. बाहेरचं जग ज्याला दिसत नाही त्याला जे अव्यक्त आहे, जे निराकार आहे, ते दिसू लागतं. आमचे गुरुबंधू, स्वामी प्रसादानंद अचानकपणं एका डोळ्यानं आंधळे झाले. त्याच दुःख ते करत बसले नाहीत. जे घडलं आहे त्याचा स्वीकार जो करत नाही तो दुःखी होतो. स्वीकार करतो त्याला वेगळी दृष्टी येते. स्वामींना हे कोणी सांगण्याची गरज नव्हती ते त्यांच्या शिष्यांना म्हणाले, “इतरांना दिसतं ते मला माझ्या एका डोळयानं दिसतं. पण दुसरा डोळयानं जे इतरांपासून लपलेलं आहे, जे बाहेर कुठेच नाही तेही मला दिसतंय.

डोळे मिटणं म्हणजे तात्पुरता आंधळेपणा स्वीकारणं. दृश्य जगापासून अलग होणं. आणि स्वतःच्या आत्म्याचा शोध घेण्याचा प्रयास करणं. हे तुम्ही यशस्वी रीत्या करू शकलांत तर डोळे उघडल्यावर तुम्हांला दुश्यजगदेखील बदललेल्या स्वरूपात दिसेल मग ह्या जगाशी संबंधित तुमच्या सर्व चिंता गळून पडतील. तुमच्या भोवताली तुमच्या आतून निर्माण झालेलं असं एक प्रसन्न वातावरण तयार होईल. दैवी शक्तीचा एक लहानसा अंश आपल्यात शिरल्याची तुम्हांला अनुभूती येईल. आतां आपण सर्वांनी मांडी घालावी आणि बिंदूवर लक्ष केंद्रित करावं.”

स्वामींच्या प्रवचनानं प्रकाश गलबललाय. पद्मासन घालता घालता तो चोरून इतराकडे बघतोय. फार कमी लोकांना पद्मासन जमतंय. तरुण पोरं-पोरी आणि काही पुरुष-बायकाही प्रयत्न करता करता खसखसतायत, तर काहींनी गंभीर मुखवटे चढवल्येत.

प्रकाश बिंदूवर लक्ष केंद्रित करतो. काही वेळानं डोळे सतत उघडे ठेवल्यामुळं ते झोंबून ओलावतात. ते पुसायची परवानगी आहे का, डोळयाची उघडझाप केलेली चालते का हयाबद्दल स्वामी काहीच बोलले नाहीत.

प्रकाश क्षणभर बिंदूवरचं लक्ष हलवतो आणि डोळयांच्या कोपऱ्यांतून आजूबाजूच्या लोकांकडे बघतो. त्याच्या शेजारची बाई डोळे मिटून डुलत्येय. पलीकडला माणूस डोळे सारखे मिचकावतोय. प्रकाश हळूच स्वामींकडे बघतो. ते एका शिष्याला काही तरी सांगण्यात गुंतलेले आहेत. त्यांचं ह्या दोघांकडे लक्ष नाहीये. कोणाकडेच लक्ष नाहीये. कदाचित त्यांच्या आतल्या डोळयाला सर्व दिसत असेल.... ते एक पोचलेले गुरू आहेत.

प्रकाश पटकन डोळे पुसतो आणि ते पुन्हा बिंदूवर रोखतो. हळूहळू त्याच्या डोळयांसमोर बिंदू कंपित होतो. त्यातून प्रकाशाचे तरंग उठू लागतात. प्रकाशचं मन उत्तेजित होतं. त्याचे डोळे आपोआप मिटतात. लाल बिंदून त्याच्या पापण्यांच्या मागं आकार धारण केलाय. बिंदुची शक्ती आपल्यात सामावल्याची जाण त्याला होते. तो आनंदतो. तेवढ्यात स्वामींचे चार शिष्य ओंकाराचा घोष सुरू करतात. प्रकाश त्यांना भरदार साथ करतो. त्याचं डोकं हलकं झालंय. हा अनुभव कोणाला सांगू, कोणाला नाही, असं त्याला झालंय. आता लवकरच त्याला त्याच्या अंतरंगात डोकावता येईल..... ते इतरापेक्षा काहीतरी वेगळं आणि अद्भुत असेल.

स्वामींचा आवाज आता लांबून येतोय. ते आज्ञा करतात : “आता ओंकाराचा घोष एकदम न थांबवता हळूहळू आत खेचून घ्या. त्याचा आवाज व्यक्त झाला नाही तरी तो तुमच्या मनात चालू असेल. बरोबर. आता हळूहळू डोळे उघडा. आतल्या जगातून बाहेरच्या जगात येताना धक्का बसू शकतो. सुपरसॉनिक विमान अंतराळातून आपल्या वातावरणात प्रवेश करताना जसा स्फोट होतो तसा तुमच्या डोळयांसमोर होण्याची शक्यता आहे. त्यासाठी ही काळजी घ्यायची असते.”

आता सर्वांनी डोळे उघडल्येत. उपस्थित तरुण पोरांपैकी एक खालच्या आवाजात शेजारच्या मुलीला म्हणतो, “डिड यू फील एनिथिंग? मैं तो सो गया यार.”

मुलगी म्हणते, “शट अप. इट वॉज अ ब्यूटिफुल एक्स्पीरियन्स.”

मुलगा म्हणतो, “बुलशिट. आय होप द फूड इज गुड.”

मुलगी म्हणते, “इट्स ऑल व्हेजिटेरियन.”

मुलगा म्हणतो, “शिट यार. व्हाय डिड यू ब्रिंग मी हियर?”

मुलगी किंचित आवाज चढवून म्हणते, “आय डिड? यू वॉटेड टू सी मी. आय टोल्ड यू आय वाज कमिग हियर, यू सेड; कॅन आय कम? आय सेड; श्योर, इफ यू वाँट टू. सो हाऊ डिड आय ब्रिंग यू हिअर?”

मुलगा म्हणतो, “यू आर राइट, यू डिडन्ट, बट व्हॉट अबाउट ‘प्रसन्नता’ अँड सर्व चिंता गळून पडतील वगैरे? आफ्टर यॉर ब्यूटिफल इनर एक्सपीरियन्स यू शुड्न्ट आरग्यू विथ पीपल आऊटसाइड वर्ल्ड लाइक मी.”

मुलीला उलट उत्तर सापडत नाही. मुलगा जोरात हसतो. त्यामुळे स्वामींच्या पाया पडायला लाइनीन उभ्या असलेल्या सत्संगींनी भक्तिभावानं जी शांतता राखत्येय त्याला तडा जातो. एकाएकी सर्वच जण एकमेकांशी कुजबूजू लागतात. आतून जेवण लावल्याचे आवाज येऊ लागतात. काही जण मोठ्यानं हसतातसुद्धा. सर्वांचं स्वामीच्या पाया पडून होतं. सुमित्राबेन स्वामींसाठी चांदीच्या ताटात ठेवलेल्या चांदीच्या वाट्यांमध्ये आतल्या टेबलावरचे सर्व पदार्थ रचून आणतात. त्यांच्या आसनासमोर एक बैठ टेबल ठेवलं जातं. त्यावर त्या ते भरलेलं ताट, चांदीचा गडवा-भांडे, एका पेल्यात बदाम लावलेलं थंड दूध-असं सर्व ठेवतात. स्वामी पहिला घास घेईपर्यंत त्या अदबीनं त्यांच्यासमोर उभ्या राहतात. नंतर आपल्या पाहुण्यांकडे लक्ष पुरवायला आत जातात.

(यातील अध्यात्माच्या ‘अनुभूती’बद्दल  काही कळल्यास इतर (अज्ञ) वाचकांबरोबर शेर करावं ही विनंती.)

## • ॐकार महिमा

‘सर्वे वेदा...’, कठोपानिषदातला आहे. ॐ हेच अक्षर ब्रह्माचे नाम-रूप आहे आणि ओंकार नामसाधनेमुळे ब्रह्म प्राप्ती होते. यात ब्रह्मचर्य, ध्यान वगैरे संकल्पना येतात आणि या संकल्पना न समजल्यामुळे किंवा त्यांचे अतिसुलभीकरण केल्यामुळे ते जे कुणी बाबा लोक आहेत त्यांचं ‘हाय-फाय’ अध्यात्म फावतं. दोन्ही लेखात जे गुरु म्हणवणारी पात्रे आहेत त्यांचा दांभिकपणा दाखवलेला आहे. त्याच बरोबर जे शिष्य म्हणून आलेले आहेत त्यांचाही दांभिकपणा दिसून येतो. मुंडक उपनिषदात एक श्लोक आहे –

‘परीक्ष्य लोकान् कर्मचितान् ब्रह्मणो, निर्वेदमायान्नास्त्यकृतः कृतेन।
तद्विज्ञानार्थं स गुरुमेवाभिगच्छेत् समित्पाणिः श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठम्
॥१.२.१२॥...

’. अर्थात ‘कर्माने निर्माण केलेली सर्व फळे अनित्य आहेत ही जाणीव झाल्यावर, मनुष्य त्या अमृत तत्वाचे ज्ञान मिळवण्यासाठी ब्रह्म ज्ञानाने युक्त अशा गुरूला हाती समिधा घेऊन शरण जातो.’ आयुष्यात स्थिर स्थावर झाल्यावर उपनिषदात सांगितल्याप्रमाणे आपल्या सर्वांना ही अपूर्णत्वाचा जाणीव होते. पूर्णत्व आणि अपूर्णत्व यातील द्वंद्व मनात सतत सुरू असते. इथे परंपरेचं मार्गदर्शन नसेल तर मनुष्य या अपूर्णतेला स्वीकारतो आणि ‘कभी खुशी, कभी गम’ हेच जीवनाचे अंतिम चक्र आहे हे स्वीकारून आयुष्याची मार्गक्रमणा करतो. परंपरेचं मार्गदर्शन असेल तर योग्य गुरूचा शोध सुरू होतो आणि मनुष्य गुरुच्या चरणी लीन होतो. मुंडकातल्या १.२.१२ आणि १.२.१३ या श्लोकांमध्ये जिज्ञासु आणि गुरु यांच्या व्याख्या दिलेल्या आहेत. जिज्ञासु म्हणजे ज्याला कर्म करून निर्माण होणाऱ्या फळांचे अनित्यत्व लक्षात आलेलं आहे व त्यातून निर्माण होणाऱ्या अपूर्णत्वाचा लोप होण्यासाठी गुरूचा शोध सुरू केलेला आहे असा मनुष्य. तर गुरु म्हणजे जो ब्रह्मज्ञानी आहे आणि ज्याची बुद्धी ब्रह्म मध्ये पूर्ण स्थापित झाली आहे असा. इथं लगेचच असा प्रश्न निर्माण होतो की जो जिज्ञासु आहे त्याला समोर असलेला मनुष्य ब्रह्मज्ञानी

आहे की नाही ही कसं समजावं? कारण जर जिज्ञासु माणसाला जर परंपरेची ओळख नसेल तर कोणीही त्याच्या अज्ञानाचा गैरफायदा घेऊ शकतो आणि इथे त्याची फसगत होते. दोन्ही लेखात असलेले गुरु आणि जिज्ञासु ही दोघेही दांभिक आहेत. जिज्ञासु लोकांना benefit-of-doubt देऊन आपण असेही म्हणू शकतो की अशा लोकांना अध्यात्म समजावून सांगण्यापेक्षा त्यांची फसवणूक करण्याचा या 'गुरूचा' हेतु आहे.

श्रीशंकराचार्यांच्या गुरूचे गुरु श्री गौडपाद मांडुक्य कारिकेमध्ये मंद, मध्यम आणि उच्च असे मनुष्याच्या बुद्धीचे तीन प्रकार सांगतात. ब्रह्म समजणे ही बौद्धिक असल्यामुळे बुद्धीची पातळी येथे महत्त्वाची ठरते. इथे मंद बुद्धी म्हणजे आजचा रूढार्थ म्हणजे कमी बुद्धीचे किंवा बुद्धीने विकलांग असा नाही. ज्यांच्या बुद्धीला 'ब्रह्म हेच अद्वैत आहे' याचे ज्ञान झाले आहे अशा बुद्धीला उच्च बुद्धी म्हटले आहे. मंद बुद्धी म्हणजे ज्यांना 'ब्रह्म हेच अद्वैत आहे' ही समजलेले नाही अशी बुद्धी, आणि मध्यम बुद्धी म्हणजे जे जिज्ञासु बुद्धी! जे मंद बुद्धी आहेत त्यांच्या साठी कठोपनिषद ॐकाराची पूजा करणे हा श्रेष्ठ मार्ग सांगते, जे मध्यम बुद्धीचे आहेत त्यांच्यासाठी ॐकारध्यान आणि जे तीक्ष्ण बुद्धी आहेत त्यांना ब्रह्म ॐकारातच ब्रह्म ज्ञान होते. 'ब्रम्ह बुद्धीच्या गुहेत स्थापित होते तेंव्हा द्वैत नष्ट होते आणि अद्वैताची समाज निर्माण होते' ही संकल्पना समजली नसेल तर हा सगळा एकतर काहीतरी गूढ प्रकार आहे किंवा फक्त शब्द खेळ असा समज निर्माण होणे साहजिकच आहे. 'श्रवण-मनन-निदिध्यासन' या मार्गे मनुष्य आपल्या बुद्धीला तीक्षता आणू शकतो. शांता गोखले यांच्या लेखात असलेले गुरु पात्र ध्यान मार्ग दाखवत आहे. पण समोर बसलेले लोक कोणत्या पातळीवर आहेत याचा विचार त्याने केलेला आहे असे दिसत नाही. तोच प्रकार पुलंच्या कथेत...



# कॉफी पुराण

आपल्या देशात (वा किंवा इतर अनेक देशात) चहाला ज्या प्रमाणात मान्यता मिळाली आहे, त्या प्रमाणात कॉफीला मिळाली नाही हे मान्य करायला हवे. किंबहुना जितक्या प्रमाणात कॉफीला मान्यता मिळायला हवी होती तितक्या प्रमाणात मिळाली नाही

हे माझे प्रामाणिक (वैयक्तिक) मत आहे. दक्षिण भारतातील काही भाग सोडल्यास कॉफी हे उच्चभ्रूंचेच पेय आहे असे समजले जात असावे. या उलट कदाचित सार्वत्रिकपणे असलेली चहाची उपलब्धता, तिची स्वस्ताई वा तयार करण्याची सोपी पद्धत यामुळे चहाला सर्वाधिक पसंती मिळाली असेल.

काही वर्षापूर्वी पश्चिमेतील राष्ट्रात तर कॉफीच्या हलक्या गुणवत्तेच्या बियांचा वापरही कॉफी नकोशी वाटण्यास कारणीभूत ठरली असावी. कॉफी शॉपमध्ये कॉफी पिणाऱ्यांना कॉफीचे उत्पादन कुठे होते, कुठून खरेदी केली जाते वा ती कशी तयार केली जाते याच्याशी देणे-घेणे नसते. मुळात कॉफी थोडीशी स्वस्त, जिभेला कडवट व त्यात काही औषधीमूल्य हवेत येवढीच माफक इच्छा बाळगून लोक कॉफी पीत असावेत.

परंतु गेल्या १०-२० वर्षात कॉफीच्या संदर्भात भरपूर काही बदलले आहे, हे प्रकर्षाने जाणवते. जागतिकीकरणाच्या रेट्यात कॉफी बियांचे उत्पादक, बियांच्यावर प्रक्रिया करणारे कारखानदार, स्पर्धेला तोंड देण्यासाठी आक्रमकपणे मार्केटिंग करणारे व्यापारी आस्थापने, बॅरिस्टा, सीसीडी, स्टारबक्ससारखे साखळी रिटेलर्स (व फुड् सांयंटिस्ट्ससुद्धा!) या सर्वानी कॉफीला वाइन वा बीअरसारखा दर्जा देण्याच्या प्रयत्नामुळे कॉफीला वेगळे परिमाण लाभत आहे. कॉफी पिणाऱ्यांना फक्त रोस्टेड, टोस्टी वा कडवट यापैकी काही तरी आहे एवढेच कळते; परंतु कॉफीच्या संदर्भात हा चवीचा मुद्दा वरवरचा असून अजूनही कॉफीबद्दल सांगण्यासारखे भरपूर आहे.



ड्रिप् वा फिल्टर (एस्प्रेस्सो नव्हे) प्रकाराची कॉफी पीत असताना चाकलेटसारखी दिसायला मुलायम व चवीला गोड असलेली कॉफी  जिभेला शँपेन पिल्यासारखे किंवा ब्ल्यूबेरी फळ खाल्यासारखे वाटू लागते. यात कुठलेही सायरप वा एसेन्स वा फ्लेव्हर्स घातलेले नसतानासुद्धा  कॉफीची चव अशीही असू शकते याचे आश्चर्य वाटते. पहिल्यांदाच जेव्हा अशा शुद्ध स्वरूपातील कॉफीची चव घेतो, ती चव आयुष्यभर आपण विसरत नाही.

चवीतील हा बदल जागतिकीकरणाच्या रेट्यामुळे बियांच्या भाजण्याच्या प्रक्रियेमधून आली असण्याची शक्यता आहे. कॉफीच्या बिया भाजण्याची (roasting) एक विशिष्ट पद्धत असते. कॉफी बियांवर प्रक्रिया करणाऱ्या प्रत्येक उत्पादकांची एक रोस्टिंग प्रोफाइल असते. भाजण्याच्या तापमानातील बदलाप्रमाणे चव बदलत जाते. ज्या प्रकारे ओक लाकडांच्या पिपामध्ये वाइनच्या बाटल्या अंधारात जास्तीत जास्त वर्षे ठेवल्यास वाइनची झिंग येऊ शकते त्याच प्रकारे जास्तीत जास्त वेळ व जास्तीत जास्त तापमानात बिया भाजल्या तर कॉफीला वेगळी चव येते यावर पूर्वीच्या काळी विश्वास होता. परंतु आता कॉफीच्या बियांच्या गुणवत्तेनुसार रोस्टिंग प्रोफाइल बदलत जाते. चवीतील विविधता ही रोस्टिंगच्या तंत्रज्ञानातील बदलामुळे झाली आहे. रोस्टिंग प्रोफाइलमधील तापमान व वेळ यांना कमी-जास्त करण्यामुळे आपल्याला हवे तसे कॉफीच्या फ्लेव्हरमध्ये  विविधता आणता येते.



परंतु अलीकडील काळात कॉफीवर प्रक्रिया करणाऱ्या प्रदेशानुसार कॉफी संस्कृती विकसित होत आहे. उत्तर अमेरिका, ऑस्ट्रेलिया, जपान, स्कॉँडिनेव्हिया, ब्रिटन इत्यादी देश कॉफी बियांना केंद्रस्थानी ठेऊन आपापले वैशिष्ट्यपूर्ण तंत्र वापरून वेगळा ठसा उमटवत आहेत. कमी तापमानात व कमी वेळ भाजूनही कॉफीला वेगळी चव येऊ शकते; वा जेथे कॉफी वाढते त्या मातीच्या गुणानुसार रोस्टिंग तंत्र बदलणे इत्यादीवर भर दिले जात आहे. एके काळी वाइन डिस्टिलरीज अशा प्रकारे टेरॉयर *(terroir)* बद्दल जास्त जागरूक असायचे.

कॉफी बियांचे उत्पादन करणाऱ्या कर्कवृत्त व मकरवृत्त यांच्यामधील पट्ट्यात कॉफी बेल्ट म्हणवून घेणारे देश बियांचे उत्पादन, बियावरील प्रक्रियेचे तंत्र यात जास्तीत जास्त सुधारणा करत वैशिष्ट्यपूर्ण चव असलेली कॉफी ग्राहकापर्यंत पोचविण्याचे प्रयत्न करत आहेत. या सर्व गोष्टीमुळे कॉफिच्या ग्राहकांसाठी नवे दालन उघडले जात आहे. कॉफीतील चवीतील विविधता आताच्या इतकी कधीच नव्हती.

कॉफी प्यायला सुरुवात करणाऱ्या वा कॉफीचे पियक्कड असलेल्या सर्वांना एक विनंती आहे की तुमच्या टेबलावर फेसाळ, गरम गरम कॉफीचे मग् तुम्ही हातात घेताना कॉफी आणून ठेवणाऱ्यापासून कॉफीचे उत्पादक, कॉफी

रोस्ट करणारे व बरिस्टा, स्टारबक्स या सर्वांची आठवण ठेवा. कारण वाइन वा बीअरसारख्या पेयांची विविधता कॉफी पेयामध्ये आणण्यात या सर्वांचा हातभार लागलेला आहे व त्याची कडवट चव जिभेवर काही काळ तरी राहण्यास या सर्वांनी अपार कष्ट घेतले आहेत.

चवदार कॉफीसाठी नेमके काय करता येईल हा प्रश्न नेहमीच विचारला जात असतो. मुळात त्यासाठी दुकानाच्या फळीवरील सुबकपणे मांडलेल्या कॉफी पावडरला ‘राम राम’ करणे इष्ट ठरेल. कारण तेथे कॉफीची क्वालिटी कधीच सापडणार नाही. त्यामुळे आपल्याला ज्या स्थानिक हॉटेलमधील कॉफी आवडली असेल तेथे जाऊन तेथे कॉफी कशी बनवली जाते त्याची चौकशी करावी लागेल. तो कुठल्या बिया वापरतो, किती वेळ व कुठल्या तापमानात कशी भाजतो, कॉफी कशी तयार करतो इत्यादी गोष्टी समजून घ्यावे लागतील. जर तोही दुकानातील पॉवडरच वापरत असेल आपल्याला तसली कॉफी का आवडली यासमोर प्रश्न चिन्ह ठेवावे लागेल. जर या गोष्टी स्थानिकरित्या मिळत नसल्यास गूगल अंकलला शरण जाऊन माहिती करून घ्यावी लागेल. या बाबतील हॉटेलचा मालक जितका पारदर्शक असेल त्यावरून त्याच्या धंद्यांची सचोटी ठरवता येईल.

प्रामाणिकपणे धंदा करणारे रोस्टर्स वा बरिस्टासारखे चेन कॉफी शॉप्स त्यांच्यातील कॉफीसाठी कुठल्या देशातून क़ॉफीच्या बिया येतात व/वा कुठून व कशी त्यावर प्रक्रिया केली जाते इत्यादी माहिती नक्कीच देतील. या माहितीवरून उत्पादन प्रक्रियेतील गुणवत्तेसाठी केलेले प्रयत्न लक्षात येतील. परंतु रोस्टर जर ही माहिती देत नसल्यास त्या कॉफीपासून चार हात दूर असणे हितकारक ठरेल. काही दर्दी रोस्टर्स कॉफी प्लँटेशनला भेट देऊन आपल्या ग्राहकाला योग्य चवीची कॉफी देण्याचा प्रयत्न करतात.

निष्णात रोस्टर्स एकाच देशातील वा एकाच मातीतील कॉफीच्या बिया पसंत करतात व काही जण मात्र दोन वेग वेगळ्या मातीतील बियांचे मिश्रण (ब्लेंड) करून वापरण्यास अग्रक्रम देतात. कॉफी तज्ञांच्या मते एकाच

मातीतीतल बियांची गुणवत्ता मिश्रणापेक्षा जास्त असते. कारण या बियांच्या प्रक्रियेत जास्त प्रकारच्या फ्लेवर्सना सामावून घेण्याची क्षमता असते. मुळात बियांची निवड, त्यांच्यावरील प्रक्रिया इत्यादी घटकावरून फ्लेवर्स ठरते. परंतु मिश्रण केलेल्या कॉफीमध्ये चवीतील सातत्या राखता येते व कुठल्यादी ऋतुमानातील बिया यासाठी चालू शकतात. मुख्यतः यातील बिया परवडण्यायोग्य असल्यामुळे कॉफीची किंमत कमी ठेवणे शक्य होते.

एक मात्र खरे की कॉफीच्या संदर्भात चिक्कूपणा न करता थोडेसे जास्त पैसे खर्च करणे इष्ट. सामान्यपणे चवीवरून कॉफीची किंमत ठरविली जात असते. शिवाय कुठलेही भेसळ न केलेली चांगली चवदार कॉफी तुमच्यापर्यंत पोचविणाऱ्यांनी थोडेसे जास्त पैसे मागत असल्यास आढेवेढे घेण्यात काही अर्थ नाही. इतर शेती उत्पादकाप्रमाणे कॉफीचा शेतकरीही नागविलाच जात आहे. शेतकऱ्यांच्या उत्पादनाला योग्य किंमत मिळावी म्हणून केलेले कायदे वा सबसिडी अगदी अलीकडील तरतूदी आहेत. त्यामुळे गुणवत्तेचा आग्रह धरणारे उत्पादक शासनाने ठरविलेल्या किंमतीपेक्षा जास्त किंमत देऊन कॉफीच्या बियांची खरेदी शेतकऱ्यांकडून करत असल्यामुळे ग्राहकांना हा भुर्दंड सहन करावा लागतो. त्यामुळे आपापल्या ठिकाणच्या प्रामाणिकपणे प्लंटेशनवर राबणारे शेतकरी व पारदर्शकपणे सचोटीने व्यवहार करणारे रोस्टर्स यांच्याकडून कॉफीच्या बिया घेतल्यामुळे कॉफी उत्पादनातील मानवी श्रम व कौशल्याला न्याय मिळू शकेल.

कॉफीच्या बाबतीतीतील एक मुख्य अडचण अशी आहे की प्यायला द्यायच्या अगोदर कुणाला तरी ती बनवावी लागते व नतंरच ती घुटक्या-घुटक्याने पिण्यास द्यावी लागते. वाइन वा बीअरसारखी मागितल्या क्षणी कॉफी सर्व्ह करता येत नाही. कॉफी बनविण्यासाठी कॉफीची पावडर व पाणी (वा पाणीदार दूध) या व्यतिरिक्त काही लागत नसल्यास कॉफी बनविण्याचे एवढे कौतुक कशापायी हाही प्रश्न विचारला जाऊ शकतो. परंतु कॉफी बनवणे हे आव्हान आहे याची जाणीवच बहुतेकांना नसते. तयार केलेल्या ताज्या

मसाल्याच्या चवीप्रमाणे कॉफीची चव जिभेवर भरपूर वेळ रेंगाळत असते. त्याचबरोबर तुम्ही ज्या ठिकाणी राहता, त्या ठिकाणच्या पाण्याचे गुणही तुम्ही बनविलेल्या कॉफीत उतरत असतात. कॉफी तयार करणाऱ्यांला पाणी किती वेळ उकळायला हवे वा कॉफी मशीन किता वेळ चालवायला हवे याचे ज्ञान असल्यास कॉफीची चव चांगली राहील. जर या गोष्टी माहित नसल्यास कितीही उच्च दर्जाच्या बिया असल्या तरी वाईट कॉफीच तयार होईल.

तुम्ही घरीच कॉफी करणार असल्यास कॉफी मशीनपेक्षा गॅसवर भांडी ठेऊन उकळणे हे सर्वात चांगले. कारण मशीनच्या जाहिरातीवर काहीही लिहिले असले तरी मशीन कधीच कॉफीसाठीचे योग्य तापमान राखण्यास असमर्थ ठरत असल्यामुळे त्यापासून चांगली कॉफी मिळणार नाही, हे मात्र निश्चित. शक्य असल्यास किटलीत कॉफी उकळत ठेवल्यास थोड्याशा ट्रायल अंड एरर करून वेळ व तापमान निश्चित करता येईल. मुळात किटलीमुळे वेळेवर नियंत्रण ठेवता येते.

कॉफी बनवताना किती वेळ उकळावे यासाठी तुम्हाला प्रत्यक्ष प्रयोग करणे गरजेचे आहे. जेव्हा उकळत्या पाण्यात कॉफीचे  कण ओतल्या जातात तेव्हा कॉफी विरघळून टाकणारे विद्रावक (solvent) म्हणून पाणी काम करते. परंतु हे कण एकाच क्षणी निरघळत नाहीत. जे कण लवकर विरघळतात ते कण कॉफीला थोडेसे आम्लमय व गोड चव देतात. व नंतर विरघळणारे कण क़ॉफीला कडवट चव देतात. चांगल्या कॉफीमध्ये या दोन्ही चवीचे सुंदर असा मिलाफ झालेला असतो. त्यासाठीच कॉफी बनविताना वेळ हे महत्वाचे घटक ठरते.

उकळण्यासाठी कमी वेळ दिल्यास कॉफीचे विरळ रेणू कॉफी आम्लयुक्त करत  चवीत आंबटपणा आणतात. जर जास्त वेळ उकळल्यास रेणू गर्दी करत चवीत तुरटपणा आणतात. त्यामुळे वेळ साधणे महत्वाचे ठरते. कॉफीची गुणवत्ता, कॉफीच्या दाण्यांचा कमी-जास्त आकार, कॉफी मशीनचे सेटिंग्स,  व

ज्या प्रदेशातूल ती पिकली असेल असेल त्यानुसार १ मिनिट ते ८ मिनिट (वा त्यापेक्षा जास्त)  वेळ देणे गरजेचे आहे.

मुळात कॉफी एक अत्यत गुंतागुंतीचे पेय आहे. तज्ञांच्या मते भाजलेल्या कॉफीच्या बियामध्ये सुमारे 800 रासायनिक  संयुगे असून त्यांच्यामुळेच कॉफीला विशिष्ट चव व खमंग वास प्राप्त होत असते. कॉफी रोस्ट केल्यानंतर त्यास फळांची, फुलांची, कोकोसारखी, शेंगदाण्यासारखी, मसाला पदार्थासारखी, हिरव्या भाजीपाल्यासारखी, - अशी कुठलीही चव येवू शकते. अगदी गुलाबाच्या वा जाईच्य फुलासारखीसुद्धा!

ही चवसुद्धा ताबडतोब लक्षात येणारी गोष्ट नव्हे. धडाधड येणाऱ्या रेल्वेसारखी अंगावर पडणारी नसून ती हळू हळू विकसित होत जाते. ब्ल्यूबेरीच्या फळासारखी कॉफीची चव हवी असल्यास इथियोपियनच्या कॉफी रोस्टरच्या विशिष्ट पद्धतीने  ती तयार करावी लागेल. कॉफी रोस्टर्सला आपल्या चवीची आवड कळवल्यास त्याप्रमाणे कॉफी तयार करण्यात थोडेसे बदल करून हवी ती चव ते देऊ शकतात. अनेक कॉफी रसिकांना तो एक स्वर्गीय क्षण वाटतो. अनेकांना कॉफीच्या अशा प्रकारच्या चवीची माहितीसुद्धा नसते. तेथे पाहिजे जातीचे असेच या बाबतीत म्हणावे लागेल.

कॉफीच्या चवीत अनेक प्रकार असले तरी त्यासाठी असे काही जागतिक मापदंड नाहीत वा निर्दिष्ट केलेले औद्योगिक मापनं नाहीत. वर्ल्ड कॉफी रिसर्च या जागतिक स्तरावरील संस्थेने कॉफी तयार करणाऱ्यांसाठी   शब्दकोश तयार करून त्यात काही सुसूत्रता आणण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु त्याचा वापर पट्टीचे कॉफी तयार करणारे व/वा कॉफी पिणारेही त्याकडे ढुंकूनही पहात नाहीत. कारण प्रत्येकाची स्वतंत्र अशी मानकं वा शब्दकोश असतात. त्यात कुणीही लुडबूड केलेली त्यांना चालत नाही. त्याऐवजी कॉफीच्या पाकिटावर

जाहिरा

तवजा नावातूनच कॉफीबद्दल थोडक्यात सांगण्याचा प्रयत्न केला जातो. परंतु त्या नावात कळण्यापेक्षा दुर्बोधताच जास्त असते. उदाः

‘टोस्टेडमार्शमालो (toasted marshmallow) वा टर्किश डिलाइट (Turkish delight) असे काही लिहिलेले असल्यास त्यातून काय अर्थ काढावा हा प्रश्न ग्राहकासमोर पडू शकतो. मुळात चव आपल्या अनुभवातून वा आपल्या आठवणीतून आकारास येत असते. असे त्याला शब्दबद्ध करणे हे बुटक्याने उंटाचा मुका घेतल्यासारखे ठरेल. त्यामुळे वेष्टनावरील वर्णन तुमच्या चवीशी जुळेल की नाही याची खात्री नाही.

तरीसुद्धा वेष्टनावरील कॉफीच्या चवीबद्दल लिहिलेले वर्णन अगदीच टाकाऊ असत नाही. मुळात हे वर्णन किती तरी जागतिक मानकाप्रमाणे लिहिलेल्या शब्दात असले तरी ते व्यक्ति




सापेक्ष असते. (त्या तुलनेने वाइन उद्योगाने फार छान काम केले आहे.) उदाः टर्किश डिलाइटचा वास काहींना सिगार पेटविल्यासारखा वाटल्यास नवल नाही. काहीना हाही अनुभव त्यांच्या उमेदवारीच्या काळात कामावर

असतानाची  आठवण करून देईल. त्याचबरोबर त्याची फळ, माती, पाऊस इत्यादींच्या मिश्रणाचा वासही आपल्याला मोहित करू शकतो. त्यामुळे काही क्षणातच वेष्टनावरील वर्णनाचा विसर पडतो.

कॉफीची लज्जत कळण्यासाठी कॉफी पियक्कड होण्याला गत्यंतर नाही. तेव्हाच कॉफीचे ठळक प्रकार (तरी) लक्षात येतील; चव गोड फळासारखी वा काजू- दाण्यासारखी वा मसाल्यातील पदार्थासारखी आहे हे कळू शकेल. जसे पहिल्यांदाच नवीन डिश/ड्रिंक खात/पीत असताना त्याची चव व वास आपण लक्षात ठेवतो. त्यासाठी एकेक घास वा घुटके  घेत  घेत त्याचा वास घेत आपण नवीन डिश (ड्रिंक) enjoy करत असतोतसेच कॉफी बाबतीतसुद्धा जिभेच्या वरवर टेस्ट न घेता अगदी जिभेच्या मुळाशी जात, त्याचा वास घेत, विचारपूर्वकपणे थोडेथोडेसे पीत गेल्यास त्याची मजा वेगळीच असते. त्याची खरी चव कळण्यासाठी जीभ कॉफीने भिजायला हवी. पीत असताना दीर्घ श्वास घेतल्यास त्याचा वास लक्षात राहतो. पहिल्यांदाच एखाद्या नवीन प्रकारच्या कॉफीची चव घेत असल्यास या गोष्टी करत राहिल्यास चांगली कॉफी म्हणजे नेमके काय असते हे आपणच ठरवू शकतो.

मुळात आपल्या येथे चांगला चहा वा कॉफी म्हणजे भरपूर साखर व दूध घालून उकळणे. कॉफीच्या बाबतीत तरी हा बासुंदीचा प्रकार अजिबात चालत नाही. साखर व दूध घातल्यामुळे चांगली गुणवत्ता नसलेल्या कॉफी पावडरमधील कडवटपणा नाहिसा होतो हे मान्य असले तरी चांगल्या कॉफी बियांच्यापासून बनविलेल्या कॉफीच्या फ्लेवरसाठी दूध व साखरेची गरज भासत नाही. कॉफीत नेहमीच थोडीशी कडवटपणाची झाक असते व त्याच्यातील मुलायमपणा, ताजेपणा वा गोडी यासाठी दूध-साखरेची जोड देऊ नये. त्यामुळे कोरी कॉफी हेच खरे पेय असून बिन दुधाची व बिन साखरेची कॉफी लज्जतदार असते याबद्दल शंका नसावी.

वरील वर्णन फक्त फिल्टर्ड कॉफीसाठी असून एस्प्रेसो कॉफीत वा लाट्टे, कोर्टाडो वा मॅकियाटो (lattes, cortados and macchiatos) प्रकारात

थोडेसे दूध असल्यास कॉफीला (वेगळीच) चव येते. स्टारबक्ससारख्या चेन शॉपमधील सिग्नेचर कॉफीमधील दूध-साखरसारख्या पूरकांचेच वैशिष्ट्य असल्यामुळे तेथील कॉफी नक्कीच आवडेल, परंतु ती त्यातील कॉफीमुळे नसेल.

जेव्हा कॉफी घरीच बनवता तेव्हा कॉफीसाठी किती पाणी घ्यावे याचे प्रयोगा अंती ठरवती येईल. जितकी जास्त कॉफी तित

की कडवट कॉफी. चांगली कॉ



फी बनविण्यासाठी सामान्यपणे 1 ग्रॅम कॉफीसाठी 15 ग्रॅम या गुणोत्तराप्रमाणे मिश्रण केल्यास कॉफीची चव चांगली असू शकते. हवे असल्यास 1:17 गुणोत्तरापर्यंत प्रयोग करून ठरवता येईल.

घरातच बियापासून कॉफी बनविण्याचा विचार असल्यास ग्रायंडिंग करताना त्याच्या दाण्याच्या आकाराबद्दल लक्ष ठेवावे लागेल. बियांच्या दाण्याचा आकारावरून व किती वेळ उकळण्यास ठेवले जाते यावरून कॉफीचा उतारा ठरतो. त्यामुळे कॉफीच्या मूळ बियावरील प्रक्रियेतून बाहेर पडणाऱ्या दाण्याच्या  आकाराचा

कॉफीच्या चवीशी नाते आहे. ग्राइंड साइझ लहान असल्यास त्याच्या पृष्ठभागाचे क्षेत्र जास्त असल्यामुळे पाण्याला कॉफीतील चव बाहेर

आणण्यासाठी वेळ कमी लागतो. याउलट मोठ्या आकारातील दाण्यांच्या कणातून कॉफीतील चव  बाहेर येण्यासाठी जास्त वेळ लागतो. कॉफीच्या दाण्याचा आकार काय असावा हे आपण उकळण्यासाठी कुठली पद्धत व कॉफी बियांची गुणवत्ता यावरुन ठरते. याविषयी थोडेसे प्रयोग केल्यानंतर आकार निश्चित करणे सोप जाईल. बारीक पावडर एस्प्रेसो कॉफीला चालतो, कारण त्यातील दाबामुळे मिनिटाऐवजी काही सेकंदात कॉफी तयार होते.

कॉफी ग्राइंड करण्यासाठी बर्् (burr) व ब्लेड blade अशा दोन पद्धती वापरतात. बर्् मध्ये कॉफीच्या बियांना दोन खरबरीत पृष्ठभागाच्या मधून त्याचे दाणे करतात. व ब्लेडमध्ये मिक्सरमधील ब्लेडसारखे ब्लेड वेगाने फिरवून बियांचे दाणे करतात. फिरकी ब्लेडमुळे आपल्याला हव्या त्या  आकारात दाणे मिळतात व सर्व दाणे समान आकाराचे असतात. कॅफे मधून कॉफी विकत घेत असल्यास तुम्हाला हव्या त्या आकारात दाणेदार कॉफी विकत घेणे शक्य आहे.

हे कॉफी पुराण वाचल्यानंतर तुम्हाला नक्कीच वेगवेगळया चविच्या कॉफीचा आस्वाद घेण्याची इच्छा होईल. त्यासाठी कॉफी बनविण्यात जाणकार असलेल्या कॅफेचा शोध घेणे आवश्यक आहे. ते शक्य नसल्यास घरीच प्रयोग करत तुमच्या कॉफीची चव निश्चित करू शकता. कॉफी पिणे हा एक अनुभव आहे. त्याच्या चवीचा शोध घेण्यासाठी श्रमाची गरज आहे. ही चव स्वतः एकटेच (ध्यानस्तावस्थेत) किंवा मित्र-मैत्रिणी बरोबर सामूहिकरित्या समारंभ साजरा केल्यासारखे वाटून घेता येणे सहज शक्य आहे. व त्या अनुभवाची आठवण नक्कीच आनंददायी असेल.



# ईश्वराची करणी अगाध!

*(मागच्या शतकाच्या सुरुवातीच्या काळातील महाराष्ट्रातील विपरीत सामाजिक परिस्थितीतही स्वेच्छेने निवडलेले समाजकार्य शेवटपर्यंत एकाकी अवस्थेत नेणाऱ्या काही मूठभर व्यक्तींत 'समाजस्वास्थ्य' हे मासिक चालविणारे र. धों. कर्वे यांचे नाव सर्वात वरचे असेल. 26 वर्षे चाललेल्या या मासिकातील काही निवडक लेखांचा संग्रह पद्मगंधा प्रकाशनानी प्रसिद्ध केला आहे.*

*रधोंची वैचारिक बैठक, समाजसुधारणेविषयीची कळकळ, त्यांच्या तल्लख बुद्धीचा आवाका, बहुश्रुतता, हजरजबाबीपणा इत्यादी गुणवैशिष्ट्ये निश्चितच वाखाणण्यासारखे आहेत. पुस्तकाच्या संपादकांनी ईश्वरवादाविषयी निवडलेल्या लेखातील काही भाग 'ऐसी अक्षरे'च्या वाचकांचे वैचारिक खाद्य (कडू वा गोड) होऊ शकेल! त्यांनी त्या काळी मांडलेले विचार वेगळ्या स्वरूपात अजूनही मांडावे लागतात यावरूनच आपला समाज कितपत ' विवेकी ' झाला आहे याचा नक्कीच अंदाज येईल! )*

दयाळू आणि सर्वशक्तिमान असा एकच परमेश्वर मानल्याने अनेक अडचणी उत्पन्न होतात. ईश्वराच्या अंगी सर्व उत्तम गुण असले पाहिजेत आणि त्याची शक्तीही प्रचंड असली पाहिजे, अशा दोन वेगवेगळ्या कल्पना मनात आल्या; पण त्या एकत्र करताना, त्यांचा मेळ बसत नाही हे कोणी पाहिले नाही आणि तो न बसल्यामुळेच ईश्वराची करणी अगाध झाली!

मेळ बसत नाही या गोष्टीकडे एकदा डोळेझाक केली, की मनुष्य ईश्वरासंबंधी पाहिजे ते बकण्यास मोकळा होतो आणि धार्मिक लोकांना तर मान तुकवणे भागच पडते. उदाहरणार्थ 'चित्रमय जगत' मध्ये 'ईश्वर आहे काय?' या विषयावर एका लेखकाने पुढील विधाने केलेली आहेत:

- ईश्वर आहे.
- ईश्वर व आत्मा एकच आहेत.

- ईश्वर आनंदस्वरूपी असून विश्वव्यापी आहे.
- ईश्वर स्वर्गादिक कोणत्याही विशिष्ट स्थळी राहत नाही.
- प्रत्येक भूतमात्र ईश्वराचा अवतार आहे. ह्या अर्थाखेरीज `` कोणत्याही अर्थाने ईश्वर अवतार घेत नाही.
- ईश्वर प्राणीमात्राच्या पाप-पुण्याचा झाडा घेत नाही. कर्मतत्वाने ज्याच्या त्याच्या कर्माचे फळ त्यास आपोआप मिळत असते.
  ईश्वराची भक्ती करता येत नाही; परंतु त्याच्या साक्षात्काराचा आनंद अनुभविता येतो.
- मंदबुद्धीच्या लोकांनी अव्यक्त ईश्वराच्या साक्षात्काराकडे जाण्याकरता म्हणून काल्पनिक सगुण ईश्वराची उपासना केल्यास चुकीचे नाही, परंतु तो एक केवळ टप्पा आहे हे सदैव लक्षात ठेवले पाहिजे.
- अपरोक्ष अनुभवाखेरीज ईश्वराचे अस्तित्व कोणत्याही प्रमाणाने सिद्ध होत नाही.
- अपरोक्ष अनुभव येईपर्यंत तर्कशुद्ध श्रद्धेने साक्षात्कारी ब्रह्मवेत्त्यांच्या वचनांवर विश्वास ठेवण्यास हरकत नाही.

(पत्रलेखक - स.वि. बर्वे, एम.ए., मुंबई)

- या बकण्याचा काही अर्थ होतो, असे आम्हास वाटत नाही.
- ईश्वर व आत्मा दोन्हीही काल्पनिक आहेत; पण हे दोन्ही एकच याचा अर्थ काय?
- ईश्वर आनंदस्वरूपी आहे याचा अर्थ काय? आनंद हे जर ईश्वराचे स्वरूप असेल, तर आनंद विश्वव्यापी कसा असू शकतो? दु:खी मनुष्यदेखील आनंदीच असतो काय? ही दु:खी मनुष्याची चेष्टा आहे. भुकेलेल्याला सांगावे 'अरे, तुला भूक लागलेली नाही, तुझे पोट भरलेलेच आहे', तसे हे आहे.

- कर्मतत्त्वाने कर्माचे फळ मिळत असते, याचा अर्थ इतकाच होतो की ईश्वर कोणत्याही गोष्टीत ढवळाढवळ करीत नाही. मग ईश्वर मानायचा का?
- साक्षात्कार म्हणजे काय? या शब्दाचा अर्थ प्रत्यक्ष डोळयांना दिसणे किंवा कोणत्याही इंद्रियाचे द्वारा अनुभव मिळणे, केवळ मनात कल्पना येणे याला साक्षात्कार म्हणता येणार नाही. मग तो अनुभव कसा मिळतो? तो मिळतो याला प्रमाण काय? की कोणीही साक्षात्कार झाला असे म्हटले की तो खरे मानावे? कोणीतरी म्हणतो हे प्रमाण पुरेसे नाही, मग तो मनुष्य कितीही विश्वासास पात्र असो; कारण तो भ्रम असण्याचा संभव असतो.
- ईश्वर निर्गुण असतो असेच या लेखकाचे म्हणणे आहे; परंतु सगुण ईश्वराची उपासना करणे चूक नाही असे ते सांगतात. ईश्वराला जर गुण नाहीत, तर ते कल्पिणे ही चूकच आहे, नाही कशी? चुकीची कल्पना टप्पा कसा काय होऊ शकतो? दक्षिणेकडे जाताना काही अंतर उत्तरेकडे जाणे हा कधीही टप्पा होणार नाही. त्याने खरी कल्पना येणे कठिणच होईल.
- पुरावा कशाला म्हणतात, याची या गृहस्थांना कल्पनाच नाही. म्हणूनच ते अपरोक्ष अनुभव येईपर्यंत साक्षात्कारी ब्रह्मवेत्त्यांच्या वचनांवर विश्वास ठेवण्यास सांगतात. निदान ठेवण्यास हरकत नाही असे सांगतात. श्रद्धा कधीही तर्कशुद्ध असू शकत नाही. काही बाबतीत श्रद्धा ठेवणे कदाचित सोयीचे होईल, पण ते शास्त्रीय प्रमाण नव्हे. आणि हे साक्षात्कारी ब्रह्मवेत्त्ये ओळखले कसे? ते फसवीत नाहीत किंवा त्यांना भ्रम झाला नाही कशावरून? अमेरिका खंड पाहिले नसले तरी ते आहे असा आपण विश्वास ठेवतो; कारण ते नसताना आहे असे सांगण्यात कोणाचाही फायदा नसतो आणि अमेरिकेच्या अस्तित्वाची पाहिजे तितकी प्रमाणे व्यवहार दृष्ट्या मिळतात म्हणून आपण जरूर तर तशी श्रद्धा ठेवून वागतो. पण ईश्वरावर श्रद्धा ठेवा म्हणणारे लोक श्रद्धा असल्याप्रमाणे कधीच वागत नाहीत. ते फक्त श्रद्धा ठेवा असे सांगतात आणि ईश्वर आहे या थापेवर

आज कितितरी लोकांचे - भट, हरिदास, पुजारी, फसवे साधू, धार्मिक व्याख्याने देऊन झोळी फिरवणारे वगैरे लोकांचे - पोट भरते. तेव्हा त्यांचे म्हणणे खरे कसे मानावे? मनुष्य कितीही प्रामाणिक असला तरी त्याला भ्रम होणे शक्य असते आणि भ्रम याचा अर्थच हा, की तो भ्रम आहे हे त्याचे त्याला ओळखत नाही. तेव्हा हे साक्षात्कारवाले लोक प्रामाणिक असले तरीही या बाबतीत त्यांच्यावर विश्वास ठेवता येत नाही आणि वरील लेखकच म्हणतात, की याशिवाय त्याला दुसरा पुरावा नाही. एक स्वत:ला साक्षात्कार झाला पाहिजे किंवा दुसर्या वर विश्वास ठेवला पाहिजे.

- शास्त्रीय पद्धतीच्या विचारात एकट्याच्या मतावर कोणतीही गोष्ट खरी मानीत नाहीत. ती अनेकांनी प्रयोग करून खरी ठरावी लागते. साक्षात्कारवाल्या लोकांत एकमत कधीच होत नाही. प्रत्येकाचा साक्षात्कार वेगळा. तेव्हा शास्त्रीय मन:प्रवृत्तीच्या मनुष्याला त्यावर कधीही विश्वास ठेवता य़ेणार नाही. ज्याला साक्षात्कार झाला असे वाटेल, तो कदाचित ते खरे मानील आणि त्याला त्याबद्दल दोषही देता येणार नाही. वेड्याच्या इस्पितळातल्या एखाद्या मनुष्याला आपण अखिलब्रह्मांडनायक आहोत असे वाटले तर त्याला दोष देण्यात अर्थ नाही. एखादा उपासनीमहाराजही आपणाला अखिलब्रह्मांडनायक म्हणवून घेतो आणि बावळट लोक त्याचे नादीही लागतात; पण समंजस लोकांनी तसे करण्याचे कारण नाही. भ्रमिष्टांच्या बडबडीला किंवा आपमतलबी साधूच्या वटवटीला जर कोणी पुरावा समजू लागला, तर तो वेडाच्या सीमेवरच आहे. अशा लोकांना नेहमी वेड लागतेच असे नाही. कधीकधी ते जन्मभर तसेच अर्धवट राहतात, पण ती वेडाची पायरी आहे.

संदर्भः समाजस्वास्थ्य, नोव्हेंबर 1938



# नैतिकतेसाठी परमेश्वर हवा(च) का? – एक सर्वेक्षण

माणूस हा एक विचित्र प्राणी आहे. या प्राण्याला नाविन्याची फार हौस आहे. त्याच्यात सर्जनशीलतेची क्षमता आहे. गुंतागुंतीच्या समस्यांना योग्य उत्तरं शोधण्याची हतोटी आहे. त्यानी केलेल्या तंत्रज्ञानातील अफाट प्रगतीमुळे मानवी जीवन सुसह्य होत चालले आहे. स्वत:च्या आरोग्य स्थितीवर संशोधन करत तो आता जास्तीत जास्त वर्षे जगण्याचा प्रयत्न करत आहे. दुर्धर समजलेल्या रोगांवर औषधोपचार शोधल्यामुळे निरोगी आयुष्य जगणे त्याला आता शक्य होत आहे. परंतु एवढे करूनसुद्धा अजूनही तो अविचारांना, चुकीच्या विचारांना बळी पडतोच आहे. याचा एक अत्युत्तम पुरावा म्हणून अजूनही जनसामान्यांच्या मनात असलेली परमेश्वराच्या अस्तित्वाबद्दल असलेली श्रद्धा याचा उल्लेख करता येईल. एकदा आपण परमेश्वराच्या अस्तित्वाला मान्यता दिल्यास त्या अनुषंगाने येणारे धर्म, धार्मिक व्यवहार, कर्मकांड, पूजा-प्रार्थना, सण-उत्सव, जन्मापासून मृत्युपर्यंतचे विविध प्रकारच्या विधी, गंडे, दोरे, तावीज, पाप-पुण्य, पवित्र-अपवित्र या संकल्पना, भव्य-दिव्य पूजास्थानांची उभारणी, धर्मस्थळांची सहल, दैव-नशीब, इत्यादी आपसुकच येणार याची खात्री असावी. या गोष्टी-कमी अधिक प्रमाणात जगभर सापडतील. परंतु त्यांचे समूळ उच्चाटन झाले नाही. तंत्रज्ञानाची घोडदौडही त्यांना रोखू शकली नाही.

परमेश्वर ही संकल्पना अजूनही टिकून आहे यामागे कदाचित परमेश्वरप्रणीत धर्मामुळे नैतिक मूल्ये रुजविले जातील ही मानसिकता अजूनही मूळ धरून आहे. आधुनिक काळात सत्ता व धर्म यांची फारकत केल्यास कल्याणकारी राज्यव्यवस्था चालविणे शक्य होईल असे वाटल्यामुळे जगभरातील अनेक लोकशाही राष्ट्रांनी धर्मनिरपेक्षतेला अग्रक्रम दिल्याने चांगले परिणामही दिसू लागले. पुरोगामी विचारवंतानी तार्किकरित्या धार्मिक मूल्ये व नैतिक मूल्ये

यांचा अर्थाअर्थी एकमेकाशी काही संबंध नाही असे सिद्ध केले. तरीही धार्मिक मात्र अजूनही आपला हेकेखोरपणा सोडण्यास तयार नाहीत. काही वेळा जनसामान्य परमेश्वर-धर्म इत्यादींचा कास सोडून स्वतंत्रपणे



जगत आहेत असेही वाटत असते. याचा पडताळा घेण्यासाठी देव धर्माविषयी सर्वेक्षण घेतले जाते. त्यातून नेमकी काय स्थिती आहे ते कळू शकते. अशाच प्रकारच्या एक व्यापक सर्वेक्षणातील अहवालातील निष्कर्ष वाचकांसमोर ठेवण्याचा हा एक अल्पसा प्रयत्न.

प्यू रिसर्च सेंटर या जागतिक स्तरावर काम करणाऱ्या संशोधक संस्थेने धर्म, परमेश्वर व नैतिकता, आणि धर्माचरणात पूजा – प्रार्थना इत्यादींचे महत्व याबद्दलची मतं जाणून घेण्यासाठी सर्वेक्षण केले असून त्यांनी एक अहवाल प्रसिद्ध केला आहे. या सर्वेक्षणात युरोप व पूर्वीच्या सोव्हिएत युनियनच्या देशात परमेश्वराला महत्व देण्याची ही संकल्पना कशी उत्क्रांत होत गेली याचे विश्लेषण करण्याचाही प्रयत्न करण्यात आला आहे.

या अहवालासाठी 13 मे ते 2 ऑक्टोबर 2019च्या दरम्यान 34 देशातील 38426 प्रतिसादकांची प्रतिक्रिया नोंदविली. आफ्रिका-लॅटिन अमेरिका-मध्यपूर्व एशिया येथील राष्ट्रात प्रत्यक्ष भेटीतून तर अमेरिका व कॅनडा येथे फोनवरून माहिती मिळवली. तसेच भारत, इंडोनेशिया, फिलिपाइन्समध्येसुद्धा

प्रत्यक्ष भेटीवर भर दिला. परंतु फ्रान्स, जर्मनी, दि नेदरलँड्स, स्पेन, स्विडन, येथून फोनवरून सर्वेक्षण करण्यात आले. मात्र बल्गेरिया, झेक रिपब्लिक, ग्रीस, हंगेरी, इटली, लुथेनिया, पोलंड, रशिया, स्लोव्हाकिया, युक्रेन येथे प्रत्यक्ष संदर्शनातून माहिती मिळविली.

**सर्वेक्षणाची पद्धत**

या केंद्राने भारतातील सर्वेक्षणासाठी 276 प्राथमिक चाचणी नमून्यांच्या गटामार्फत (Primary sampling units) कोलकत्ता, व मुंबई या मेट्रो शहराबरोबर अहमदाबाद व काही इतर शहरं आणि अनेक छोटे मोठे खेड्यात प्रत्यक्ष घरोघरी जाऊन यादृच्छिक पद्धतीने प्रतिसादकांची निवड केली. परमेश्वर, धर्म व नैतिकता या संबंधी एक प्रश्नावली तयार केली व या प्रश्नांच्या उत्तरांच्या स्वरूपात प्रतिसादकांकडून माहिती मिळविली. प्रतिसादकांची निवड करताना प्रतिसादक त्या त्या देशातील भाषिक, भौगोलिक, सास्कृतिक, धार्मिक, सामजिक, आर्थिक, राजकीय इत्यादी सर्व स्तरांतील समुदायांचे प्रतिनिधित्व ते करतील याची काळजी घेतली होती. या उपक्रमासाठी संगणकांची मदत घेतली गेली. 18 वर्षाच्या वरील हे प्रतिसादक वेगवेगळया उत्पन्न समूहातील, वेगवेगळ्या वयोगटातील व उच्च-निम्न जाती व उत्पन्न गटातील स्त्री-पुरुष होते. जास्तीत जास्त तीनदा भेटी देऊन अपेक्षित असलेली प्रश्नावली भरून घेतली होती. हीच पद्धत इतर देशातील प्रतिसादकांकडून प्रत्यक्ष भेटीतून व/वा फोनवरून माहिती मिळवून अहवाल तयार केला आहे.

**देशा-देशातील टक्केवारी**

नीती व चांगली मूल्ये टिकविण्यासाठी परमेश्वरावर श्रद्धा हवी असे म्हणणाऱ्यांची सर्वेक्षण केलेल्या देशातील टक्केवारी खालील प्रमाणे आहेः

नीती व चांगली मूल्ये टिकविण्यासाठी परमेश्वरावर श्रद्धा हवी असे ठामपणे म्हणणाऱ्या सहा खंडात पसरलेल्या 34 देशांतील प्रतिसादकांची सरासरी टक्केवारी 45 आहे. परंतु या प्रश्नांचे असे ठामपणे उत्तर देणाऱ्यांच्यात

देशागणिक वेगवेगळ्या प्रमाणात टक्केवारी आहे, हे वरील चित्रातून स्पष्ट होईल.

आर्थिकरित्या विकासाच्या मार्गावर असलेल्या देशातील नागरिक पूर्ण विकसित झालेल्या देशातील नागरिकांपेक्षा तुलनेने जास्त धार्मिक आहेत, असे या सर्वेक्षणात आढळले आहे. आर्थिकरित्या मागासलेल्या या देशातील लोकांमध्ये आपल्या आयुष्यात धर्माला महत्व देणाऱ्यांची संख्या मोठी असून ही संख्या आर्थिकरित्या पूर्ण




विकसित झालेल्या देशांपेक्षा जास्त आहे. नैतिकतेसाठी परमेश्वर हवाच यावर श्रद्धा असणारे या देशात बहुसंख्य आहेत. त्याचप्रमाणे या देशात यामताच्या विरोधात विचार मांडणारेसुद्धा आहेत. नैतिक असण्यासाठी परमेश्वरावर श्रद्धा हवी असे त्यांना वाटत नाही.

**परमेश्वर, प्रार्थना, धर्म**

काही प्रमाणात व्यत्यास असला तरी सर्वेक्षणात जगभरातील देशात सरासरी 62 टक्के प्रतिसादकांनी आयुष्यात परमेश्वराचे स्थान अत्यंत महत्वाचे स्थान आहे असे आढळते. 53 टक्के प्रतिसादकांना प्रार्थनेची गरज भासते. 1991नंतर रशिया व युक्रेनमध्ये ही संख्या वाढलेली आहे. तुलनेने पश्चिमेतील युरोपियन देशात ही संख्या कमी होत आहे.

सर्वेक्षण केलेल्या पश्चिमेतील आठ युरोपियन राष्ट्रामध्ये नैतिकतेसाठी परमेश्वराची गरज आहे असे म्हणणाऱ्यांची सरासरी 22 टक्के आहे. व पूर्वेतील सहा युरोपियन राष्ट्रांत ही संख्या 33 टक्के आहे. युरोप खंडातील राष्ट्रे जास्त प्रमाणात धर्म निरपेक्ष (secular) आहेत. परंतु या राष्ट्रामध्ये अल्पसंख्याकांकडे व त्यांच्या धर्माकडे बघण्याच्या दृष्टिकोनात फार मोठा फरक जाणवतो, हेही या सर्वेक्षणातून लक्षात येते.

**Importance of God has declined in many European nations since 1991, but has increased in former Soviet Union**

*% who say God plays an important role in their life*

| | 1991 % | 2019 % | Change |
|---|---|---|---|
| Spain | 71 | 45 | **-26** |
| Italy | 81 | 60 | **-21** |
| Poland | 83 | 69 | **-14** |
| France | 43 | 31 | **-12** |
| Lithuania | 56 | 44 | **-12** |
| UK | 48 | 40 | **-8** |
| Czech Rep. | 30 | 24 | **-6** |
| Slovakia | 60 | 55 | -5 |
| Hungary | 45 | 44 | -1 |
| Germany | 48 | 51 | +3 |
| Ukraine | 50 | 62 | **+12** |
| Bulgaria | 41 | 55 | **+14** |
| Russia | 40 | 56 | **+16** |

Note: Statistically significant differences shown in bold.
Source: Spring 2019 Global Attitudes Survey. Q66b.
PEW RESEARCH CENTER

**परमेश्वर व नैतिकता**

चागली मूल्ये रुजविण्यासाठी परमेश्वरावर श्रद्धा हवी असे म्हणणाऱ्यांची मते देशा-देशागणिक बदलत आहेत. परमेश्वर व नैतिकता यांच्यात घनिष्ठ नाते आहे यावर विश्वास ठेवणारे युरोपियन युनियनमधील 13 देशापैकी ग्रीकमध्ये 53%, बल्गेरियामध्ये 50 % व स्लोव्हाकियामध्ये 45 % आहेत. मात्र याच युरोपियन युनियनमधील स्विडनमध्ये फक्त 9%, झेक रिपब्लिकमध्ये 14% व फ्रान्समध्ये 15% प्रतिसादकांना परमेश्वर व नैतिकता यांच्यात एकमेकाशी काही संबंध आहे असे वाटते. अमेरिका व कॅनडा येथे अनुक्रमे 26% व 44% ही टक्केवारी आहे. कदाचित या देशातील राजकीय ध्रुवीकरणामुळे या आकडेवारीवर परिणाम झाला असावा.

मध्यपूर्वेतील व आफ्रिकेतील देशामध्ये दहापेकी सात जणांना परमेश्वर व नैतिकता यांच्यात घनिष्ठ नाते आहे असे वाटते. लेबनानमध्ये 72%, टर्कीत 75% व ट्यूनिशियामध्ये 84% लोकांना चांगल्या मूल्यांसाठी परमेश्वराची गरज आहे असे वाटते. इस्त्रायलमध्ये मात्र याविषयी लोकं अर्ध्यावर (48%)

विभागले गेले आहेत.
इंडोनेशिया व फिलिपाइन्स मध्ये ही संख्या प्रत्येकी 96% आहे. भारतात 79% आहे. परंतु पूर्व एशियातील दक्षिण कोरियामध्ये 53% गरज आहे व 46% गरज नाही असे कौल देतात. जपानमध्ये 39% व ऑस्ट्रेलियामध्ये 19% लोकांना परमेश्वर व नैतिकता यात संबंध आहे असे वाटते.

आफ्रिकेतील केनिया व नायजेरिया या देशात ही टक्केवारी अनुक्रमे 95% व 93% आहे. दक्षिण आफ्रिकेतही परमेश्वर व नैतिकता यांच्यात संबंध आहे म्हणणाऱ्यांची संख्या 84% आहे. लॅटिन अमेरिकन देशातील ब्राझिलमध्ये 84% प्रतिसादकांचा नैतिकतेसाठी परमेश्वर हवा यावर भर आहे. परंतु मेक्सिको व अर्जेंटिनामध्ये हे प्रमाण 44% आहे. बायबल या धर्मग्रंथावर विश्वास ठेवणाऱ्या बहुसंख्य रोमन कॅथोलिक्सच्या या तिन्ही देशात माणूस नैतिक असण्यासाठी परमेश्वरी कृपा हवी याबद्दल त्यांच्या मनात संशय नाही.




## 2002 व 2019 च्या सर्वेक्षणांची तुलना

याच संस्थेने 2002 साली अशाच प्रकारचे एक सर्वेक्षण केले होते. 2019च्या सर्वेक्षणातील आकडेवारींशी यापूर्वीच्या आकडेवारीशी तुलना केल्यास काही देशामध्ये परमेश्वरावरील श्रद्धेबद्दलच्या मतात फरक झालेला

जाणवतो. ऱशियामध्ये 11 टक्के वाढ झाली असून युक्रेनमध्ये 11 टक्के कमी झाली आहे. त्याचप्रमाणे बल्गेरिया व जपान या दोन्ही देशात वाढ झालेली असून उलट अमेरिकेत 14 टक्के कमी झाली आहे. त्याचप्रमाणे मेक्सिको, टर्की, दक्षिण कोरियातही नैतिकतेसाठी परमेश्वराची गरज आहे असे म्हणणाऱ्यांची आकडेवारी कमी झाली आहे.

**सकल राष्ट्रीय उत्पन्न (GDP)**

सामान्यपणे सकल राष्ट्रीय उत्पन्न (GDP) किती आहे यावरून देशाची आर्थिक स्थिती मोजली जाते. आपल्या देशाची 2018 साली GDP 2.72 लाख कोटी डॉलर्स (USD) होती. (अमेरिका - 20.54 लाख कोटी डॉलर्स

केनिया - 8,790.83 लाख कोटी डॉलर्स, स्विडन - 55,608.6 लाख कोटी डॉलर्स) परंतु केवळ GDP देशाची खरी आर्थिक स्थिती दाखवू शकत नाही. त्याच्याबरोहर त्या देशाची लोकसंख्या किती आहे हेही महत्वाचे असते. प्रती माणशी किती GDP आहे यावरून खरी आर्थिक स्थिती कळू शकेल. भारताची प्रती माणशी GDP 2010 डॉलर्स एवढी आहे. हे निर्देशांक त्या देशातील

**Those with higher incomes less likely to see belief in God as necessary**

*% who say it is necessary to believe in God in order to be moral and have good values*

| | Lower income % | Higher income % | Diff |
|---|---|---|---|
| U.S. | 56 | 32 | -24 |
| Israel | 64 | 42 | -22 |
| Argentina | 68 | 48 | -20 |
| Bulgaria | 58 | 39 | -19 |
| Hungary | 37 | 18 | -19 |
| Lebanon | 79 | 65 | -14 |
| Poland | 43 | 29 | -14 |
| Canada | 33 | 20 | -13 |
| Slovakia | 56 | 44 | -12 |
| Germany | 43 | 31 | -12 |
| Spain | 28 | 16 | -12 |
| Australia | 25 | 13 | -12 |
| Mexico | 60 | 48 | -12 |
| Tunisia | 91 | 80 | -11 |
| Russia | 43 | 32 | -11 |
| Italy | 35 | 24 | -11 |
| Netherlands | 27 | 16 | -11 |
| UK | 25 | 14 | -11 |
| Greece | 59 | 49 | -10 |
| Ukraine | 57 | 47 | -10 |
| Sweden | 14 | 4 | -10 |
| Turkey | 80 | 71 | -9 |
| South Korea | 49 | 40 | -9 |
| Lithuania | 34 | 25 | -9 |
| Czech Rep. | 22 | 13 | -9 |
| France | 19 | 10 | -9 |

Note: Only statistically significant differences shown. Respondents with a household income below the approximate country median are considered lower income. Those with an income at or above the approximate country median are considered higher income.
Source: Spring 2019 Global Attitudes Survey. Q30.
PEW RESEARCH CENTER

लोकांच्या क्रयशक्तीवर (Purchasing Power Parity – PPP) अवलंबून असते. प्यू रिसर्च सेंटरच्या सर्वेक्षणात परमेश्वरावरील श्रद्धा व नैतिकता यांचा प्रती माणशी GDPवर अवलंबून आहे, असे आढळले. स्थूल मानाने प्रती माणशी GDP व परमेश्वरावरील श्रद्धा व नैतिकता याबद्दलची टक्केवारी हे एकमेकाशी व्यस्त प्रमाणात आहेत असे म्हणता येईल.

उदाहरणार्थ केनिया येथील प्रति माणशी GDP सर्वेक्षण केलेल्या 34 देशात सर्वात कमी प्रती माणशी GDP आहे व 95 टक्के प्रतिसादकांचा परमेश्वरावरील श्रद्धामुळे नैतिकता टिकून राहते यावर विश्वास आहे. तद्विरुद्ध स्विडनची प्रती माणशी GDP सर्वात जास्त ($55,815) असून परमेश्वर व नैतिकता यांच्यातील संबंधाविषयी फक्त 9 टक्के प्रतिसादक विश्वास ठेवतात. सामान्यपणे युरोपियन राष्ट्रे कमी प्रमाणात धार्मिक आहेत.

**वयोमान**

परमेश्वराची पाठराखण करणाऱ्यांचे सर्वेक्षण करत असताना वयोमानाप्रमाणेसुद्धा श्रद्धेत फरक पडतो हे लक्षात येते. पिढ्या-पिढ्यामधील अंतरसुद्धा परमेश्वर व नैतिकता यांच्या संबंधातील मतामध्ये फरक जाणवतो. 18 ते 29 या वयोगटातील प्रतिसादक 50च्या पुढच्या वयातील प्रतिसादकांपेक्षा कमी प्रमाणात परमेश्वरावरील श्रद्धेमुळे नैतिकता येते यावर विश्वास ठेवणारे आहेत. या पूर्वीच्या सर्वेक्षणातसुद्धा ही गोष्ट प्रकर्षाने जाणवली होती.

दक्षिण कोरियातील 64 टक्के जेष्ठ नागरिकांना परमेश्वर व नैतिकता यांच्यात संबंध आहे असे वाटते. परंतु 18-29 वयोगटातील केवळ 20 टक्के प्रौढांना परमेश्वर व नैतिकता यांच्याशी संबंध जोडता येईल असे वाटते. हाच प्रकार ग्रीस, अर्जेंटिना, अमेरिका, मेक्सिको, जपान, पोलंड, हंगेरी या देशातही आढळते. परंतु ब्राझिल, नायजेरिया व भारत या देशात तरुण व वृद्ध पिढीत फार फरक जाणवत नाही.

**व्यक्तिगत पातळीवरील उत्पन्न**

व्यक्तिगत पातळीवरील उत्पन्नाच्या प्रमाणातसुद्धा हाच प्रकार दिसून येईल. ज्यांचे उत्पन्न जास्त आहे, त्यांचे परमेश्वरावरील श्रद्धा कमी आहे, हे काही देशातील सर्वेक्षणाच्या आकडेवारीवरून कळून येईल.

**शिक्षण**

प्रतिसादकांची शैक्षणिक पातळीसुद्धा परमेश्वरावरील श्रद्धेबद्दलचा एक निकष होऊ शकतो. अमेरिका व युरोपमधील सर्वेक्षणात जास्त शिक्षण घेतलेल्यांच्यामध्ये नैतिकतेसाठी परमेश्वर हवा याबद्दलचा विश्वास कमी आहे, हे लक्षात येते. शिक्षण व उत्पन्न यातही परस्पर संबंध असून शिक्षणानुसार हा विश्वास कमी जास्त होतो, हे सर्वेक्षणात स्पष्ट होत आहे.

34 पैकी 24 देशातील उच्च शिक्षित प्रतिसादक परमेश्वराचा नैतिकतेशी संबंध आहे यावद्दल कमी विश्वास ठेवत होते. परंतु इतर 10 देशात मात्र शिक्षणामुळे त्यांच्या विश्वासात काही फरक आढळला नाही. 15 देशातील प्रतिसादकांचे या बद्दलचे मत त्यांच्या राजकीय विचारांशी निगडित होते. जरी उजवी व डावी विचारपद्धती देशानुसार बदलत असली तरी सामान्यपणे उजव्या विचारगटातील प्रतिसादकांना नैतिकता व चांगुलपणासाठी परमेश्वरावरील श्रद्धा आवश्यक आहे अस वाटते. अमेरिका, ग्रीस, इस्रायल मधील उजव्यागटांबरोबर डाव्यागटांतील अर्ध्यांपेक्षा जास्त प्रतिसादकांना परमेश्वरावरील श्रद्धेमुळे माणूस नीतीवान होतो यावर विश्वास आहे. अमेरिका, पोलंड व ग्रीसमध्ये ही दरी 30 टक्केपेक्षा जास्त आहे. स्वीडनमध्ये उजव्या गटातील 10 टक्के प्रतिसादकसुद्धा नैतिकतेसाठी परमेश्वरावरील श्रद्धेची पाठराखण करत आहेत. 2 टक्के डाव्यांनासुद्धा असेच वाटत आहे. हंगेरी, स्पेन, कॅनडा, जर्मनी, इस्रायल, ब्राझिल, ऑस्ट्रेलिया, दक्षिण कोरिया, ब्रिटन, दि नेदरलँड्स, व स्वीडनमधील बहुतेक उजव्या गटांना परमेश्वर व नैतिकता यांच्यात संबंध आहे याबद्दल अजिबात संशय नाही.

**धर्माचे महत्व**

या सर्वेक्षणात (संघटित) धर्माविषयी प्रश्न विचारण्यात आले होते. तुमच्या आयुष्यात धर्माला आपण किती महत्व देता याविषयी अती महत्वाचे, कमी महत्वाचे, थोडे-फार महत्वाचे वा बिन महत्वाचे अशी वर्गवारी करणारा प्रश्न विचारला होता. इतर राष्ट्रांच्या तुलनेत युरोपियन राष्ट्रांनी धर्माला महत्व नाही असे उत्तर दिले. 34 पैकी 23 राष्ट्रांना धर्म ही बाब अत्यंत महत्वाची वाटते. इंडोनेशिया, नायजेरिया, ट्यूनिशिया, दि फिलिपाइन्स, केनिया, भारत, दक्षिण आफ्रिका, ब्राझिल व लेबनान या राष्ट्रातील 90 टक्के प्रतिसादकांना धर्म अत्यत महत्वाचे वाटते.

यातील अनेक राष्ट्रांमधील जनतेंची त्यांच्या आयुष्यात धर्माविषयीची बांधिलकी जास्त प्रमाणात आहे. आकडेवारीप्रमाणे इंडोनेशिया (98%), नायजेरिया (93%), दि फिलिपाइन्स (92%), केनिया (92%), ट्यूनिशिया(91%), दक्षिण आफ्रिका (86%), ब्राझिल (84%), भारत (77%) व लेबनान (70%) यांचा धर्माविषयीच्या बांधिलकीबद्दल क्रमांक लावता येईल.

युरोपमधील राष्ट्रं मात्र धर्माला जास्त महत्व देत नाहीत. धर्माला महत्व देण्याचे प्रमाण स्वीडनमध्ये 22%, झेक रिपब्लिकमध्ये 23%, फ्रान्समध्ये 33% व दि नेदरलँड्स व हंगेरीमध्ये 39% आहे.

बहुसांस्कृतिक युरोपमध्ये आयुष्यात पूर्णपणे धर्माला नाकारणाऱ्यांची संख्या लक्षणीय प्रमाणात आहे. झेक रिपब्लिक, फ्रान्स, दि नेदरलँड्स, स्वीडन, ब्रिटन या देशातील तरुण वर्ग इतर कुठल्याही ऑप्शनपेक्षा धर्म नको असेच म्हणत आहे.

त्याच वेळी ग्रीस, पोलंड, इटली येथील दहापैकी सहा प्रतिसादकांना थोड्या फार प्रमाणात धर्म हवा असे वाटत हे. ग्रीसमधील 80% प्रतिसादकांना थोड्या फार प्रमाणात धर्म हवासा वाटतो. जर्मनी, स्लोव्हाकिया, लिथुआनिया या युरोपियन देशांतील 55% प्रतिसादकांना थोड्या फार प्रमाणात धर्म हवासा वाटतो. बल्गेरियात ही संख्या 59% आहे.

**प्रार्थना**

सर्वेक्षणातील एक प्रश्न प्रार्थनेविषयी होता. परमेश्वर जास्त महत्वाचा की त्याची प्रार्थना? या प्रश्नाला अर्ध्यापेक्षा जास्त देशांनी दोन्ही तितकेच महत्वाचे आहेत असे मत नोंदविले. 34 देशात 61% प्रतिसादकांना परमेश्वर महत्वाचा वाटतो व 53% प्रतिसादकांना प्रार्थना महत्वाचे वाटते.

आर्थिकरित्या विकसित असलेल्या देशातील प्रतिसादक परमेश्वराला नाकारल्याप्रमाणे प्रार्थनेलाही ते त्यांच्या आयुष्यात महत्व देत नाहीत. मात्र विकसनशील देश पूर्ण विकसित देशापेक्षा दुपटीने प्रार्थनेच्या उपयुक्ततेवर भर देत आहेत. दहापेकी नऊ विकसनशील देश परमेश्वराला त्यांच्या आयुष्यात महत्वाचा स्थान आहे यावर श्रद्धा ठेऊन आहेत. (अपवाद फक्त युक्रेनचा). त्या तुलनेने 11 विकसित देशात अर्ध्यापेक्षा कमी प्रतिसादक परमेश्वराला महत्व देत आहेत. विकसित देशातील सरासरी 41% जणांना प्रार्थनेची उपयुक्तता आहे असे वाटते. परंतु हीच टक्केवारी विकसनशील देशात 96% आहे.

काही देशातील प्रतिसादकांना आयुष्यात प्रार्थनेपेक्षा परमेश्वरच जास्त महत्वाचा आहे, असे वाटते. इस्रायलमधील 71% प्रतिसादकांना प्रार्थनेपेक्षा परमेश्वर महत्वाचा वाटतो, तर 54% प्रतिसादकांना प्रार्थना महत्वाचा वाटतो. इस्रायलमधील मुस्लिम समुदायातील 96% जणांना व तेथील ज्यू समुदायातील 66% जणांना परमेश्वर महत्वाचा वाटतो, परंतु 81% मुस्लिम व 50% ज्यू प्रार्थनेली महत्व देत आहेत.

आयुष्यात परमेश्वराला महत्वाचे स्थान आहे याबद्दलचे मत हे प्रतिसादक कुठल्या धर्माचे आहेत यावर अवलंबून आहे, असे म्हणता येईल. आश्चर्याची गोष्ट म्हणजे बहुतेक देशातील धर्म न मानणाऱ्यामध्ये परमेश्वराला मानणारेसुद्धा आहेत. अमेरिका व अर्जेंटिनामध्ये सुमारे 30% निधर्मिकांचा परमेश्वराच्या अस्तित्वावर विश्वास आहे. मेक्सिकोधील धर्मावर विश्वास न ठेवणारे बहुसंख्य जण त्यांच्या आयुष्यात परमेश्वराला महत्व देत आहेत.

ब्राझिल, केनिया व दि फिलिपैआइन्स मधील बहुतेक धार्मिक त्यांच्या आयुष्यात परमेश्वराला जास्त महत्व देत आहेत. त्याचप्रमाणे नायजेरियतीव मुस्लिम व क्रिश्चियन धार्मिकसुद्धा परमेश्वराला महत्वाचे स्थान देत आहेत.

**सोव्हिएत युनियनच्या अस्तानंतर**

१९९१नंतरच्या पश्चिम युरोपमधील देशात क्रिश्चियन धर्माला उतरती कळा लागल्याचे स्पष्ट संकेत अनेक अहवालामध्ये नमूद केलेले आहे. धर्माकडे बघण्याच्या दृष्टिकोनात स्पेन, इटली व पोलंड या कट्टर समजल्या जाणाऱ्या देशात २०१९च्या सर्वेक्षणात अनुक्रमे २६,२१ व १४ टक्के बदल झाला आहे. लुथियानियासकट बहुतेक युरोपियन राष्ट्रांमध्ये हाच ट्रेड अधोरेखित होत आहे. पूर्वीच्या सोविएट संघातील या राष्ट्रात चक्क १२ टक्के फरक झालेला जाणवतो.

सोविएट संघराज्यात धर्मावर बंदी होती. परंतु सोविएटच्या अस्तानंतर रशिया व युक्रेनमधील धार्मिकांची संख्या वाढत आहे. बल्गेरियामध्ये १९९१साली धार्मिकांची संख्या 41% होती. ती २०१९मध्ये 55% झाली.

हाच ट्रेंड प्रार्थनेच्या बाबतीतसुद्धा दिसून येत आहे.

धर्म, परमेश्वर, प्रार्थना इत्यादीच्या बाबतीतील हे सर्वेक्षण जगभरातील जनसमुदायांच्या वैचारिक क्षमतेवर प्रकाश टाकत आहे. यावरून पुरोगामी, नास्तिक व अंधश्रद्धा निर्मूलन करणारे कार्यकर्ते इत्यादींचे कार्य किती कठिण आहे याची नक्कीच कल्पना येईल. वैचारिक क्षमतेवर पसरलेली श्रद्धेची गडद छाया लवकर काढता येणार नाही हे मात्र निश्चित.



# नीतीमत्ता - उपजत की संस्कारित?

एक स्वयंचलित ट्रॉली रेल्वेच्या रुळावरून वेगाने येत आहे. त्यामुळे रुळाच्या मध्यभागी खेळत असलेल्या पाच मुलांच्या जीवाला धोका आहे. अपघात होऊन पाची मुलं मरण्याची शक्यता आहे. आरडाओरडा करूनही उपयोग होणार नाही. धोका टाळण्यासाठी ट्रॉलीला दुसऱ्या रुळावर ढकलू शकणाऱ्या झडप यंत्रणेपाशी आपण उभे आहात. दुसऱ्या रूळाच्या मध्यभागीसुद्धा एक मुलगी एकटीच खेळत आहे. जर आपण ट्रॉलीसाठी रूळ बदलल्यास त्या मुलीचा जीव जाईल. रूळ न बदलल्यास मुलं मरतील. अशा प्रसंगी आपण काय कराल? पाच मुलांचा जीव वाचविण्यासाठी एका मुलीला बळी देणार की पाच मुलांना तसेच वाऱ्यावर सोडून देणार?




आपल्यापैकी बहुतेकांचा कल पाच जीव वाचविण्यासाठी एकीचा जीव घेतला तरी चालेल, असा असेल.

एक सुदृढ व्यक्ती हॉस्पिटलच्या आवारात शिरताना बघून ड्यूटीवरील नर्स आपल्या वरिष्ठ डॉक्टरांना फोनवर सांगू लागली.

"सर, आपल्या येथे आता अत्यावस्थेतील पाच रूग्ण आहेत. त्यांच्यातील



निकामी अवयव काढून अवयवारोपण केल्याशिवाय त्यांना वाचवणे अशक्य आहे. एकाला, मूत्रपिंड, दुसऱ्याला लिव्हर, तिसऱ्याला पुफ्फुस.... असे लागणार आहेत. आताच आपल्या हॉस्पिटलच्या आवारात एक धष्टपुष्ट अशी व्यक्ती शिरत आहे. जर त्याला मारून त्याचे अवयव काढून या रुग्णावर शस्त्रक्रिया केल्यास हे पाचही जीव वाचतील. कृपया आपण त्याला मारण्यास अनुमती ध्यावी. "

जर तुम्ही डॉक्टराच्या जागी असता तर तुमचे उत्तर काय असू शकेल? तुम्ही अशा प्रकारची अनुमती कधीच देणार नाही.

वरील दोन्ही प्रसंगामध्ये पाच जीव वाचण्याची शक्यता आहे. परंतु पहिल्या प्रसंगात एकाला मारून पाच (कोवळे!) जीव वाचवण्यासाठी आपली पूर्ण

संमती असेल. दुसऱ्या प्रसंगात मात्र पाच जीव वाचवण्यासाठी एकाला जिवेनिशी मारण्यास आपला ठाम नकार असेल.

सामान्यपणे जगभरातील बहुतांश लोकांचा निर्णय आपल्यासारखाच असेल. धर्म, भाषा, संस्कृती, शिक्षण, वय, लिंग, सामाजिक वा आर्थिक स्तर, करत असलेला व्यवसाय, इ.इ. कुठल्याही गोष्टीचा या प्रकारच्या निर्णयाला अडसर येणार नाही. तसा विचार करू लागल्यास या प्रकारच्या निकालाला कुठलाही तार्किक आधार नाही. आपण असे का निर्णय देत आहात या प्रश्नाला आपल्यापाशी उत्तर नाही. कदाचित आपल्यात उपजतच असलेली नीतीमत्ता आपल्या वर्तनाचे नियंत्रण करत असावे.

Source: Moral Minds: How Nature Designed Our Universal Sense of Right and Wrong, Marc Hauser, 2006

नीतीमत्ता उपजत असू शकते यासाठी आपण आपल्यातील भाषाज्ञानाविषयीचा मागोवा घेणे इष्ट ठरेल. नोऑम चॉम्स्की या भाषातज्ञाच्या मते जगभरातील माणसं हजारो प्रकारच्या बोली बोलत असले तरी या सर्व बोलींचे मूळ माणसाच्या जनुकीय इतिहासात कुठे तरी असायला हवे. कालांतराने त्या भाषा वेगवेगळया झाल्या असतील. परंतु या सर्वांना बांधून ठेवणारे एखादे समान सूत्र असले पाहिजे. भाषेप्रमाणेच नीतीमत्तेसंबंधीसुद्धा अशाच प्रकारचे विधान करणे शक्य आहे. माणूस जेव्हा जन्माला येतो तेव्हापासूनच - भाषाज्ञानाप्रमाणे - नैतिकतेचे व्याकरणसुद्धा त्याच्या मेंदूत भिनलेले असते. कदाचित ती एक वेगळी व्यवस्था असू शकेल. या व्यवस्थेत काही अबोध - सुलभपणे हाती येऊ न शकणारे - तत्त्व असून त्याचा संबंध नीतीमत्तेशी जोडता येईल.

नैतिकता भाषेसारखीच आहे असे ठामपणे म्हणता येत नसले तरी एक सदृशता (analogy) म्हणून त्याकडे बघता येईल. मुळात नीतीमत्ता ही एक सर्वस्वी वेगळी व्यवस्था आहे. हा काही प्राथमिक शिक्षणाचा विषय होऊ शकत नाही. केवळ संस्कारातून नैतिकतेचे धडे देता येत नाहीत. परंतु मुलांना

जसा भाषेचा खजिना उपजतच मिळत असतो, तशाच प्रकारे नैतिकतेचा खजिना मिळत असावा. हा खजिना उपजतच नसता तर मात्र प्रत्येक नैतिक पेचप्रसंगातून बाहेर पडण्यासाठी त्याच गोष्टीचा विचार करत बसावा लागला असता. इतर काहीही करायचे नाही अशी अवस्था झाली असती.

सर्व मानवी प्राण्यांना सामावून घेणाऱ्या एखाद्या अबोध अशा तात्विक चौकटीत राहूनच आपली नैतिक वैचारिक पद्धती विकसित झाली असण्याची शक्यता आहे. त्यातूनच इतरांना मदत करायचे की त्रास द्यायचे हे ठरत असावे. मात्र प्रत्येक संस्कृतीचे काही स्वतंत्र नियम असून त्यानुसारच कुणाला त्रास द्यायचे व कुणाला मदत करायचे हे ठरवले जात असावेत. नीतीमत्तेसाठी म्हणूनच अशा तत्त्वांचे पालन होत असण्याची शक्यता फार कमी आहे. सामाजिक सलोखा टिकून राहण्यासाठी व आपल्या अस्तित्वावरच गदा येऊ नये यासाठी म्हणून नीतीमत्तेकडून उसने घेतलेल्या या गोष्टी असावेत.

मुळात नैतिकता सामान्यपणे काय करते? जाणते-अजाणतेपणाने सामाजिक गटांचे नियम-प्रथा ठरवत समाजाला पुढे नेण्याचे काम करते. यात अजाणतेपणा कुठून आला? जसा भाषेत येऊ शकतो तसा तो येथे आला आहे. एक मात्र खरे की नैतिकतेतील ही लवचिकता मानवी समूहगटांना एकत्रितपणे बांधून ठेवण्यात काही मर्यादेपर्यंतच यशस्वी होऊ शकते.

चांगल्याला चांगले व वाईटाला वाईट हा 'जशास तसे'चा नैतिक नियम कदाचित सर्व संस्कृतीत सापडेल. "तुमच्याशी कुणी चांगले वागत असल्यास तुम्ही पण त्यांच्याशी चांगले वागा" हा परस्पर सहकारभाव सगळ्या समाजगटात प्रकर्षाने जाणवतो. ‘मला कुणी त्रास देत असल्यास त्याचा सूड घेणे’ ही प्रत्येकाची मानसिकता असते. दुसऱ्यानी काही चांगले केल्यास ‘आपणही त्याची परतफेड करावी’ ही मानसिकतासुद्धा आपल्यात असते. कदाचित या गोष्टी माणूस उत्क्रांत होत असतानाच आलेल्या असावेत. 'दुसऱ्याना मारू नये' ही गोष्ट मग जनुकीय असेल का? निश्चितच नाही. कारण यासाठी काही अटींचे पालन करावे लागते. आपण काहीना मारतो. सर्वांना

नाही. या प्रकारच्या अटींकडे प्रत्येक समाजगटाचे आंतरिक व वा बाह्य वैशिष्ट्य म्हणून बघितल्या जातात.

धर्माच्या पुरस्कर्त्यांना नेहमीच धर्म व नीतीमत्ता या एकाच नाण्याचे दोन बाजू आहेत असे वाटत आले आहे. नास्तिकांना नीतीमत्ता नसते, ही त्यांची ठाम समजूत आहे. परंतु यात काही तथ्य नाही. या जगाच्या कल्याणासाठी नास्तिकांनी पण खस्ता खाल्या आहेत. त्यांचाही सहभाग फार मोठा आहे. यासंबंधात एक प्रश्न उपस्थित होऊ शकतो. धार्मिक व नास्तिक यांच्यातील नैतिकतेच्या आकलनाची पातळी वेगवेगळी असू शकते का? याचे उत्तर निश्चितच नाही असे असेल.



# गळतगे यांचे आध्यात्मिक विज्ञान

आपण पाठवून दिलेल्या आपल्या पुस्तकातील काही लेखाविषयी माझे मत मांडण्याचा प्रयत्न करत आहे.

1. एके काळी सर्व ज्ञानशाखांना फिलासॉफीच्या दावणीत बांधण्याचा प्रघात होता. भौतिकशास्त्र, रसायनशास्त्र, इत्यादी विज्ञानशाखांना नॅच्युरल फिलासॉफी असेच म्हटले जात होते. नंतर फिलासॉफीचा स्तर खालावला व त्याची जागा विज्ञानाने घेतली. म्हणूनच आजकाल कुठलाही जुना वा नवा विषय असू दे, त्याला विज्ञान असे जोडले की काम फत्ते झाले अशी भावना झालेली आहे. त्यामुळेच लेखक *अध्यात्म विज्ञान* हा शब्दप्रयोग करत आहे असे वाटते.

माझ्या मते अध्यात्म हा विषय स्वयंभू असल्यास त्याला विज्ञानाच्या कुबडीची गरज नाही. जर अतींद्रिय जग असे काही तरी असल्यास त्याच्या नियमांना भौतिक जगाच्या नियमांच्या दावणीला बांधायची गरज नाही. विज्ञान हा शब्दप्रयोग जोडायचे असल्यास विज्ञानाच्या निकषानुसार तो विषय आहे की नाही हेही तपासावे लागेल. ते निकषच चुकीचे वा गैरलागू आहेत असे वाटत असल्यास वाद घालण्यची गरज नाही. लेखकाने आपली बुद्धी वापरून हे अतींद्रिय जग सामान्य माणसांच्याही आवाक्यात आहे असे सिद्ध करून दाखवू शकल्यास आमच्यासारखी माणसं लेखकाला सदैव ऋणी राहतील.

2. अमेरिका, युरोपसारख्या अती-प्रगत देशातसुद्धा अजूनही *जग सपाट आहे; माणसाचे चंद्रावरचे पाऊल खोटे असून ते सर्व हॉलिवुडमधील चित्रण आहे; जगाची निर्मिती सहा दिवसात झाली; भूत-खेतांचे नियंत्रण शक्य आहे; उडत्या तबकड्या माणसांचे अपहरण करतात, हिममानवांचा संचार* अशा चित्र-विचित्र गोष्टीवर विश्वास ठेवणारे भरपूर जण आहेत. त्यांच्या संघटना असतात. आपण जोपासलेल्या गृहितकांसाठी लाखो-करोडोंनी ते खर्चही करतात.

लेखकालासुद्धा या जगात चमत्कार घडू शकतात, या जगाचे व्यवहार अलौकिक शक्तीमुळे चालतात, भानामती असू शकते, अशी खात्री असल्यास

समविचारी लोकांची एखादी संघटना उभी करावी, त्याचे नेतृत्व स्वीकारावे व जगाला आपले म्हणणे पटवून द्यावे. त्यात गैर काही नाही. अंनिससारखी आपणही अंनिस निर्मूलन संघटना उभी करून या जगातील सामान्य लोकांना दिलासा द्यावा अशी माझी कळकळीची विनंती आहे.

3. प्रश्न कर्नाटक सरकारने वा डॉ नरसिंहय्याने कुठल्या चुका केल्या हा नसून या जगात भानामतीसारख्या गोष्टी घडू शकतात का हा आहे. जर त्या खरोखरच घडत असल्यास त्यांचे भैतिक स्वरूप कोणते, त्यांची repeatabilty कशी असते, इत्यादी प्रश्न विचारावे लागतील. या प्रश्नांना कॉमन सेन्सची व तर्कशुद्ध उत्तरं मिळण्याची अपेक्षा असते. जर ते शक्य नसल्यास अशा गोष्टींना नाकारण्याची गरज आहे. जर काही हटवाद्यांनाच असले अनुभव येत असल्यास ते कायमचे त्या 'जगा'त राहू शकतात. त्यांना इतर समाजाने पण साथ द्यावी अशी अपेक्षा करणे चुकीचे ठरेल.

4. गजानन जागिरदारांच्या अनुभवाबद्दल लेखकाला उमाळा येणे स्वाभाविकच आहे. कारण त्यांचे अनुभव कथन लेखकाच्या (दुर) आग्रही मताला पोषक ठरणारा आहे. सामान्यपणे माणसं आपल्या विधानांना पुष्टी देणाऱ्या विधानांच्या शोधात असतात. त्यामुळे लेखकांना आनंद होणे अपेक्षित आहे. परंतु याच जागिरदाराप्रमाणे हजारो लोकांनी पंडित शर्माकडून ताइत, गंडे-दोरे बांधून घेतले असतील. मांत्रिक-तांत्रिक पूजा केली असेल. अडी-अडचणीच्या वेळी अगतिक होऊन पंडित शर्माला शरण गेले असतील. लेखकाला खरोखरच या जगात चमत्कार घडू शकतात याची खात्री असल्यास, लेखकाने पंडित शर्माकडे आलेल्या सगळ्या अगतिकांची यादी करून व प्रत्यक्ष भेटून त्यांचे पुढे काय झाले याचा शोध घेतला असता. अशा संशोधनाचे निष्कर्ष त्या क्षेत्रातील तज्ञासमोर सादर करून अशा गोष्टींचे कायमचेच सोक्ष-मोक्ष लावता आले असते. या जगात चमत्कार घडू शकतात असे छातीठोकपणे सांगता आले असते. केवळ इतरावर तोंडसुख घेऊन वा इतराना दोष देऊन आपली वाहवा होत असल्यास संशोधनाचे कष्ट का म्हणून

घ्यावेत?

एवढी टिप्पणी पुरेसे ठरेल.

●●●